







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका


शुभचिंतन
आपलें छपाईचें काम आकर्षक
व्हावें. म्हणून आमचें सहकार्य
घेणाऱ्या आमच्या सर्व ग्राहकांना
ही दिवाळी व आगामी वर्ष
सुखाचें व समृद्धीचें जावो.
चित्रांच्या आणि छायाचित्रांच्या एकरंगी, दुरंगी, लाइन
आणि हाफटोन ब्लॉक्स व स्टीरिओजसाठीं प्रसिद्ध.

# दीपावली

साहित्य-कला-संगम

संपादक : दीनानाथ दलाल

१९५५

वर्ष ११ वें




महाराष्ट्राचें हें पहिलें वार्षिक प्रतिवर्षाप्रमाणें यंदाही रसिक वाचकांच्या हातीं देतांना समाधान वाटत आहे.

नाविन्याची हौस दीपावलीनें सदोदित बाळगली आहे. या अंकांत कथांबद्दलचा एक नवीन उपक्रम केला आहे. त्याबद्दलची अधिक माहिती शेवटच्या पानावर दिली आहे. या उपक्रमाचें चीज वाचकांनीं करावयाचें आहे. उत्कृष्ट साहित्यासोबत यंदाही नेहमींचीं ऑफसेट पद्धतीचीं चित्रें आहेतच, परंतु या शिवाय नवचित्रकारांचीं मॉडर्न पेंटिंग्ज व 'ग्राव्हूर' पद्धतीनें छापलेलीं 'काश्मीर' रेखा-चित्रें हीं नाविन्यपूर्ण ठरतील असा विश्वास वाटतो. या कामीं अखिल भारतीय कीर्तीच्या शिवराज आर्ट ॲन्ड लिथो वर्क्स, नागपूर या संस्थेच्या श्री. धनवटेबंधूंचें सहकार्य किती बहुमोल आहे हें चित्रांची छपाईच सांगेल. चित्रांबरोबर इतर सुबक छपाईचें सारें श्रेय मौजचे श्री. भागवत बंधु व मुद्रणालयाचा कुशल कामगार वर्ग यांनाच द्यायला हवें. टॉम ॲण्ड बेचे श्री. ग. वि. तांबे यांचे संबंध तर आतां औपचारिक राहिलेले नाहींत. तसेंच, श्री. ग. रा. कामत, श्री. रा. ज. देशमुख, श्री. स. दाभोळकर, म. सु. देसाई, प्रभात प्रेसचे श्री. कडव, बॉम्बे प्रोसेसचे श्री. कामत व सर्वोदय प्रिं. प्रेसचे श्री. दिगंबर देसाई या सर्वांचें सहकार्य तर आभारापलिकडचें आहे.

शेवटीं, 'दीपावली' ज्या रसिक वाचक, लेखक, जाहिरातदार, विक्रेते व हितचिंतकांच्या पाठिंब्यावर सध्यांचें रूप धारण करूं शकली, त्या सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून, ही दीपावली व येतें वर्ष सर्वांना सुखसमृद्धीचें जावो असें इच्छितों!

*कलाकृति :*

- गानलुब्धा • रतिलेखा • रूपगर्वा • बिल्वमंगल • गंगालहरी • स्वयंवरिता • काश्मीरच्या रम्य विश्वरूपदर्शनाचीं रेखाचित्रें आणि • मॉडर्न पेण्टिग्ज: गाडे, पळशीकर, गायतोंडे, पै, सामंत, यांचीं.

*कथा :*

- पु. भा. भावे • अरविंद गोखले • व्यंकटेश माडगूळकर • विभावरी शिरूरकर • विजया आपटे • ए. वि. जोशी • अच्युत बर्वे • स. गं. मालशे • विजय तेंडुलकर. • अनन्त काणेकरांची एकांकिका. • वि. स. खांडेकरांची रूपककथा

*कविता :*

- बा. भ. बोरकर • विन्दा करन्दीकर • इंदिरा संत • वि. म. कुलकर्णी • वसंत बापट • मंगेश पाडगांवकर • सरिता पदकी • अनंत काणेकर • ग. दि. माडगूळ-करांची काव्य-कथा • पु. ल. देशपांडे यांचें संगीतक.

*ललित-लेख :*

- इरावति कर्वे • न. वि. गाडगीळ • श्री. म. माटे • ना. वा. कोगेकर.

*आणि*

- मं. वि. राजाध्यक्ष • ग. रा. कामत • व्यंकटेश माडगूळ-कर • पु. भा. भावे • पु. ल. देशपांडे • मंगेश पाडगांवकर • बा. भ. बोरकर • सोपानदेव चौधरी • शांताराम सबनीस यांनीं खुलविलेलें ललित-सदर 'महाराष्ट्र देश सुंदरा.'

*'दीपावली'त प्रसिद्ध झालेलीं मतें, चालकांचीं अधिकृत असतात असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेखांच्या भाषान्तराचे सर्वाधिकार स्वाधीन. या अंकांतील चित्रांच्या सेटची किंमत ट. ख. सह रु. ७*


**चित्रछपाई :** शिवराज [illegible] आर्ट लिथो वर्क्स, नागपूर.

**प्रकाशनस्थळ :** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४.

**मुद्रणस्थळ :** मौज प्रिंटिंग ब्युरो खटाववाडी, मुंबई ४.

प्रकाशक, मुद्रक : दीनानाथ दलाल. • सहसंपादक : वि. घों. तेंडुलकर


अनुक्रमणिका



# 'दीपावलीं'तील कलाकृतींचा थोडक्यांत परिचय

## विल्वमंगल-चिंतामणी

'कृष्णकर्णामृत' या काव्य-कृतीचा कर्ता. वैष्णव संप्रदायाचा मूळ प्रवर्तक वल्लभाचार्य याच्या मतांचा प्रचार करणारा विष्णुस्वामी या नामांकित द्राविड तत्त्वज्ञाचा हा शिष्य.

दामोदर आणि नीली या दंपतीचा हा पुत्र. नांव कृष्ण लीलाशुक. कृष्णाचा हा निस्सीम भक्त होता. बंगालमध्यें विल्वमंगलाविषयीं आख्यायिका प्रचलित आहे ती अशी. चिन्तामणी नांवाच्या एका धार्मिक स्त्रीशीं विल्वमंगलाचा संबंध होता. ही स्त्री आपल्या वडिलांच्या श्राद्धाच्या दिवशीं याला मनाई करी. अशा एका रात्रीं त्याला चिंतामणीची ओढ लागली आणि ती सरळ घरांत घेणार नाहीं म्हणून तो सापाची दोरी करून तिच्या घरांत शिरला. या प्रयत्नांत साप त्याला डसला. चिंतामणीला त्याच्याविषयीं वाटत असलेल्या जिव्हाळ्यामुळें तिनें त्याच्यावर उपचार करून त्याचे प्राण वांचविले. आणि तो शुद्धीवर आला तेव्हां अत्यंत विद्रूप वेषांत ती त्याच्यासमोर उभी होती. विल्वमंगलाला उपरति झाली. श्रीकृष्णभक्तीचा ध्यास त्याला यानंतर लागला. त्याचा मृत्यु वृंदावनीं झाला असें सांगतात.

## जगन्नाथ पंडित-लवंगी

हा प्रसिद्ध पंडित सतराव्या शतकांत होऊन गेला. साहित्यशास्त्रावरील 'रसगंगाधर' हा याचा ग्रंथ विद्वानांना मान्य आहे; आणि भामिनीविलास हा भावगीतांचा संग्रह रसिकांना व गंगालहरी धार्मिकांना. जगन्नाथ हा मूळचा आन्ध्र देशांतील गोदावरी जिल्ह्यांत राहणारा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. याचें अगाध ज्ञान व काव्यकौशल्य प्रत्ययास आल्यावरून शाहजहान बादशहानें याला पंडितराज ही पदवी दिली. यानें अनेक संस्कृत पंडितांना वादांत जिंकलें; फारसी व उर्दू या भाषा आणि इस्लामी धर्मग्रंथ अभ्यासून यानें दरबारांतील घमेंडखोर काजींचा नक्षा उतरविला.

बादशहा याचेवर फार प्रसन्न होता. त्याच्या आमंत्रणावरून याला वारंवार अंतःपुरांत जावें लागे. एकदां हा बादशहाबरोबर बुद्धिबळें खेळत बसला असतां बादशहाला तहान लागली, त्यानें पाणी मागवलें; तेव्हां रूपवती राजकन्या लवंगी मस्तकावर सुवर्णकलश घेऊन तेथें आली. पाणी पिऊन आनंद पावल्यावर तिच्यावर कविता करण्याची बादशहानें पंडितांना आज्ञा केली. या शीघ्रकवीनें ताबडतोब श्लोक म्हटला—

इयं सुरतनी मस्तकन्यस्त कुंभा।
कुसंभारुणं चारुचलं दधाना॥
समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्ति
गृहीत्वा घटे स्थाप्य यातीव भाति॥

हा श्लोक ऐकून बादशहा खूष होऊन म्हणाला, पंडितराज, मी प्रसन्न आहे, तुमच्या इच्छेला येईल तें मागा. तेव्हां पंडितांनीं आणखी एक श्लोक रचून मागणी केली—

न याचे गजालिं न वा वाजिराजिं।
न वित्तेषु चित्त मदीयं कदाचित्॥
इयं सुस्तनी मस्तकन्यस्त कुंभा।
लवंगी कुरंगी दृगंगीकरोतु॥

पंडिताची इच्छा ऐकून बादशहा खिन्न झाला, कुंठित झाला व म्हणाला, तुम्ही आमच्याबरोबर खाना घ्याल तर आम्ही आमची कन्या तुम्हांला देऊं. पंडितांनीं हें मान्य केलें. नंतर बादशहानें राणीचा व कन्येचा विचार घेतला, तेव्हां त्याला समजलें कीं राजकन्या अगोदरपासूनच पण्डितरायांवर अनुरक्त आहे व राणीही याला अनुकूल आहे. पण्डितराय जसे गुणी तसेच देखणेही होते. तेव्हां बादशहानें त्याचें लग्न मोठ्या समारंभानें लावून दिलें. राजाश्रयानें तीं उभयतां अनेक वर्षें सुखानें नांदलीं.

## विल्हण-शशिलेखा

विल्हण हा कौशिक गोत्री ब्राह्मण, काश्मीरांतील प्रवरपुराच्या परिसरस्थला. याचा काळ १०३० ते ११००. चार वेद व सहा शास्त्रें यांत पारंगत. अनेक क्षेत्रस्थानीं पण्डितांच्या सभा जिंकून व कीर्ति मिळवून तो दक्षिणेंत चालुक्यांची राजधानी कल्याणी येथें आला. चालुक्य सम्राट विक्रमादित्यानें (१०७६-११२६) विल्हणाला आश्रय व विद्याधिपति ही पदवी दिली. यानंतर विल्हणानें 'विक्रमांकदेवचरित' हें महाकाव्य लिहिलें.

यापूर्वी विल्हण हा अनहिलपट्टन वीरसिंह राजाच्या दरबारीं आला असतां राजानें याचें विद्यानैपुण्य व काव्यकौशल्य पाहून त्यास आश्रय दिला आणि आपली तरुण व रूपवती कन्या शशिलेखा हिच्या शिक्षणाची कामगिरी त्याजवर सोंपविली. या तल्लख राजकन्येनें थोड्याच काळांत याचेपासून संस्कृत प्राकृतादि विद्या संपादन केल्या नंतर विल्हणानें तिला कामशास्त्राचें शिक्षण दिलें. दोघेंही तरुण व देखणीं आणि विदग्ध व विलासी; शिवाय विषय हा असा. गुरु-शिष्या परस्परांवर अनुरक्त झालीं व त्यांनीं गुप्तपणें गांधर्वविवाह केला. याचा बोभाटा राजाचे कानीं गेला. विल्हणाला सुळीं द्यावें अशी त्यानें संतापाच्या भरांत आज्ञा केली. अखेरच्या क्षणीं इष्ट दैवतांचें स्मरण करण्याविषयीं मारेकऱ्यांनीं सुचविलें असतां यानें शशिलेखेची आठवण केली. आर्त स्वरांत विल्हण तत्क्षणीं स्फुरलेलें काव्य म्हणूं लागला—

अद्यापि तां कनकचंपकदामगौरीं—
विद्यां प्रमादगलितामिव चिंतयामि !

संयोगिता ही पृथ्वीराजाची दुसरी राणी. ही कनोजचा राजा जयचंद्र गाहडवाल याची कन्या. जयचंद्र कर्तृत्ववान् व सामर्थ्यवान होता.

## पृथ्वीराज संयोगिता

—चक्रवर्तित्वाबाबत जयचंद्र व पृथ्वीराज यांमध्यें स्पर्धा होती. जयचंद्रानें संयोगितेचें स्वयंवर मांडलें. त्यासाठीं त्यानें सर्व राजे बोलावले पण पृथ्वीराजाला आमंत्रण केलें नाहीं. इतकेंच नव्हे त्याचा शक्य तितका अपमान करण्यासाठीं त्याची प्रतिमा करून ती मंडपाच्या प्रवेशद्वारापाशीं



अनुक्रमणिका

भालदार म्हणून उभी केली. पृथ्वीराजाशीं आपलें लग्न झालें असें संयोगितेला स्वप्न पडलें होतें. बापाच्या कारवाईची तिला माहिती होतीच. स्वयंवराचे समारंभासाठीं सर्व राजे जमल्यानंतर तिनें पृथ्वीराजाच्या प्रतिमेच्या गळ्यांत माळ घातली. तोंच पृथ्वीराज तेथें सैन्यासह हजर झाला व विरोधकांचा पराभव करून तिला घोड्यावर घालून निघून गेला. हा प्रसंग ११८५ च्या सुमारास झाला असावा.

## बाजीराव–मस्तानी

मराठे व रजपूत यांचें ऐक्य होऊन माळवा प्रांत हातचा जाण्याचा प्रसंग आला आणि बुंदेलखंडचा राजा छत्रसाल प्रबल झाला तेव्हां त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं बादशहानें अलाहाबादचा सुभेदार महंमद बंगश पठाण याची नेमणूक केली. छत्रसालानें मदत मागितल्यावरून बाजीराव फौजेसह बुंदेलखंडांत गेला. जैनपूरच्या लढाईंत (१७२९) बंगशाचा पूर्ण पराभव करून त्यानें बुंदेलखंडांतून बादशाही सत्तेचें उच्चाटन केलें. म्हणून छत्रसालानें बाजीरावाला पुत्र मानून राज्याचा तिसरा हिस्सा दिला. आणि आपल्या मुसलमान रक्षेची मुलगी मस्तानी त्याला नजर केली.

मस्तानीचें सौकुमार्य अद्वितीय होतें व सौंदर्य अद्वितीय होतें. नृत्य व संगीतांत ती प्रवीण होती. तिनें बाजीरावाचें चित्त आकर्षून घेतलें. मस्तानी प्राप्त झाली तेव्हां बाजीराव ऐन ज्वानींत होता. त्यानें तिच्याकरतां शनिवारवाड्यांत स्वतंत्र महाल बांधवला. दंतकथा सांगते कीं तिच्या नादानें तो मद्यप्राशन व मांसाशन करूं लागला. स्वारींतही तो तिला विसंबत नसे. शाहू छत्रपतीच्या भेटीसाठीं साताऱ्यास जातांना तिला बरोबर नेलं होतें. म्हणून शाहूनें त्याची निर्भत्सना केली आणि पेशव्यांच्या सावकारांनीं त्याची कानउघडणी केली. पत्नी, पुत्र व बंधु यांनीं त्यांची ताटातूट करण्यासाठीं अनेक मसलती केल्या, या कारवायामुळें बाजीराव वैतागला व पाटसास जाऊन राहिला. इकडे चिमाजीनें मस्तानीला कैदेंत ठेवलें. मोठ्या युक्तीनें आपली सुटका करून घेऊन ती बाजीरावाकडे गेली. पुढें बाजीराव नासीरजंगावरील मोहिमेवर गेला असतां चिमाजीनें सांगितल्यावरून नानासाहेबानें मस्तानीला पर्वतीच्या बागेंत युक्तीनें नेऊन कैद केलें. मुंगीपैठणच्या तहानंतर बाजीराव नर्मदा कांठीं रावेर येथें असतां एकाएकीं मरण पावला. दंतकथा सांगते कीं ही बातमी समजतांच मस्तानी सती गेली.

## बाजबहाद्दर व रूपमती

बाजबहाद्दर हा माळव्याच्या अखेरचा सुल्तान (१५५५–१५६४). वडील भावाचा विश्वासघातानें खून करून त्यानें राज्य बळकावलें. राज्यारोहणानंतर त्यानें आजूबाजूचा बराच मुलूख काबीज केला. गोंडवनची राणी दुर्गावती हिनें पराभव केल्यानंतर त्यानें युद्धसंन्यास घेतला आणि मंडू येथें विलासांत व संगीतसाधनेंत कालक्रमणा करूं लागला.

एकदां हा नर्मदाकांठच्या जंगलांत शिकारीला गेला असतां घोडा उधळल्यामुळें परिवाराशीं चुकामूक झाल्यानें हा मार्ग काढण्यासाठीं हिंडू लागला. एकाएकी स्वर्गीय संगीताचे स्वर त्याच्या कानीं आले. तिकडे जाऊन पाहतो तों काय? नदीकांठच्या मंदिरासमोर वृक्षाखालीं शिलातलावर बसलेली एक सुंदर तरुणी निसर्गदेवतेचें स्तवन करीत आहे. तो चकित झाला; तिचें सौंदर्य पाहून मोहित झाला. तिचें गायन ऐकून देहभान विसरला. त्यानेंही कांहीं रागरागिण्या आळविल्या. संगीत समाधी उतरल्यानंतर त्यांनीं परस्परांचा परिचय करून घेतला.

ही सारंगपूरच्या रजपूत ठाकुराची कन्या. बाजबहाद्दरानें तिला मागणी घातली. तिनें ती अमान्य केली. त्यानें फारच गळ घातली तेव्हां तिनें अशक्य अट घातली. नर्मदा मांडवगडावर नेलीत तर मी तुमच्याशीं लग्न करीन. परंतु बाजबहाद्दरनें हेंही साधलें.

विवाहानंतर सुल्तान रूपमतीच्या सान्निध्यांत संगीत साधनेंत धुंद झाला; राज्यकारभाराकडे लक्ष देईना. यामुळें अधिकारी मातले. माळव्यांत अंदाधुंदी माजली. इकडे अकबरानें माळवा जिंकण्याची कामगिरी अधमखानावर सोंपविली. हा अकबराचा दूधभाऊ. त्यानें सारंगपुरास वेढा घातला. लढाईंत बाजबहाद्दराचे असंतुष्ट अफगाण सरदार उदासीन राहिले. पराभव झाल्यावर बाजबहाद्दरानें पळ काढला. त्याचा जनाना अधमखानाचे हातीं पडला.

फरारी होण्यापूर्वी त्यानें आपल्या विश्वासांतल्या एका खोजाला सांगून ठेवलें होतें कीं जनाना शत्रूच्या हातीं जाण्याचा प्रसंग आला तर साऱ्या राण्यांना मारून टाक. या आज्ञेनुसार त्यानें रूपमतीवर तरवारीचा वार केला. ती जखमी झाली, पण मेली नाहीं.

अधमखानानें उत्तम शस्त्रवैद्यांकरवीं तिची शुश्रूषा केली. प्रियकराच्या विरहाचें दुःख ताजें आहे तोंवर प्रकृति दुरुस्त होतांच बाजबहाद्दराकडे तिची रवानगी करावयाचें त्यानें तिला आश्वासन दिलें. तिनें या आजारीपणांत बाजबहाद्दरावर अनेक गाणीं रचलीं. बाजबहादुर निवर्तला अशी वार्ता कळल्यावर तिनें खालील दोहा रचला.

तन में जियरा रहत है, मांगत है सुख राज
रूपमती दुखिया भई, बिना बहादुर आज ॥

रूपमती हिंडती फिरती झाल्यावर तिला पाठविण्याविषयीं तो टाळाटाळ करूं लागला. तिनें वेत ठरविला व त्याच्याशीं संकेत ठरविला. त्याच्या स्वागतासाठीं शामियाना शृंगारून तिनें वेषभूषा केली आणि जणूं त्याची वाट पहात ती एका कोंचावर पडून राहिली. ठरल्या वेळीं अधमखान वेष पालटून आला. तिच्या दासींनीं त्याला शामियान्यांत नेलें. त्यावेळीं तिचे प्राण तिच्या कुडींतून निघून गेले होते.

• • •

अनुक्रमणिका




शार्लोट लेकच्या कडेनें वीणा रमत गमत चालत असतां पिसारनाथच्या दिशेनें जाणाऱ्या त्या स्त्रीची पाठमोरी आकृति तिला पुन्हां पुन्हा दिसली आणि तिला वाटलें कीं ही आकृति आपल्या परिचयाची आहे. काल "हॉटेल माथेरान"च्या हिरवळीवर तिनें हीच आकृति पाहिली होती. तेव्हांहि ही आकृति तिला परिचित वाटली होती व तेव्हांहि ही आकृति तिला पाठमोरीच होती. अगदीं थोड्याच वेळापूर्वी "लॉर्डस् हॉटेल 'कडून "पे मास्टर पार्क" कडे ही आकृतीच जात होती. वीणा तेव्हां "लॉर्डस्"च्या आवाराबाहेर पडत होती. तेव्हाही ह्या स्त्रीची तिच्याकडे पाठ होती, व त्या दोघींत अंतरहि थोडकें नव्हतें. तेव्हांहि वीणाला वाटलें होतें, कीं ह्या आकृतीला आपण ओळखतों.

वीणानें आपली गति वाढविली. सभोंवार सारें हिरवेंचार होतें. तळ्याचें पाणी मंदपणें हेलावत होतें. डोंगरमाथ्यावर धुकें तरंगत होतें. वातावरणांत अतिशय मधुर असा गारवा होता. माथेरानचें तें जंगल हिरव्या गोड गंधानें [illegible]ळत होतें.

वीणा आपलीं पावलें झपाट्यानें उचलूं लागली. पांढऱ्या साडींतील ती आकृति आतां पिसारनाथ मंदिराच्या अगदीं जवळ जाऊन पोहोंचली होती. वीणा गति वाढवीत होती व तिच्या पावलांचा ध्वनी तिलाच ऐकूं येत होता. शार्लोटी धरणाचे दोन्ही कांठ जवळजवळ निर्मनुष्य होते. दोन दिवसांपूर्वीच येथें अकालीं पाऊस पडून गेला होता व ऑक्टोबर मोसमाच्या खऱ्या गर्दीला अद्याप प्रारंभ झालेलाच नव्हता. ही पांढऱ्या साडींतली बाई तेवढी तिला पुन्हां पुन्हां दिसली होती. एरवीं गर्दींतहि शांत भासणारें माथेरान आतां अगदींच निवांत होतें. पिसारनाथाच्या त्या परिसरांत तर गाढ शांति मूर्तिमंत दाटून र[illegible] होती. वीणेच्या पावलांनीं काय ती शांती ढवळली जात होती. डो[illegible] आणि रानांना लपेटून टाकणाऱ्या व आकाश आणि धरित्री त्या[illegible] टाकणाऱ्याच्या शांततेचें वीणाला थोडें भय वाटत होतें. एर्वींतेर्वीं तिच[illegible] आयुष्यांत सारी शांतताच तर होती. दोन वर्षांपूर्वी तिनें मुकुंद[illegible] घटस्फोट दिला तेव्हां तिच्या आयुष्यांत अखेरचें वादळ झालें होते[illegible] त्यानंतर सारी शांतताच होती. अगदीं स्मशानशांतता! तर मग त्य[illegible] शांततेंतून ह्या शांततेंत येण्याचे कष्ट वीणानें कां घेतले होते? ।

इथली ही शांततासुद्धां कांहीं कमी भीतिप्रद नव्हती.

वीणानें आजूबाजूला पाहिलें, वर खालीं पाहिलें. डोंगर, रानें, आकाश व तें तळें अगदीं शांत होतें. त्या अफाट आकाशाखालीं, त्या डोंगर दऱ्यांच्या व गर्द झाडीच्या सहवासात एकटें असण्याचीहि तिला क्षणभर भीति वाटली. तिच्या अंगावर फसला तरी कांटा येऊन गेला. घाबऱ्या घुबऱ्या तिनें समोर पाहिलें. दूरची का होईना पण त्या अथांग एकांतात त्या अज्ञात आकृतीची काय ती तिला सोबत होती व ती आकृति आतां डाव्या अंगाच्या पिसारनाथाच्या मंदिराकडे वळत होती.

वीणा आणखी झपाट्यानें चालूं लागली. शेजारच्या [illegible] तळ्यांत तिचें प्रतिबिंब धांवत होतें. आपलेंच प्रतिबिंब पाहून ती दचकली व [illegible] आणखी



अनुक्रमणिका

वेगानें चालूं लागली. एका अज्ञात स्त्रीचा अशा प्रकारें पाठलाग करणें चमत्कारिकच होतें. पण तिला त्या बाईचा चेहरा पाहावासा वाटत होता. समजा ओळखीची निघाली तर ह्या अनोळखी गिरिग्रामांत तेवढीच सोबत मिळाली असती!

एकूण वीणाला सोबत हवी होती व तिला आपल्या एकटेपणाचें भय वाटत होतें. वीणाला स्वतःचेंच हंसू आलें. खरोखरच तिचें वागणें फारसें सुसंगत नव्हतें. ती स्वतःला अत्याधुनिक पुरोगामी महिला म्हणवीत असे. तिच्या आयुष्यांतलें शेवटचें वादळ झालें तेव्हां तिनें मुकुंदला कडाडून सांगितलें होतें, "मला कशाचं भय नाहीं. साता जन्मांची सोबत तर मला मुळींच नको. तुझ्यासारख्या दारू पिणाऱ्या, मारकुट्या माणसाच्या सहवासांत राहण्यापेक्षां जन्मभर मी एकटी राहीन......!"

आणि आतां ती एकटी होती. नगराच्या छोट्या एकांतांतून माथेरानच्या मोठ्या एकांतांत ती आली होती. आणि आतां इथें ती संगत शोधूं लागली होती! आभाळ, डोंगर, दऱ्या आणि पाणी ह्यांनींच तिच्या मनांत भय उत्पन्न केलें होतें, एक विचित्र खिन्न हुरहुर उत्पन्न केली होती. आणि म्हणून पोरकटपणें ती एका अनोळखी बाईचा पाठलाग करीत होती.

"छे: छे:! भय हें कांहीं ह्या एकटेपणाचें कारण नव्हे!" स्वतःच्या पावलांची गति वाढवीत ती स्वतःचीच समजूत घालीत होती. "मला त्या बाईची आकृती ओळखीची वाटली. साहजिकच मला वाटलें, कीं त्या बाईचा चेहेराहि पाहून टाकावा. कुतुहल उत्पन्न होणें, आणि कुतुहल पुरवून घेणें, हा मुळीं मनुष्यस्वभावच आहे!

आतां ती पिसारानाथ मंदिराच्या अगदीं जवळ येऊन पोंहचली. मंदिरांतल्या घंटेचा नाद तिला ऐकूं येत होता. पांढऱ्या पातळांतली ही बाई मोठी भाविक असली पाहिजे. केवढ्यानें तरी ती घंटा वाजवीत होती. देवाला येवढं तिला मागायचं तरी होतं काय, आणि सांगायचं तरी होतं काय? ती बाई तशी कांहीं अडाणी दिसत नव्हती. ती सुसंस्कृत असली पाहिजे, सुशिक्षित असली पाहिजे हें तिच्या चालण्यावरून ओळखायला येत होतं. आणि तरी ती आपली सकाळच्या प्रहरीं देवाच्या दारांत धरणं धरून बसली होती. दहा मिनीटं होऊन गेलीं, तरी ती अद्याप आंतच रेंगाळत होती. तिथं काय ती एखादं स्तोत्र म्हणत बसली होती कीं प्रदक्षिणा घालीत बसली होती? वीणानं मनगटांतल्या घड्याळाकडे पाहिलं. आणखी पांच मिनीटं निघून गेलीं होतीं. अद्यापहि ती बाई बाहेर येईना. काय चमत्कारिक बाई होती! त्या देवासमोर काय ती धरणं धरून बसली होती? देवधर्मांचं वीणाला हंसायला येत असे. मुकुंदच्या आणि तिच्या भांडणांचा हा एक नेहमींचा विषय होता. मुकुंद नेहमीं तिला म्हणायचा, "घरांत देव्हारा मांड. जिथें घर आहे तिथें देव्हारा पाहिजे!"

"माझा देवावर विश्वास नाहीं!" वीणा उत्तर द्यायची.

"विश्वास नसेल तर नुसता उपचारं म्हणून कितीतरी गोष्टी तुला करतांना मी पाहतों. तसंच म्हणशील तर कपडे घालण्यावर सुद्धां तुझा विश्वास नाहीं! ह्या देशांत कपडे नकोतच असं तुला वाटतं, तरी कपड्याचे ढीग अंगावर घालतांना मी तुला पाहतों. नको असलेल्या पाहुण्यांचं हंसून स्वागत करताना पाहतों, उपचार म्हणून, व्यवहार म्हणून, स्वार्थ म्हणून कितीदां तरी मी तुला खोटं बोलतांना पाहतों. विश्वासाच्या गोष्टी तूं कुणाला सांगतेस?"

"मी खोटं बोलते?" वीणानं फणकाऱ्यानं विचारलं होतं.

"अर्थात् बोलतेस! जिथं खोट्याशीं भांडायला पाहिजे तिथं खोट्याशीं तडजोड करतेस. कारण तिथं तुझा स्वार्थ दुखावण्याची शक्यता असते. तुला त्रास होण्याची शक्यता असते. आणि जिथें खरोखर तडजोड करायला कांहीं प्रत्यवाय नाहीं, तिथें तूं भांडत बसतेस! घरांत देव्हारा मांडायचा कीं नाहीं ह्याविषयीं मोठा तत्वनिष्ठेचा आव आणून वाद घालतेस! कारण समाजातल्या एखाद्या चालत्या बोलत्या माणसाकडून तुझी अडवणूक होऊं शकेल हें तुला कळतं. देवाकडून कांहीं तुला त्रास होऊं शकणार नाहीं अशी तुझी कल्पना आहे! म्हणून उपचारासाठीं सुद्धा देव मांडायची तुझी सिद्धता नाहीं!"

"नुसतं उपचारापुरतं घरांत देव मांडायला तुम्हाला कमीपणा नाहीं वाटत?"

"उपचारापुरते तूं घरांत देव मांड असं माझं म्हणणं आहे. घरांत रेडिओ, सोफासेट, फ्रिज सारं तुला पाहिजे. कांहीं उपयोगासाठीं पाहिजे आणि कांहीं देखाव्यासाठीं पाहिजे. मी म्हणतों देखाव्यासाठींच तूं देव्हाराहि मांड!"

"देवांच्या विषयांत देखावा करायला सांगता आहांत तुम्हीं मला?"

"होय! अखेर हें एका हिंदुचं घर आहे. मराठी माणसाचं घर आहे. सोफा सेट, रेडिओ, फ्रिज, खिस्त्याच्या घरांत असतात. हें हिंदुचें घर आहे, म्हणून त्याची इथें कांहीं खूण पाहिजे. एक देव्हारा पाहिजे इथें. त्याशिवाय घराला पूर्णता नाहीं!"

"बुद्धीला पटत नाहीं तुमचं बोलणं! मी असं ऐकते, कीं पाश्चात्य देशांत......"

हाताची एक हालचाल करून मुकुंदनं जणूं तिचे शब्द झटकले व तो म्हणाला "पाश्चात्य देशाविषयीं तूं वाचलं असशील, पण पाश्चात्य देश मी पाहिले आहेत. उगाच उसन्या बुद्धिवादाच्या गोष्टी तू सांगू नकोस मला. ब्रिटन जर्मनी सारखीं पाश्चात्य राष्ट्रं जीव पणाला लावून स्वत्व जपत असतात. सोशालिस्ट ॲटली चर्चमधें जातो, इंग्लंडची राणी स्वतःला खिस्ती धर्माची संरक्षक म्हणवते. युद्धाची वेळ आली म्हणजे रशिया स्लाव वंशाच्या श्रेष्ठ परंपरेचा पुरस्कार करूं लागतो. स्वत्वाचा प्रश्न आला म्हणजे तिथें कुणी बुद्धिभेद करणारा मूर्ख बुद्धिवाद सांगत नाहीं, तुलाहि मी तसा बुद्धिवाद सांगूं देणार नाहीं."

"कारण?"

"कारण तो बुद्धिवाद खोटा आहे. जगांत तूंच काय एकटी बुद्धिमान् आहेस? आईनस्टाईननं आपली आस्तिक्य बुद्धी प्रकटपणानं सांगितली आहे. टॉयनबीनं धर्माशिवाय माणसाचे प्रश्न सुटण्याचा दुसरा मार्गच नाहीं, असं प्रतिपादन केलं आहे!"

"एखादी गोष्ट आईन्स्टाईन किंवा टॉयनबीनं सांगितली म्हणून कांहीं मी ती ऐकणार नाहीं!"

"तर मग ती गोष्ट मी सांगतों म्हणून तरी ऐक!" मुकुंद सीमेच्या तळमळीनं बोलत होता. जवळ जवळ विनवणीच्या स्वरांत बोलत होता. "विचार कर वीणा, उद्यां आपल्याला मुलं झालीं म्हणजे त्यांच्यावर संस्कार तरी कशाचा व्हायचा? त्या फ्रिजचा, सोफासेटचा कीं मोटारीचा? फुलांनीं भरलेल्या देव्हाऱ्यासमोर मुलं "शुभं करोति" म्हणत बसलीं..."

"फार पुढच्या गोष्टी बोलत आहात. मला मुळीं आतां मुलं नकोच आहेत आणि मुलं होतील तेव्हां त्यांच्यावर संस्कार करायला नको आहे!"

"संस्कार करणं हेंच आईचं मोठ्यांत मोठं काम असतं वीणा. म्हणून

म्हणतों कीं [ह्या] घरांत तूं देव्हारा मांडायला पाहिजेस. तूं देवावर विश्वास ठेव असा माझा मुळींच आग्रह नाहीं. आग्रहानं पटवून द्यायची ती मुळीं गोष्टच नाहीं. [पण] बायकांनीं घराचं वळण राखलं पाहिजे. देव मांडले पाहिजेत, मग वार [केले] पाहिजेत. बायकांचं कामच आहे तें."

"बायकांचं काम आणि पुरुषांचं काम असा भेद मी मानीत नाहीं." वीणानं तुटकपणानं उत्तर दिलं होतं.

"तूं मानला नाहींस तरी तो भेद आहेच वीणा! तुझ्या माझ्यांत भेद आहे!"

"खरंच आहे!" उपरोधानं वीणानं उत्तर दिलं होतं.

"खरंच आहे." मुकुन्दचा स्वर कठोर होत होता. "म्हणून मी म्हणतों गोडी गुलाबीनं तूं ह्या घरांत देव मांडणार नसलीस तर मी ते मांडीन."

"बळजोरीनं?" वीणानं चिडून विचारलं होतं.

"अवश्य!"

"कां?"

"मला इथें देव हवे आहेत म्हणून!"

"तर मग मी ते फेकून देईन!"

"फेकशील? कां?"

"मला इथें ते नको आहेत म्हणून!"

वीणाचं तें उत्तर ऐकून मुकुंदचे डोळे लाल झाले होते. एरवीं मुकुंद दिसायला चांगला होता. पुरुषी वळणाचं त्याचं बळकट सौंदर्य होतं. पण तो चिडला म्हणजे मात्र भयंकर दिसे. आतांहि तो भयंकर दिसत होता. त्याच्या मुठी वळत होत्या, चेहेरा टचटचत होता व डोळे लाल झाले होते. त्याचं तें रूप पाहून वीणा आणखीनच चेकाळली. आव्हानपूर्वक त्याच्या अगदीं समोर येत ती म्हणाली, "काय, मारायचं आहे?"

कष्टानें आत्मसंयमन करीत घोगऱ्या स्वरांत तो उत्तरला, "आवश्यकता पडल्यास!" आणि तोंड फिरवून तो एकाएकीं निघून गेला. त्याच दिवशीं त्यानं घरांत देवांची प्रतिष्ठापना केली. आणि त्याच दिवशीं तिनं त्याचे देव गुंडाळले. मुकुन्द बाहेरून घरीं आला, त्यानं रिकामा देव्हारा पाहिला आणि तिच्यावर प्रहारामागून प्रहार केले. तो आज परत एकदां दारू पिऊन घरीं आला होता आणि तिच्या चेहेऱ्यावर प्रहार करीत होता. त्या प्रहारांनीं तिचा संसार मोडला, तिचं लग्न मोडलं. तिनं मुकुंदपासून घटस्फोट घेतला आणि ती मोकळी झाली...

'घणाण्-घणाण्-खण्-खण्!" दचकून वीणा भानावर आली. देवळांतली घंटा वाजत होती. आपण कुठें आहोंत हेंच वीणाला क्षणभर कळेना. भूतकाळांत ती किती तरी दूर निघून गेली होती. आणि हें काय? तिच्या डोळ्यांच्या कडा कां ओलावल्या होत्या? तर मग काय त्या साऱ्या गोष्टींनीं तिच्या मनावर नकळत येवढा परिणाम केला होता?—छीः-छीः-छीः! ही मात्र अगदींच लज्जेची गोष्ट होती. देवळांत पुन्हा एकदां घंटा वाजली. वीणाचें मन त्या नादानें विटून गेलें. त्रासून गेलें. ती खरोखरच इथें कां उभी होती? त्या पांढऱ्या पातळांतल्या बाईचा चेहेरा पाहून तिला काय करावयाचें होतें? आपल्या दुःखाची देवापाशीं दाद मागणाऱ्या दुबळ्या स्त्रियांच्या वर्गातली ती बाई दिसत होती. तिचा चेहेरा पाहाण्याचं वीणाला कांहीं कारणच नव्हतें. येथें खुळ्यासारखें राहण्याचेंहि कांहीं कारण नव्हतें. आतां तिनें येथून परतावयास पाहिजे होतें. अगदीं उलट दिशेनें! पण हा विचार करीत असतांच वीणा हळूहळूं चालूं लागली. तिनें दिशा घेतली तीहि अगदीं बरोबर तिच्या मनाविरुद्ध! बाकी आपल्या मनासारखें काय आहे हेंच जणूं तिला त्या क्षणीं कळत नव्हतें. देवळांत घंटा वाजत होती व वीणाच्या चेहेऱ्यावर एक बळकट पुरुषी हात प्रहार करीत होता. त्या तंद्रींतच ती चालत होती. तिचा वेग मंदावला होता. डोळे स्वप्नांत असल्यासारखे दिसत होते. आणि एकेका पावलानें ती चालत होती. न कळतच तिनें देवळाची दिशा घेतली होती. ती डाव्या अंगाला वळली होती. तिनें देवळाच्या दारांत पाऊल ठेवलें होतें...

आणि मग पुन्हां एकदां घंटा खणाणली. एकाएकी वीणा भानावर आली. दोन चार पोरें पिसारनाथाला प्रदक्षिणा घालीत होतीं व घंटा बडवीत होतीं. प्रथम तिला दिसलीं, तीं तीं धांवत पळत प्रदक्षिणा घालणारीं पोरेंसोरें. मग तिला दिसली देवासमोर हात जोडून उभी असलेली ती पांढऱ्या साडींतली बाई! ती बाई वीस पायऱ्यांवर होती! आणि अद्यापहि पाठमोरीच होती! तेथून पायरी पायरीनें वीणाची दृष्टी घरंगळत खालीं आली आणि—आणि अरे देवा! हें ती काय पहात होती? खालच्या पायरीवर उभी असलेली ही पाठमोरी आकृति कुणाची होती? ते रुंद खांदे, तो भरदार देह, वाऱ्यावर उडणारे दाट कोरडे केस, तो गव्हाळा वर्ण—अरे देवा! हा तर मुकुंद होता. मुकुंद, मुकुंद! हा इथें कधीं आला? येताना कुठं दिसला नाहीं? देवाकडे नुसतंच तोंड करून हा काय करीत होता? हा तर चौथराही चढून गेला नव्हता. पहिल्या पायरीवरच हा उभा होता! आणि त्या पाठमोऱ्या स्त्रीकडेच तो टक लावून पहात होता! ती त्याची कोण होती? कोण होती ती त्याची?

"जय पिसारनाथ! जय पिसारनाथ!" तीं धांवणारीं पोरें ओरडलीं. व तेथें लावलेल्या नवसाच्या घंटा त्यांनीं खळखळा वाजविल्या.

कुंठित झालेली वीणा दचकली. एकच विचार लाटेसारखा तिच्या मनांत धांवत आला. त्यानें ह्या क्षणीं मागें वळून पाहिलें तर!

आणि तोंड फिरवून ती झपाट्यानें दारबाहेर पडली. जवळ जवळ धांवतच! कुठल्याहि क्षणीं त्याचे डोळे मागें फिरतील आणि गोळीसारखे आपलें शरीर भेदून जातील असें तिला वाटत होतें. "एको पॉइण्ट"कडे तोंड करून ती झपाट्यानें "शार्लोट लेक" चा बांध ओलांडू लागली. बांधावरून पाण्याची बारीकशी चादर वहात होती. तरीहि घाईनं तें पाणी तुडवीत वीणा पाय उचलत होती. मुकुंदचे डोळे आपल्या मागोमाग येत आहेत असें तिला वाटत होतें. त्याचे ते पिंगट डोळे मोठे भेदक होते. ते आपला पाठलाग करत असतील ह्या कल्पनेनें तिचा जीव बावरा होत होता. वळून पहावेंसें वाटत होतें. तरीहि वीणेला वळून पाहण्याचें धाडस मात्र झालें नाहीं. तिनें तळ्याचा बांध बहुतेक ओलांडला होता. देवळांतल्या घंटा अस्पष्टपणें ऐकूं येत होत्या. वीणेचे ओचे ओले झाले होते. तिला धांप लागली होती. तिची गति आतां आपोआपच कमी झाली. खरोखरच आपण अशा कां पळत आहोंत? तिनें स्वतःला प्रश्न केला. मुकुंदनें आपल्याला पाहिलें असतें तरी त्यामुळें काय मोठेसें बिघडणार होतें? तो काय आपल्याला खाऊन टाकणार होता? आपलें हें वागणें खरोखरच एखाद्या सामान्य बाईसारखें झालें. आणि या विचारासरशीं वीणा जवळ जवळ थबकली. सावकाश तिनें मागें वळून पाहिलें! बापरे! मुकुंद तळ्याच्या बांधाकडेच येत होता. आणि त्याच्या मागोमाग येत होती ती बाई—वीणेच्या मनांतले सारे विचार क्षणार्धात पुसून गेले. विजेचा धक्का बसल्याप्रमाणें ती पुन्हां झपाझप चालूं लागली. ती मार्ग सोडून उजव्या दिशेला वळली व रान तुडवत तळ्याच्या कांठानें झाडींतून चालूं लागली. तिला हळूं हळूं हंसणें ऐकूं येऊं लागलें. आतां तिनें कच्ची वाटहि सोडली आणि ती धांवत धांवत दाट झाडींत शिरली. तिच्या ओल्या ओच्यांत लाल माती लागत होती. कपाळावर घाम उभा राहिला होता. तरी वेली आणि झुडपें कडेला सारत ती धडपडत होती. तिला ऐकूं येणारे हास्याचे स्वर आतां अधिकच जवळ आल्यासारखे वाटत होते. निश्चित हें उंच हंसणें मुकुंदचेंच होतें! आतां तिनें लपायचें तरी कुठें? गवतांतून एक आसनासारखा खडक डोकावत असलेला तिनें पाहिला. त्या खडकाच्या मागें लपायला म्हणून ती गेली. आणि झुडुपांनीं झांकलेल्या खळग्यांत अलगद जाऊन पडली. वीणा खळग्यांत गेली व कडेचें गवत आणि झुडुपें पुन्हा मिळून आलीं. खळगा फारसा खोल नव्हता. आंतल्या गवतावरच ती पडली होती. आणि स्तब्धपणें वरच्या झुडुपांकडे पहात होती. तर मग ती मुकुंदपासून पुन्हा पळाली होती! कां म्हणून पळाली होती ती त्याच्यापासून? कोण लागत होता तो तिचा? आणि ह्या प्रश्नापाशीं ती थबकली. कोण लागत होता म्हणजे? नवरा लागत होता! स्त्रीनें पुरुषाला जें कांहीं देणें शक्य असतं तें सारं तिनें त्याला एके काळीं दिलें होतें! होय! एके काळीं! तिचें दुसरें मन म्हणत होतें—एके काळीं तो असेल तिचा नवरा, पण आतां काय त्याचें?—आतां काय त्याचें? पुन्हा तिचें दुसरें मन म्हणत होतें—आतां काय त्याचेंचा अर्थ काय? अशा गोष्टी का कधीं पुसून टाकतां येतात? कितीहि नाहीं म्हटलें तरी त्या गोष्टी आपल्या खुणा ठेवूनच जातात! उगांच का ती मुकुंदपासून आज पळाली होती?—पळाली हा गाढवपणा झाला! तिला पळण्याचें कारणच काय होतें मुळीं? पुरुष नाहीं का बायकांना टाकत? ते नाहींत का बायकांना विसरत? मग तीच त्याला कां विसरूं शकत नव्हती? हे सारे जुने संस्कार आणि जुनीं बंधनें ती झुगारून देणार होती. ती त्याला विसरणारच होती. वीणा हळूंहळूं उठूं लागते न लागते तोंच अगदीं जवळून हंसण्याचा स्वर आला, एकच

# शल्य



—मंगेश पाडगांवकर

मीं मातीवर पाय टाकिला
आणि टाचण्या पायीं घुसल्या;
सहज पाहिलें मीं आकाशीं
लाख टाचण्या नेत्रीं रुतल्या!!

जनसंमर्दीं चहुंबाजूनीं
शब्द टाचण्या होउनि आले;
...अस्तित्वाची जखम माझिया,
वाऱ्याचेही डोळे भरले!!

मनीं शून्यता गारुड्यापरी
ओकु लागली फक्त टाचण्या...
तें टोकेरी चेटुक सजलें
रन्ध्रारन्ध्रामध्यें दंशण्या!!

लाख टांचण्यांच्या अग्रांवर
भीष्म होउनी पडलों मी; पण—
इच्छेला टाचण्या बोचल्या...
कुठली गंगा? कुठला अर्जुन?

• • •

नव्हे तर दोन स्वर. एक स्त्रीचा व एक पुरुषाचा. पुरुषाचा स्वर तर तिच्या ओळखीचा होताच, पण स्त्रीचा स्वरहि तिला परिचित वाटत होता. स्त्रीची ती आकृतीहि तिला ओळखीची वाटली होती आणि हा स्वर तर तिच्या ओळखीचा होताच. हंसण्याचा स्वर थांबला आणि पावलांचा ध्वनी तिच्या जवळ येऊं लागला. होय, तीं दोघें त्याच दिशेनें येत होतीं. त्या खडकाकडे. आतां तिला त्या खळग्यांतून निसटणेंहि

अशक्य होतें. आपल्या नवऱ्यापासून ती पळाली होती व त्याच्यापासून ती लपली होती. वीणा हळूं हळूं पुन्हा त्या खळग्यांत कलती झाली. आतां तीं दोघें त्या दगडावर येऊन बसलीं होतीं. तिच्यापासून अगदीं दोन फुटाच्या अंतरावर. मुकुंद तिच्या इतक्या जवळ येऊन ठेपला होता. कांहीं क्षण शांतता होती. श्वास घेण्याचेंसुद्धा वीणेला भय वाटत होतें. ती नुसती कान देऊन ऐकत होती. मग मुकुंदाचे शब्द उमटले,

"अग कांहीं बोल ना!"

"आज फार हंसलों आपण." स्त्रीच्या स्वरांत उत्तर आलें. वीणा विचार करत होती व ऐकत होती. हा स्वर निश्चित तिच्या ओळखीचा होता.

"फार हंसलों म्हणजे कांहीं बोलूं नये वाटतं?"

"आतां मला कांहीं बोलावंसं नाहीं वाटत!"

"मग काय करावंसं वाटतं?"

"नुसतं तुमच्याकडे पहात बसावंसं वाटतं!"

"येवढं पुरेल तुला?"

"अगदीं पुरेल!"

"जन्मभर?"

"सातजन्म पुरेल!"

"पहाण्यासारखं आहे काय माझ्यांत?"

"नाहीं काय? इतकं सुख मला कधीं जन्मांत नव्हतं मिळालं!"

"खरं?"

"अगदीं खरं! तुम्हाला शंका कां आली?"

"नाहीं, मला असं वाटलं...!"

"काय वाटलं?..."

"मला असं वाटलं कीं कुठल्याहि बाईला सुख देणं मला साधणारच नाहीं कीं काय?"

"मला तर वाटतं कीं सुखाशिवाय तुम्ही कुणाला दुसरं कांहीं देऊंच शकणार नाहीं!"

"असं कां वाटलं तुला?"

"माझा अनुभव. नाहीं तर तुमच्यासारख्यानं माझ्याशीं लग्न करावं, असं माझ्यांत होतं काय? रूप नाहीं—"

"कोण म्हणतो रूप नाहीं?"

"गुण नाहींत."

"कोण म्हणतो गुण नाहींत?"

"पैसा नाहीं..."

"मी तर तुझ्याइतकी श्रीमान् बाई दुसरी पाहिलीच नाहीं!"

"हें आपलं उगींच, तुम्ही प्रेमामुळं अलंकारिक बोलतां आहांत. खरं म्हणजे माझ्यापाशीं रूप नाहीं, गुण नाहींत, पैसा नाहीं आणि वय झालेलं!"

"एकुणतीस हें काय फार मोठं वय झालं? मी तर पस्तीसचा आहे!"

"पण तुम्ही पुरुष आहांत!"

"म्हटलं तर कांहीं अंतर नाहीं. म्हटलं तर फार मोठं अंतर आहे. बाई पुरुषाविना सुखी व्हायची नाहीं. बाईवर प्रेम करणारा पुरुषच पाहिजे. दोन बायकांचं सहसा जमत नाहीं! पुरुषा पुरुषांत जशी मैत्री असते तशी बायकांत सहसा सांपडत नाहीं! पुरुष जास्त उदार असतो. खेळाडू असतो, क्षमाशील असतो. बायका बहुधा तशा असत नाहींत!"

"सुशिक्षित बायकासुद्धां?"

"हो—अशिक्षित बायकांना उगींच आपलीं नांवं ठेवायचीं. पण बायकी दोष सुशिक्षित बायकांत जास्त प्रमाणात सांपडतात. निंदा, मत्सर, मूर्खपणा-खोटेपणा ह्यापासून सुशिक्षित बाई सुटलेली नाहीं."

"मला तर तुझ्यांत कुठें मत्सर, मूर्खपणा, खोटेपणा दिसत नाहीं?"

"तेंच तर सांगते मी! तुम्ही माझे नुसते गुणच पहाल. बाईला मात्र माझे दोष दिसतील. तुमच्याशीं मी जसं वागते तसं कदाचित् दुसऱ्या बाईशीं मला सुद्धां वागतां यायचं नाहीं! म्हणून म्हणते, पुरुषाविना बाईला कधीं सुख लागायचं नाहीं! गेल्या वर्षांत जेवढं सुख मी पाहिलं तेवढं उभ्या जन्मांत कधीं पाहिलं नव्हतं. जें कांहीं झालं तें पुष्कळदां मला खरंच वाटत नाहीं. सगळं स्वप्नांत झाल्यासारखं वाटतं!"

"झालं खरंच सगळं सिनेमांतल्यासारखं! सिमन्याला घोड्यावरून रपेट करणाऱ्या ह्या बाई महाराजांची छडी ह्या पादचारी पामराला लागली काय, त्यांतून भांडण काय निघालं, आणि महिन्याभरांत आपलं लग्न होऊन कुठें चारसहा महिने होतात न होतात तों पुढच्या चार पांच महिन्यांत पाळण्याची तयारी! तेव्हां पिसारनाथाला आपणसुद्धां एक घंटा बांधूं बरं का!"

"उगींच काय बोलता कांहीं तरी." तिनें मुकुंदला हलकीशी चापट मारत म्हटलें.

"अरे वा:! तूं आतां मला अगदीं मारझोड करूं लागलीस कीं!"

"पुरुषांनींच बायकांना मारझोड करावी वाटतं!" ती लाडिकपणें म्हणाली. मुकुंदनें क्षणभर तिच्याकडे न्याहाळून पाहिलें.

"असे कां पहाता?" तिनें विचारलें.

"सहजच! एकूण तुला सुद्धां ही भाषा येते म्हणायची!"

"कुठली भाषा?"

"ही स्त्री आणि पुरुषांची?"

"खूप येत होती कीं! कॉलेजांत प्रथम मी तीच भाषा शिकले. एम. ए. होईपर्यंत मी तीच भाषा बोलत होते."

"अजूनही बोलते आहेस ना!"

"बोलते आहे! एखादी भाषा अगदींच विसरून जाऊं नये माणसानं! पण आतां त्या भाषेंत फारसा अर्थ नाहीं राहिला!"

"का बुवा?"

"त्या भाषेंत खरोखर तसा अर्थ नाहींच म्हणून!"

"हें कधीं कळलं तुला?"

"कळलं मीरतच्या शाळेंत!"

"अग पण त्या शाळेंत तूं शिकवत होतीस ना?"

"शिकत पण होते. जगाचे पुष्कळ बरे वाईट अनुभव आले. तेव्हांच मला कळलं कीं बाई कांहीं बाईची नव्हे. पुरुषच बाईचा. पुष्कळ ठेंचा खाऊन हें शहाणपण शिकलें मी. तुम्ही भेटला नसतात तर कुणास ठाऊक माझं काय झालं असतं!"

"व्हायचं काय? कुणा दुसऱ्या भाग्यवंताशीं लग्न झालं असतं. चांगली एम्. ए. झालेली होतीस. मिळवती होतीस. रूपानं चांगली होतीस, तुझ्या गुणांना तोड नव्हती?"

"तुम्हींच दिवे ओवाळावेत माझ्या रूपावरून अन् गुणांवरून. गरीबाच्या घरांतली मी. ना माझ्यावर आईबापांचं छत्र. नोकरी करून पोट भरत होतें. आपले लोक सोडून वणवण करत लांब जाऊन पडले होते

मीरतला. एक तुमचं मन मोठं म्हणून तुम्ही घेतलंत ह्या काळ्या चिंधुंद्रीला पदरांत! एरवीं पडले असते जन्मभर मी तिथेंच खितपत. त्या सात वर्षांची आठवण झाली म्हणजे अजून माझ्या अंगावर कांटा येतो. इतकं उदास वाटायचं! इतकं एकटं वाटायचं ........!" एकदम ती त्याला बिलगली. जणूं तो एकटेपणा पुन्हा जबडा फाडून तिच्याकडे येईल असें तिला भय वाटलें. मुकुंदनें तिला जवळ घेतलें.. आणि......

वीणेचें काळीज जणूं कुणी पोलादी पंजानें ओरबाडलें. तिनें आपल्या कानांत बोटें घातलीं. आणि तरीहि तिला ऐकूं येतच होतें. कांहीं क्षण बोलक्या शांततेंत गेले. मग पुन्हा त्या स्त्रीच्या अवरुद्ध कंठांतून बाहेर पडलेले शब्द ऐकूं आले. "माझें भाग्य अजून मला खरंच नाहीं वाटत. कसं हो लग्न केलंत तुम्ही माझ्याशीं?"

"रडूं नकोस, वेडे!" मुकुंद तिला कुरवाळीत म्हणाला. "मी विचारतों, तूंच कसं लग्न केलंस माझ्याशीं? सुरवातीला मी तुझ्याशीं कसा वागलों तें आठवतं?"

"तुमची एकेक हालचाल, एकेक शब्द मला आठवतो." ती त्याच्या छातीवर डोकें घुसळत म्हणाली.

"सुरवातीचे माझे ते शब्द आठवतात तुला?"

"आठवतात! माझी छडी तुम्हाला लागली, आणि तुम्ही म्हणालात, तुमची छडी मला चुकून लागली असं मी समजतों. नाहीं तर तीच छडी मी तुमच्या पाठीवर ओढली असती."

"बरोबर आहे. काय फार चांगले शब्द होते हे?"

"चांगलेच होते. माझी छडी घोड्याला लागण्याऐवजीं जर तुम्हाला लागली, तर तुम्ही तरी दुसरं काय म्हणायचं? मी दुष्ट होते म्हणून नुसतं दांत काढून हंसायचं? मला तर तुमचे ते शब्द फार आवडले. तुमच्या त्या वागण्यामुळेंच मला वाटलं, कीं हा माणूस वेगळा आहे. तुम्ही माझ्या पाठीवर छडी ओढण्याचं आश्वासन मला दिलंत, तेव्हां मी काय म्हणाले तें आठवतं तुम्हाला?"

"आठवतं. तूं म्हणालीस 'माझी चूक झाली. माझ्या पाठीवर छडी ओढायची असली तर अजून ओढा.' आणि बघ, त्यामुळेंच मलाहि वाटलं, कीं तूं सुद्धा चार चावट बायकांपेक्षा वेगळी आहेस."

"मी कांहीं वेगळी नाहीं, पण तुम्ही वेगळे आहांत!"

"मुळींच नाहीं. तूंच वेगळी आहे!"

"तुम्हीच आहांत!"

"तोंड बंद करतेस कीं नाहींस?"

"नाहीं करत!"

"नाहीं करत! बरं तर मग."

पुन्हा कांहीं क्षण शांतता. तीच बोलकी शांतता, आणि मग अतिशय तृप्त स्वरांत मुकुंदचे शब्द.

## दोघे

: वि. स. खांडेकर

तो एक सामान्य मनुष्य होता. एका साधूनें त्याच्या बाळपणीं त्याला सांगितलें होतें, 'कधींतरी मध्यरात्रीच्या मुहूर्तावर एक याचक तुझ्याकडे येईल. तो जें मागेल तें तूं दिलंस तर परमेश्वर प्रसन्न होऊन जगांतलीं सर्व सुखं तुला देईल.'

साधूच्या त्या वचनावर विश्वास ठेवून नेहमीं मध्यरात्रीपूर्वी दोन घटका तो जागा होई आणि दाराकडे कान लावून बसे. मध्यरात्र उलटून दोन घटका झाल्या म्हणजे निराश मनानें तो अंथरुणावर अंग टाकी.

अशीं वर्षांच्या वर्षें गेलीं. पण मध्यरात्रीं त्याच्याकडे कधींहि कुणीहि याचक आला नाहीं.

त्या साधूच्या वचनावरला त्याचा विश्वास अगदीं उडून जाण्याच्या बेतांत होता. इतक्यांत एका मध्यरात्रीं त्याचें दार कुणीतरी जोरजोरानें ठोठावलें. त्या ठोठावण्याच्या मागोमाग कठोर आवाज आला, 'मला तेल हवंय. तुझ्यापाशीं असेल तेवढं तेल मला दे.'

तो तेल आणण्याकरितां घरांत जाणार तोंच कुणीतरी पुन्हां दार ठोठावलें. मात्र तें ठोठावणें अगदीं सौम्य होतें. लगेच एक कोमल आवाज आला, 'मला तेल हवंय! तुझ्यापाशीं असेल तेवढं तेल मला दे!'

तो लगबगीनें घरांत गेला. त्यानें सर्व भांडीं धुंडाळून पाहिलीं. फक्त पळीभर तेल घरांत शिल्लक होतें.

तें हातांत घेऊन त्यानें दार उघडलें.

'ओत, तुझ्या हातांतलं तें तेल ओत' कठोर आवाजाची ती व्यक्ति म्हणाली.

'कुठं?'

'माझ्या मस्तकावरल्या जखमेंत! तिथला मणि—पण ती सारी कुळकथा तुला सांगून काय उपयोग आहे? माझं नांव अश्वत्थामा. पांडवांच्या शिबिरांत अपरात्रीं शिरून मी त्यांच्या पुत्रांचा वध केला. मी सूड उगवला. सूडाचं समाधान मला मिळालं. पण त्याच्यापायीं या सतत वाहणाऱ्या जखमेच्या वेदना सोशीत आणि त्या वेदना सुसह्य व्हाव्यात म्हणून दारोदार तेलाची भीक मागीत मला फिरावं लागतं आहे.'

'द्वेषानं कधीं कुणाचं कल्याण झालं आहे काय?' तेल मागणारी ती दुसरी व्यक्ति स्वतःशींच पुटपुटली. लगेच ती त्या मनुष्याकडे वळून म्हणाली. 'माझ्या हातांतली पणती विझली आहे. अंधारांतून लक्षावधि माणसं जात आहेत. त्यांना प्रकाश दाखवायला हवा. ओत, तें सारं तेल या पणतींत ओत.'

त्या व्यक्तीच्या सहृदतेनें द्रवून गेलेल्या त्या मनुष्यानें विचारलें, 'आपलं नांव काय महाराज?'

'गौतम बुद्ध!'

तें नांव ऐकतांच त्या माणसाच्या हातांतील तेलाचें भांडें गळून खालीं पडलें. त्यांतलें सारें तेल जमिनीवर सांडलें.

त्या माणसानें वर मान करून पाहिलें. दारात तो एकटाच उभा होता. आकाशांतल्या चांदण्या त्याच्याकडे पाहून आपापसांत डोळे मिचकावीत होत्या!

x x

"हें सगळं कल्पनेपलीकडचं सुख आहे."

"छडी मारायला आलात आणि लग्न करून बसलात!" ती खुदकन हंसून म्हणाली.

"पण कां ग, खरंच मी तुला छडी मारली तर?"

"मारा की! खाईन मी तुमचा मार!"

"तरी तूं माझ्यावर प्रेम करशील?"

"कां नाहीं करणार? मूल आईला लाथा मारतं, आई मुलाला चोप देते. त्यांचं काय एकमेकांवर प्रेम नसत? प्रेम का कुठं अशा गोष्टींनीं नाहींसं होतं?"

"तर मग मी एखाद्या वेळीं तुला मारलं तर तूं माझ्यावर प्रेम करशील?"

"करीनच! तें आतां मुळीं माझ्या हातांतच नाहीं!"

"रागावणार नाहींस?"

"त्या वेळेपुरतं कदाचित् रागावेनसुद्धां. कदाचित् हंसेन. पण एक मात्र सांगते. नेहमींकरता नाहीं मला तुमच्यावर रागावता येणार!"

"खरं?"

"प्रयोगच करून पहा ना! छडी आहेच तुमच्या हातांत. हं. ही घ्या......"

पुढें काय झालें ते जणू वीणाला तेथें बसल्या बसल्या दिसलें. तिनें आपलें मस्तक त्याच्यासमोर वाकविलें. त्यानें हातातली छडी फेकून दिली. सद्‌गदित स्वरांत तो उद्‌गारला, "यमू!" आणि मग...आणि मग...वीणेच्या काळजावर जणू कट्यारीनें घाव पडले. धरणी दुभंग होईल तर बरें असें तिला वाटलें, मोठ्यानें किंचाळावें. पण मोकळेपणानें श्वास घेणेंही तिला जड जात होतें. अंगाची घडी करून ती ऐकत राहिली. तिनें तो बायकी स्वर ओळखला होता. आतां सारेंच तिनें ओळखलें होतें. तो यमुना सानेचा स्वर होता. यमुना आणि ती बी. ए. पर्यंत बरोबरच होत्या. एकाच वसतिगृहांत, एकाच खोलींत त्या रहात होत्या. यमूला आई आणि बाप यापैकीं कुणीच नव्हतें. वीणाला आई होती पण बाप नव्हता. यमूचें शिक्षण कांहीं स्वावलंबनावर झालें, कांहीं नातलगांच्या सहाय्यावर झालें. वीणाच्या वडिलांनीं चांगली माया मागें ठेवली होती. वीणा गोरी होती, यमू सावळी होती. वीणाचा चेहरा गोल होता, यमूचा उभट होता. वीणाचे डोळे बारीक होते आणि यमूचे मात्र टपोरें होते. पण आपल्या रंगानें, देहानें व ऐटीनें कुणाचेंहि लक्ष मात्र प्रथम वेध[illegible] घत होती वीणाच—यमू नव्हे!

"कसला विचार करते आहेस यमू?"

"कसला नाहीं! मन नुसतं भरून आलं आहे!"

"कां ग?"

"मोकळं आकाश, उंच डोंगर, गर्द झाडी, आणि अथांग पाणी. पाणी पाहिलं कीं मला असंच होतं."

"काय वाटतं आहे तुला?"

"[illegible]डावंसं वाटतं आहे. तृप्तीनें माझं मन भरून गेलं आहे. असं व[illegible] आहे कीं क्षणभरसुद्धां कधीं तुमच्यापासून दूर होऊं नये. तुमच्या माझ्यांत कधीं कसला अंतराय येऊं नये."

कांहीं वेळ शांतता होती. तीं दोघेंहि एकमेकांना [illegible] बसलीं होतीं. मग मुकुंदनं प्रारंभ केला.

"तुझ्या माझ्यांत कांहीं अंतराय आहे असं तुला कधीं वाटलं यमू?"

"कधीं वाटलं नाहीं. आणि आतां तर मुळींच वाटत नाहीं."

"आतां म्हणजे गेल्या चार महिन्यांत ना?"

"हं."

"माझा इतिहास तुला ठाऊक आहे यमू?"

"तुम्हीं उदार आहांत, प्रेमळ आहांत, प्रामाणिक आहांत हें मला ठाऊक आहे. जास्त कांहीं जाणण्याची माझी इच्छा नाहीं."

"लोक मला कठोर, उर्मट, आततायी समजतात यमू!"

"तर मग ते सारे आंधळे होते, मूर्ख होते आणखी उर्मटसुद्धां होते."

"तुला ठाऊक आहे का यमू, कीं माझं एक......"

"ठाऊक आहे तें मला. पण तिची एक खूणसुद्धां मला घरांत सांपडली नाहीं. एखादी वस्तू नाहीं कीं एखादं छायाचित्र नाहीं! तुम्हीं तिच्याविषयीं कधीं कांहीं बोलला नाहींत. मी कांहीं विचारलं नाहीं."

"तुझ्या मनांत तिच्याविषयीं कधीं विचार आला नाहीं?"

"आला ना! पण मला तिचा कधीं मत्सर वाटला नाहीं. कां वाटेल? तुम्ही माझे होतात ते मला मिळालात. मला तिची नुसती कींव वाटली!"

"कींव?"

"होय. जी बाई तुम्हालासुद्धां सोडूं शकली तिची कींव करायची नाहीं तर दुसरं काय?"

"तुला ऐकायचा आहे का ती कहाणी?"

"ह्यावेळीं नको. पुन्हा कधींतरी सांगा. मला ठाऊक आहे, तुम्हांला फार त्रास होतो त्या आठवणीचा!"

"तुला कसं ठाऊक? मी तर कधीं तुझ्याशीं त्या गोष्टी बोललों नाहीं."

"जागेपणीं बोलला नाहींत पण झोपेंत बोललात. तुम्हाला त्रास होतो त्या विषयाचा."

"आतां नाहीं होत यमू. पूर्वी होत होता. एखाद्या परक्या माणसाविषयीं बोलावं तितक्या परकेपणानं आतां मी तिच्याविषयीं बोलूं शकेन!"

"पण तुम्ही आतां कशाला काढला तो विषय?"

"बरं राहिलं. मोठी गमतीदार बाई आहेस तूं!"

"गमतीदार कशी?"

"बाईचा मुख्य गुण जो चांभार चवकशा तोच तुझ्या ठिकाणीं नाहीं!"

"मला करायचं आहे काय चवकशा करून? पूर्वी झालं गेलं गंगला मिळालं. आतां उठूं या का आपण?"

"उठूं या! ही जागा मोठी छान आहे नाहीं?"

"मग पुन्हा येऊं कीं इथें..."

"उद्यां येऊं!"

"केव्हांहि येऊं!"

काय होत होतें तें वीणा जणू प्रत्यक्ष पहात होती. 'जपून' तो तिला

म्हणत होता. तिच्या मातृत्वाविषयीं हळूंच त्यानें तिची कांहीं चेष्टा केली होती. ती त्याला "चला, चावट कुठले" म्हणाली होती व मग हातांत हात घालून मोठ्यानें हंसत तीं दोघें चालूं लागलीं होतीं.

सुन्न होऊन वीणा कांहीं मिनिटें त्या खळग्यांत तशीच पडून होती. झुडुपांतून झिरपणारे प्रकाशाचे गोल ठिपके तिला पिशाचीच्या डोळ्यां-सारखे भयंकर वाटत होते. हें सारें काय घडलें होतें? तिच्यापासून अगदीं दोन फुटांवर तिचा नवरा बसला होता. ज्या पुरुषाला तिनें कित्येकदां पाहिलं व कित्येकदां स्पर्श केला, त्याला ती आतां पाहूं शकत नव्हती कीं स्पर्श करूं शकत नव्हती. एक वेगळीच स्त्री जवळ जवळ तिच्या साक्षीनें त्याला स्पर्श करीत होती. त्याचे हात बळकट होते. त्याचा स्पर्श रंगेल होता. तो स्पर्श तिला या क्षणींहि आठवत होता. त्या स्पर्शाचा ठसा तिला पुसून काढता आला नव्हता. त्या पिळदार बाहूंचें विस्मरण झालें नव्हतें. कधीं विस्मरण होणें शक्य नव्हतें. आणि त्या बाहूंवर रेलून आतां ती चालली होती. यमुना चालली होती. तीं दोघें कुठें चाललीं होतीं? त्यांचें वास्तव्य होतें तरी कुठें? पाहता पाहता तीं दोघें अदृश्य झालीं असतीं व मग कदाचित् कधींही दिसलीं नसतीं. गेल्या दोन वर्षांत तिनें त्याला कधीं पाहिलें नव्हतें. आतां कदाचित् तो नेहमींकरता नाहींसा झाला असता. तिला पुन्हा कधीं तो दिसला म्हणून नसता......

ह्या कल्पनेनें जणूं तिला चटका दिला. ती धडपडून उठली व त्या खळग्याबाहेर रांगत आली. आणि मग त्या दोघांच्या पावलांची दिशा घेऊन ती पुन्हा एकदां धांवत सुटली. कच्च्या मार्गानें रमत गमत जाणाऱ्या त्या दोघांच्या पाठमोऱ्या आकृति तिला दिसत होत्या. त्यांचा तो मोकळा मार्ग तिला बंदच होता. लपत छपत आणि धडपडत त्याच वाटेला समांतर रेषा काढीत झाडाझुडपांतून ती धडपड होती. तिला जणूं एका वेडानें पछाडलें होतें.

त्यांच्या मागोमाग तिला जायचें होतें. तीं काय बोलतात तें ऐकायचें होतें. पण त्यांचें बोलणें ऐकून तिला तादृश लाभ काय होता? आत्तांच नव्हतें का तिनें त्यांचें बोलणें ऐकलें? तिचा त्यांच्याशीं संबंधच काय होता मुळीं? तरीहि वेडी वांकडी ती झाडाझुडपांतून धांवतच होती. आता सूर्य बराच वर आला होता, तिचे ओचे लाल मातीनें रंगत होते. तिला घाम येत होता, व धांप लागली होती. तरी ती त्यांचा पाठलाग करीतच होती. आतां तिला वाऱ्याच्या झोताबरोबर त्यांच्या संभाषणांतले उडते शब्द व तुटकीं वाक्यें हि ऐकूं येत होतीं.

"वीणा वेडे?" यमूनें तिचें नांव उच्चारलेले तिला स्पष्ट ऐकूं आलें. "ती तर माझ्याबरोबर होती!"

वाऱ्याच्या झोतानें झाडाचीं पानें सळाळलीं. शब्द विखुरले गेले, मधलीं कांहीं वाक्यें वीणाला ऐकूं आलीं नाहींत. मग मुकुंदाचे आवेशानें उच्चारलेले शब्द तिच्या कानांत तापल्या तेलासारखे सांडले. "सौदा-सौदा-सौदा! तिला बाई कोण म्हणेल? लग्नाला ती देव्हारा मानत नव्हती, बाजारांतला चौथरा मानत होती."

ते शब्द ऐकून वीणाचें शरीर कांपलें. तिचीं कानशिलें लाल झालीं. तिला वाटलें कीं मुकुंद पुन्हा एकदां आपल्या चेहेऱ्यावर प्रहार करीत आहे. कांहीं वेळ पुन्हा सारें शांत होतें. तीं दोघें तिच्याकडे पाठ फिरवून आतां उभीं होतीं. त्यांचे हात परस्परांत गुंतलेले होते व त्यांचीं तोंडें तळ्याकडे होतीं. अखेर तीं दोघं तिच्याविषयीं बोलूं लागलीं होती तर!

काय बरें बोलत होतीं तीं? "तुला काय करायचें आहे आतां त्यांच्या बोल-ण्याशीं?" तिच्या मनांत कुणीतरी पुटपुटलें. पण तो स्वर फार क्षीण होता. इतका कीं वीणावर त्यानें कांहींच परिणाम केला नाहीं. आतां तीं दोघं पुन्हा उलटी दिशा घेऊन चालूं लागलीं होतीं. परत आतां तीं तळ्याच्या बांधाकडे जाण्यास निघालीं होतीं. वीणा अंग चोरून एका झुडुपाच्या जाळींत लपून बसली. तिच्या फार जवळून तीं दोघें जात होतीं. त्या दोघांचेंही चेहेरे आतां तिला स्पष्ट दिसले. त्याचा चेहेरा तसाच होता. त्याचे केस तसेच वाऱ्यावर उडत होते व त्याचे दांत तितकेच शुभ्र व बळकट होते. त्याच्या चालण्यांत तोच मुर्दानी डौल होता आणि यमूच्या चेहेऱ्यावर आतां खरोखरच कसला तरी गोडवा आला होता. मधाचें पोळें भरावें तशी आनंदरसानें ती भरून गेल्यासारखी दिसत होती. तिच्या देहानें आतां अनोळखी व आकर्षक बाळसें धरलें होतें. यमुना सुंदर नव्हती पण सौंदर्यापेक्षांहि अधिक मोठें असें कांहींतरी तिला मिळालें होतें. आणि एखाद्या वेलीनें भरदार वृक्षावर आपला भार टाकावा, तशी ती त्याला बिलगून चालली होती. वीणा पहात होती. एक क्षणभरहि यमुना त्याला सोडत नव्हती. वीणाच्या अगदीं समोरून त्या दोन आकृति गेल्या व तिला मुकुंदचा घंटेसारखा खणखण करणारा स्वर ऐकूं आला.

"होय, अगदीं ह्याच हॉटेलांत शेजारच्या खोलींत तेव्हां आम्ही रहात होतों. मी परोपरीनें तिला सांगून पाहिलें पण तेव्हां देखील तिचा अहंकार......"

रेंगाळत रेंगाळत मुकुंदचे शब्द नाहींसे झाले. तर मग अद्यापहि तीं दोघं तिच्याचविषयीं बोलत होतीं म्हणायचीं. वीणानेंहि आपली दिशा पालटली. ती पुन्हा त्यांचा पाठलाग करीत लपत छपत चालूं लागली. त्या दोघांनीं आतां आपला वेग वाढविला होता. तीं दोघें सरासरी दोन फर्लांगाचें अंतर कापून गेलीं होतीं. आतां तळ्याचा बांध फार दूर राहिला नव्हता. लवकरच मुकुन्द व यमू त्या बांधापाशीं पोंहोंचलीं असतीं. पुन्हा जीवाच्या ओढीनें वीणा धांवली व पुन्हा तिनें त्यांना गाठलें. मुकुंदचा स्वर बोलत होता.

"असं प्रेम तिनं कधीं उत्पन्नच होऊं दिलं नाहीं. उत्पन्न होण्या-आधींच त्याच्या नरडीला नख लावलं. तें सगळं आतां मेलेलंच आहे, यमू!—मेलेलंच होतं. त्या आठवणींचं सुद्धां आतां मी थडगं बांधतों आहे असं समज."

"असं बोलूं नका." हा स्वर यमूचा होता.

"कां?"

"मला वाईट वाटतं!"

"तिच्यासाठीं?"

"होय, तिच्यासाठीं!"

"तुझं काळीज फार मोठं आहे यमू!"

"कशाचं मोठं! तिनंच तर सारं मी घेतलं."

"तिचं कधींच कांहीं नव्हतं. ती कधीं कुणाची झालीच नाहीं. तुझं होतं तें तुला मिळालं. झालं हेंच बरं झालं. माझ्या मनांतून ती गेलेलीच आहे. तुझ्याहि मनांतून तूं तिचा विचार काढून टाक!"

ह्यानंतर वीणानं कांहीं ऐकलं नाहीं. त्यांचे स्वर खालावत होते आणि ते आतां तळ्याच्या आडव्या बांधाकडे जात होते. तिथं सारं मोकळं

होतं. वीणाला तिथें त्यांचा चोरून पाठलाग करणं शक्य नव्हतं. तिच्या डोळ्यांदेखत ते बांध ओलांडून जात होतें. व ती टक लावून तिकडे पहात होती. तीं दोघं पैलतीरावर गेलीं. व त्यांच्या नाहींशा होणाऱ्या आकृतींकडे पहात वीणा ऐलतीरावरच खिळून उभी राहिली. ती जणूं एका स्वप्नांत होती. आणि स्वप्नांत असल्यासारखीच ती केव्हांतरी चालूं लागली. तिला कांहीं ज्ञान नव्हतें. कांहीं दिशा नव्हती. जें पाहिलें तें ती पुन्हा पहात होती व जें ऐकलें तें पुन्हा ऐकत होती. आणखी कितीतरी ती पहात होती व ऐकत होती आणि कशाचा अर्थ तिला कळत होता व कशाचा मुळींच कळत नव्हता. ती मुकुंदाचा पाठलाग करत खरंच कां गेली होती ? त्याच्याविषयीं ही अनिवार ओढ तिला कां वाटत होती ! तिनें त्याला शरीरानें केव्हांचें दूर लोटलें होतें. आपण मनानेंहि त्याला दूर लोटलें आहे असें तिला आजपर्यंत वाटत होतें. तिच्या मनाला तो आवडेनासा झाला म्हणून तिच्या शरीरानें त्याला दूर लोटलें अशीच तिची ह्या क्षणापर्यंत श्रद्धा होती. पण तिच्या मनावर त्यानें कुठेंतरी खोल ठसा ठेवला असला पाहिजे. ह्या इतक्या काळानंतरही तो ठसा पुसला गेला नव्हता. आणि तिचें शरीर तर मागोमाग ओढलें गेलें होतें. यमूला त्यानें जवळ घेतलें, यमूला त्यानें कुरवाळलें तेव्हां तिचें मन रडलें व तिच्या शरीरानेंहि हाहाःकार केला ! ती आपल्याच नवऱ्याचा एका परस्त्रीशीं चाललेला एकांत पहात होती. परस्त्री !...नवरा ? कोण परस्त्री ?—आणि कुठला नवरा ? मुकुंदच्या दृष्टीनें आता परस्त्री तर तीच होती. ती–वीणा ! —ती होती परस्त्री ! आणि तो होता तिचा नवरा !—यमूचा ! तेथें कुणी परकं असेल, उपरें असेल तर ती होती; वीणा ! तिचें तेथें कांहीं काम नव्हतें. तिला तेथें कांहीं अधिकार नव्हता. आतां ह्या साऱ्या गोष्टींविषयी शंकेला जागा तरी होती काय ? तिनें त्याला स्वेच्छेनें, येवढेंच नव्हे पण हट्टानें व अगदीं विधीपूर्वक घटस्फोट नव्हता का दिला ? "तुझें माझें कांहीं नातें नाहीं–नातें असणें शक्य नाहीं" असें तिनेंच नव्हतें का त्याला सांगितलें ? विवाह मंगलाचा देव्हारा न्यायालयाच्या बाजारू चौथऱ्यावर तिनेंच नव्हता का मांडला ? तो मानी पुरुष तिची अश्रुपूर्वक काकुळती करीत असताहि तिनेंच नव्हतें का त्याला कठोर अहंकारानें दूर लोटलें ? तर मग आतां कां म्हणून ती त्याचा मागोवा घेत होती ? व त्याचें स्मरण करीत होती ? असेल ? केव्हांतरी तो तिचा नवरा असेल–पण आतां तो तिचा कोण लागत होता ? सात जन्मावर अधिकार सांगणारें तें संस्काराचें नातें तर तिनें एखाद्या कागदाच्या कपट्याप्रमाणें फाडून टाकलें होतें ! तिनें जें मागितलें होतें, तें तिला मिळालें होतें. तिनें जें पेरलें तें आतां उगवलें होतें. आतां तिला त्याच्याविषयीं हें अनावर आकर्षण कां वाटत होतें ? त्याच्या स्पर्शाचा हा हव्यास आतां तिला कां सुटला होता ? त्याला पहावें, त्याचे शब्द ऐकावे अशी तहान तिला आतां कां म्हणून लागली होती ? ही खरोखर कुठली दुर्बलता होती ? कुठली विकृति होती ? ही खरोखरच विकृति होती काय ? कीं आत्मार्पण करणाऱ्या व आधार शोधणाऱ्या कुठल्याहि संस्कारी व जातिवंत स्त्रीची ही मूळ प्रकृति होती ? जन्मस्वभाव होता ? तर मग ह्या क्षणापर्यंत तिच्या त्या स्त्रीसुलभ स्वभावाचें काय झालें होतें ? काय तो केवळ मूर्खत्वानें व अहंकारानें झांकळून टाकला होता ? व हा आतां तो असा अनिवारपणें उफाळून येत होता ? ज्या ह्या तिच्या आयुष्यांतील पहिल्या पुरुषाला तिनें आपल्या कौमार्याचें दान दिलें, त्याचें व त्याच्या बलिष्ठ स्पर्शाचें तिला काय कधीं विस्मरणच होणार नव्हतं ? तिनें दुसरें लग्न केलें तरी ? दुसरा पुरुष पाहिला तरी ?

—दुसरा पुरुष ! दुसरा पुरुष !

वीणा तारवटलेल्या डोळ्यांनीं चालत होती. सूर्य अधिक प्रखर होत होता. पहिल्या प्रातःकाळचा गारवा ऊबेनें भरत होता. त्यामुळेंहि वायुमान मधुरच होतें. मद्याच्या समशीतोष्ण घुटक्यासारखें तें आतां झालें होतें. पण वीणाच्या मस्तकांत निखारे पडत होते. तिचे ओंठ मळले होते व चेहेऱ्यावरून घाम निथळत होता. आपण कोणत्या वाटेनें व कुठें निघालों आहोंत ह्याचें तिला भान नव्हतें. सूर्य अधिक वर आला. पक्ष्यांचें गीत मंद झालें. सारी झाडी सूर्यप्रकाशांत रंगून निघाली. तिचे पाय अडखळूं लागले. तरीहि ती तशीच चालत राहिली. अखेर ती थांबली. कारण येथून पुढें कोठें मार्गच नव्हता. एका कड्याच्या टोकाशीं येऊन वीणा उभी होती. हा होता "एको पॉइण्ट !" पण तें कोणतें टोक आहे याचें तिला भान नव्हतें. उभें राहवेना म्हणून ती मटकन खालीं बसली. ती चालत होती नेणतेपणें, व बसलीहि नेणतेपणें ! विचारांच्या वातचक्रांत ती नुसती गिरक्या घेत होती. दृश्यें व प्रसंगांचा तिच्या मनांत एकच गोंधळ माजला व ती स्वतःशीं पुटपुटत होती—"दुसरा पुरुष— दुसरा पुरुष !"

होय, खरोखरच तशी अडचण काय होती ? त्यानें नव्हती का दुसरी बाई पाहिली ? मग दुसऱ्या पुरुषाचा विचार करावयास तिला अडचण कसली होती ? तिच्या सुबुद्ध मनानें दुसऱ्या लग्नाचा विचार कित्येकदां केलाहि होता. तिला फार एकटें वाटे, तेव्हां तो विचार ती करीत असे ! कांहीं कांहीं कामें करावयास खरोखरच पुरुषच अधिक उपयोगाचा होता. मनांतून हें तिला पटलें होतें. तेव्हांहि तिनें दुसऱ्या लग्नाचा विचार केला होता. शरीराची भूक तिला मान्य होती त्या भुकेनें कित्येकदां तिचा जीव कासावीस करून सोडला होता. आणि आश्चर्य असें कीं त्या प्रत्येक प्रसंगीं तिला मुकुंदाचेंच स्मरण झालें होतें. आजच्यासारखें तिचें अंतरंग तेव्हां ढवळून निघालें नव्हतें इतकेंच. तिनें तेव्हां त्याची स्मृति झिडकारून टाकली होती. तेव्हां तें तिला अशक्य वाटत होतें ! कां म्हणून ? कां म्हणून दुसरा पुरुष पाहूं नये तिनें ? ती आधुनिक महिला होती. पुष्कळ पुरुष तिला ओळखत होते. पुष्कळ पुरुषांना ती ओळखत होती. कराराच्या अटी तिला पाठ होत्या. तर मग आतां दुसऱ्या एखाद्या पुरुषाशीं लग्नाचा करार करावयास तिला अडचण कोणती होती ?

लल्लूभाई पटेलनें तिला मागणी घातली होती. ह्या श्रीमान् अर्धशिक्षित व्यापाऱ्याला तिला मागणी घालताना कसलाहि संकोच वाटला नव्हता. एखाद्या सुशिक्षित मराठी मुलीशीं लग्न लावायचें हें लल्लूभाईचें वेड होतें. त्याला "सोसायटींत" त्याच्या बरोबरीनें मिरविणारी अद्ययावत् बायको हवी होती. कामाला मराठी बायका फार उत्तम असें त्याचें मत होतें.

कित्येक वर्षें त्याच्या ह्या महत्वाकांक्षेच्या मार्गांत त्याच्या पहिल्या बायकोची मोठी अडचण होती. ती बाई अशिक्षित होती. लल्लूभाईला पैसा मिळण्यापूर्वींच त्याचें तिच्याशीं लग्न झालें होतें. पण लवकरच लल्लूभाईची अडचण प्रथम यमराजानें दूर केली. लल्लूभाईची बायको परलोकवासी झाली. कुणी असेंहि बोलत कीं ह्या लठ्ठ माणसानें तिचा फार छळ केला व म्हणून ती मेली. पण ती मेल्यापासून पंधरा दिवसांतच लल्लूभाईनें वीणेला मागणी घातली. लल्लूभाई वीणेपेक्षां चांगला अठरा वीस वर्षांनीं मोठा होता. पण त्याच्यापाशीं अमाप पैसा होता. सुखोपभोगाला लालचावलेल्या पुष्कळशा सुशिक्षित पोरी पैशाशीं लग्न लावतात

तें लल्लूभाईंच्या ठाऊक होतें. वीणेला मागणी घालण्यांत आपण कांहीं चूक करीत आहोंत असें त्याला मुळींच वाटत नव्हतें. खरोखर वीणा अशी लागून गेली होती कोण ? वयानें लहान असली म्हणून काय झालें ? व सुशिक्षित असली म्हणून तरी काय झालें ? बोलून चालून तर ती काडी-मोड केलेली बाई, म्हणजेच जवळ जवळ सार्वजनिक बाई, असें लल्लू-भाईचें प्रामाणिक मत होतें. तो तिच्याशीं लग्न करायला सिद्ध होता हा खरोखर त्याचा तिच्यावर उपकार होता ! त्याच्याशीं लग्न करणेंच तिच्या करें हिताचें आहे, एरवीं तिच्यासारखीचें लग्न होणेंच कसें कठीण आहे, हें त्यानें तिला अगदीं बेरीज वजाबाकीच्या भाषेंत समजावून सांगितलें होतें. आणि मग एके रात्रीं क्लबाच्या उद्यानांत तिचा चक्क हात धरला होता ! वीणेनें ओरडा केला तेव्हां लल्लूभाईनें साळसूदपणें सांगितलें, "मी आपला सहज बोलता बोलता हिचा हात धरला. सुशिक्षित असून ही बाई इतकी संकुचित मनाची असेल हेंच माझ्या स्वप्नांत नव्हतें ! एखाद्या पुरुषाचा नाहीं का आपण अगदीं सहज हात धरत !"

हें प्रकरण न्यायालयांत नेण्याची वीणेची इच्छा होती पण त्यांत तिचीच दुष्कीर्ति झाली असती, तिलाच फार मनस्ताप झाला असता, आणि अखेर पदरांत कांहींच पडलें नसतें, असें अनेकांनीं तिला सांगितलें. चांगल्या चांगल्यांनीं तिला हाच सल्ला दिला आणि कित्येक बायका तर असेंहि म्हणाल्या, "ही स्वतःला समजते तरी कोण ? त्यांत लल्लूची काय चूक ? ही काय स्वतःला पंचपतिव्रतांपैकीं एक समजते ? बोलून चालून काडीमोडीची तर बाई !"

आणि मग वीणेनें तो साग अपमान मुकाट्यानें गिळला होता. करूं नये तेथें तिनें तडजोड केली होती. आपण तडजोड करीत आहोंत, हें तिला कळलेंहि होतें, पण एकूण तिची शक्तीच येथें कमी पडत होती. हें भांडण एखाद्या पुरुषाला परवडण्यासारखें होतें ! पुरुष, पुरुष ! दुसरे पुरुष ! दुसरे पुरुषहि तिला असेच भेटले होते. कुणी चांगला पुरुष तिच्या जवळ फिरकेना. जे जवळ येत ते लग्नाच्या विचारानीं येत नसत. त्यांच्या कांहीं वेगळ्याच सूचना असत. बोलून चालून तर ती घटस्फोटित बाई होती. अशा उष्टावलेल्या बाईशीं एखाद्या चांगल्या प्रथमवरानें कां म्हणून लग्न करावें ! आणि ही एखाद्याचा संसार सुखानें चालवील ह्याचा तरी काय विश्वास होता ! एकाचा संसार तर तिनें मोडलाच होता. आणि साऱ्यांना सहानुभूति त्याच्याविषयींच वाटत होती. पीत असेल तो एखादे वेळेस दारू ! पण म्हणून झालें काय ? तो कांहीं प्रतिदिनी मद्य घेत नव्हता. आजकाल कितीतरी पुरुष मद्यमांस घेतात ! म्हणून का बाईनें त्याला सोडायचें ? संभाळणें हें तर बाईचें काम ! कुठलें तरी खुसपट काढून संसार उधळणें काय सोपेंच होतें ! सुस्वभावी, सुशिक्षित, श्रीमंत अशा नवऱ्याचा संसारसुद्धा हिला संभाळता आला नाहीं, आतां हिच्या वाटेस जाईल कोण ? —वीणेला आश्चर्य वाटलें होतें—हीं मतें बहुतेक बायकांचीं होतीं. तिनें मनोमन मान्य केलें होतें, कीं बायकाच तिचा अधिक द्वेष करीत होत्या. अधिक तिरस्कार करीत होत्या. तिची पारध करणाऱ्या व तिला टाळणाऱ्या बायकाच होत्या ! न जाणों ह्या पांढऱ्या पायाच्या बाईनें आपल्या नवऱ्यावर, मुलांवर, भावांवर फांस टाकला तर !—हें त्यांचें भय होतें बोलून चालून. लग्न विटाळणारी, नवरा टाकणारी, विवाहाचा पवित्र देव्हारा लिलावांत काढणारी ही बाई !......

—देव्हारा-देव्हारा—देव्हारा ! वीणेच्या कानांत शब्द घुमले "चौथरा नव्हे, देव्हारा !"

आणि मग निळ्या आकाशांत तिच्या डोळ्यांसमोर एक सुंदर देव्हारा तरंगूं लागला. तो तिच्या कुळांतला परंपरागत देव्हारा होता. तिची आई डोळे मिटून त्या देव्हाऱ्यासमोर माळ जपत होती. वीणेची आई अशीच नेहेमीं देवासमोर माळ जपत बसलेली असे. सणवार, उपास तापास, कुळधर्म कुळाचार, सारे ती यथासांग करी. ती मोठी प्रेमळ आणि श्रद्धाळू बाई होती. वीणेचे वडील तिच्या त्या श्रद्धाळूपणाची नेहमीं टवाळी करीत ते मोठे प्रखर बुद्धिवादी व कडवे नास्तिक होते. स्वभावानें ते मोठे आग्रही व तामसी असत. कधीं कधीं ते आपल्या बायकोच्या अंगावर हातहि टाकीत. तिच्या देवभक्तीची तर त्यांनीं सतत हेटाळणी केली होती. ह्या गोष्टी वीणेनें पाहिलेल्या नव्हत्या. पण नात्यांतलीं माणसें हळूं हळूं ह्या गोष्टी बोलत. वीणेच्या त्या गोष्टी कानावर होत्या. देव्हाऱ्या-समोर माळ जपत बसलेल्या आईचें चित्र मात्र बालपणापासूनच तिच्या मनावर कुठेंतरी खोल उमटून बसलें होतें. आपल्या आईची सारी थोरवी, सारा मोठेपणा वीणेला ठाऊक होता. पण कां कुणास ठाऊक, तिला अभि-मान वाटे आपल्या वडिलांचा ! त्यांच्या तीव्र तर्ककर्कश बुद्धीचा ! आपली आई अशिक्षित होती, श्रद्धाळू होती, आपल्या वडिलांची बौद्धिक सहचरी म्हणून अयोग्य होती म्हणून आपल्या वडिलांचा प्रसंगीं तोल जात असेल असें तिला वाटे ! तिच्या आईनें जें सोसलें, त्याची बौद्धिक जाणीव तिला होती पण त्या दुःखाचा भावनात्मक चिमटा तिला कधीं बसला नव्हता. तिची भावना तिच्या बुद्धिवादी वडिलांशीं समरस झाली होती. आईची मुलगी म्हणवून घेण्यापेक्षां वडिलांची मुलगी म्हणवून घेण्यांत तिला अधिक अभिमान वाटत असे. बोलून चालूनच तिची आई अशिक्षित होती, श्रद्धाळू होती. घंटोगणती ती देव्हाऱ्यासमोर बसत असे.

आणि आतां ह्या क्षणीं ती तो देव्हारा पहात होती. देव्हाऱ्यासमोर डोळे मिटून माळ जपत बसलेली आपली आई पहात होती. ह्या क्षणीं प्रथमच तिच्या आईच्या स्मरणानें तिच्या काळजाला चिमटा बसत होता. तेविसाव्या वर्षीं तिची आई विधवा झाली होती. आतां तर ती देव्हाऱ्या-समोर घंटोगणती बसत असे. त्या देव्हाऱ्यांतच वीणाच्या वडिलांचें छायाचित्र तिच्या आईनें आतां मांडलें होतें. ज्या माणसानें तिला कष्ट दिले, तिची हेटाळणी केली, तिच्या अंगावर हातहि टाकला, त्याच्यावर तिनें प्रेमच केलें होतें ! आजहि देव्हाऱ्यांत मांडून आपल्या त्या सौभाग्य-चिन्हाची ती पूजाच करीत होती ! हें सारें तिला कसें शक्य झालें होतें ? येवढें अमर्याद प्रेम करण्याचें सामर्थ्य तिनें कुठून आणलें होतें ? स्वार्थाचा व अहंतेचा विचार तिला कधीं चुकूनहि कां शिवला नाहीं ? केवळ पतीवरच नव्हे, तर पतीच्या प्रतिमेवरहि प्रेमाचा वर्षाव करांत राहण्याइतकें साधुत्व व संयम तिला कुठें मिळाला होता ? काय ही केवळ दासीवृत्ति होती ? छीः ! —छीः ! हा संयम, हा त्याग, ही विशालता तर केवळ दैवी होती. स्वार्थाचा व अहंकाराचा कुठें त्याला स्पर्श नव्हता. तिच्या पित्यानें, तिच्या मातेवर प्रहार केला होता आणि तिनें त्याच्यावर प्रेमच केलें होतें माता मुलावर करते तसें प्रेम ! अमर्याद, अनिवार, अलौकिक ! जें प्रेम कधीं संपत नाहीं, कधीं संकोच पावत नाहीं ! पतीच्या मृत्यूनंतर पतीच्या स्मृतीवरहि त्या साध्वीनें असेंच प्रेम केलें होतें ! तर काय त्या प्रेमाला व त्या निष्ठेला केवळ दासीवृत्ती

अनुक्रमणिका

म्हणून हेटाळणें शक्य होतें? तेवीसच्या वयांत तिच्या आईचा संयम एखाद्या संतासारखा होता. तें काय कठोर संयमाचें व उग्र तपाचें वय होतें? समजा त्या वयांत तिच्या आईनें पुनर्लग्न केलें असतें तर? समजा तिच्या आईनें तिच्या बापाच्या स्मृतीशीं प्रतारणा केली असती तर? समजा समजा तिनें त्याला काडीमोड दिली असती तर?

...वीणेचें शरीर शहारलें. या क्षणींहि ती कल्पना तिला अभद्र वाटली, अपमानकारक वाटली. घटस्फोटाची ती कल्पना हिंदु स्त्रिया अभद्र व अपमानकारक मानत होत्या! वीणेची माता व घटस्फोट? छीः छीः! ती कल्पनाच अत्याचारी होती. वीणेनें घटस्फोट घेतला व त्या धक्क्यानें वर्षभरांतच तिच्या आईचे प्राण घेतले. अद्यापहि ती साध्वी वीणेवर प्रेम करीतच होती; पण वीणेनें पाजलेलें जहर तिला पचवितां आलें नाहीं. वीणेला तेव्हां दुःख झालें पण जें कांहीं घडलें तो आपला अपराध आहे असें तिला वाटलें नाहीं. हीं म्हातारीं माणसें होतीं, आग्रही होतीं, अंधश्रद्ध होतीं. काळाबरोबर त्यांना चालता येत नव्हतें आणि म्हणून त्यांनीं गळून पडणें प्राप्त होतें! घटना फार शोचनीय होती पण अपरिहार्य होती, येवढेंच तिच्या तर्ककर्कश बुद्धीला वाटलें. पण आतां ह्या क्षणीं तिला वाटत होतें कीं आपल्या आईची हत्या आपणच केली; जिनें आपणास जीवन दिलें तिला आपण मृत्यु दिला. ती देखील आपल्याच अहंकाराचा बळी झाली. तिचें प्रेम आपणाला समजलेंच नाहीं. आपण प्रेम केलें स्वतःवर! आणि म्हणून एक पुरुष पटला नाहीं, तेव्हां आपण त्याला टाकलें—जसा एखादा जुना जोडा टाकावा! परंतु त्यालाहि अखेर आपणाला टाकता आलें नाहींच. आपलें मन त्याला टाकूं शकलें नाहीं, आपलें शरीर त्याला विसरूं शकलें नाहीं!

दुसरा पुरुष—दुसरा पुरुष! समजा आपल्याला एखादें मूल असतें तर! तर आपल्या घटस्फोटाविषयीं त्याला काय वाटलें असतें? आपल्या वर्तनाचा त्याच्यावर काय परिणाम झाला असता? आपल्या आईच्या घटस्फोटाची कल्पना अगदीं ह्या क्षणींहि आपल्याला अभद्र वाटत होती. आपल्या पुनर्लग्नाची व घटस्फोटाची कल्पना आपल्या संतानाला कशी काय मानवली असती? पण संतान आपल्याला झालेंच नाहीं. संतान आपण होऊंच दिलें नाहीं! मुकुन्दच्या आपल्या भांडणाचें हेंहि एक नेहेमींचें कारण होतें. आपल्याला वाटे – मूल म्हणजे स्त्रीच्या पायांतली शृंखला! त्याला वाटे मूल म्हणजे स्त्रीजन्माचें सार्थक. स्त्रीची पूर्णता!

असें मूल आपल्याला असतें तर दुसऱ्या पुरुषाशीं प्रेमालाप करणाऱ्या आपल्या आईविषयीं त्याला काय वाटलें असतें? दुसरा पुरुष—दुसरा पुरुष! कितीतरी दुसरे पुरुष तिच्या परिचयाचे होते. लल्लूभाई, प्रो. सबनीस, महांबरे मास्तर, कॅ. मोहिले, सरदार जगताप! हा सडलेला सरदार तिला राख म्हणून ठेवूं इच्छित होता. अर्ध्या वयाचा महांबरे तिच्या पैशावर दृष्टी देऊन होता. हाडकुळ्या सबनीसानें एकदां हस्तांदोलनाच्या निमित्तानें तिचा हात दाबला होता. बोलून चालूनच लग्नाचा देव्हारा तिनें बाजारांत मांडला होता! आतां कुणीहि तिचा हात धरावयास काय प्रत्यवाय होता? आणि ते त्यांचे हात दुबळे होते, पापी होते, रोगजर्जर होते. मुकुंदसारखा हात तिनें दुसरा कोणता कधीं पाहिला नाहीं! कधीं स्पर्शिला नाहीं!

आणि त्या स्पर्शाचा आतां तिला हव्यास सुटला होता. किती तर्कशून्य होतें तिचें सारें वर्तन? किती दुबळें होतें? असेल असेल. दुबळें हे

# बंदोबस्त

—अनंत काणेकर

वेडे वसुंधरे, कुरवाळतेस हिरव्या हातांनीं
म्हणून डांबर ओतून, दगड ठेचून
तुझ्यावरून फिरविले अजस्र रूळ!
खुळ्या आभाळा, तुला पाहून होतो अनंताचा आठव,
म्हणून मजल्यावर मजले, छपरावर छपरें
चढवून केला तुझा बंदोबस्त!

असेल, पण ह्या क्षणीं त्याचा विचार तिला असह्य झाला होता. तो तिला पाहिजे होता. तिला तोच पाहिजे होता, आणि कुणा दुसऱ्याचा विचारहि तिला सहन होत नव्हता. जें शरीर तिनें त्याच्यासारख्या पुरुषोत्तमाला दिलें, तें काय ती आतां दुसऱ्या कुणाला देणार होती? जे हात तिनें त्याच्या गळ्यांत घातले ते काय ती आतां कुणा दुसऱ्याच्या गळ्यांत घालणार होती? तिचें शरीर आणि मन घेण्याइतका समर्थ पुरुष खरोखरच दुसरा कोण होता?—असेल—असेल. त्यानें दुसरें लग्न केलें असेल! तें तिचें शासन होतें—तिचें प्रायश्चित्त होतें! ती यमूला शरण गेली असती, ती त्याची दासी झाली असती!

पण हें काय खरोखरच आतां शक्य होतें? यमूनें हें कधीं क्षणभर तरी सहन केलें असतें? मुकुंद आतां यमूचा नवरा होता! होय, होय, तो आतां तिचा कोणी नव्हता—कोणी नव्हता! त्याच्या दृष्टीनें ती आतां एक परस्त्री होती! परस्त्री! त्याची बायको म्हणून त्याच्या सहवासांत राहिल्यावर स्त्रीला जोडता येणें शक्य आहे तेवढें निकटचें नातें त्याच्याशीं जोडल्यावर ती आतां केवळ एक परस्त्री होती! आतां त्याची बायको होती यमू!

एकेकाळीं जें वीणाचें होतें तें सारें आतां यमूचें झालें होतें, तीं दोघें आतां नवरा बायको होतीं—आणि वीणा होती केवळ एक परस्त्री!

"परस्त्री – परस्त्री – !" वीणा बडबडली व ती शुष्क ओठांनीं हंसली. एकदां तिनें डोळे वर करून पाहिलें. सूर्य तापत होता. त्याच्या त्या तापाचें वीणेला भान नव्हतें. पुन्हां ती विचारांच्या आवर्तांत गिरक्या घेऊं लागली.—तीं दोघें नवराबायको आहेत. तिच्या विचारांची सांखळी पुन्हां सुरू झाली. काय करीत असतील आतां तीं दोघं? जेवत असतील. त्याच त्या हॉटेलांत तीं दोघें उतरलीं होतीं. त्याच त्या हॉटेलांत एकेकाळीं वीणा मुकुंदाची नवपरिणित वधू म्हणून मिरवली होती. तर मग त्या हॉटेलांत काय करत असतील तीं दोघं? जेवत असतील. ती त्याला हवें नको करीत असेल. तो तिच्या तोंडांत घांस देत असेल. तोच जुना परिचा-

अनुक्रमणिका

रक जॉन अदबीनें कडेला उभा असेल. तीं दोघें हंसत खेळत जेवतील. मग कदाचित् सुखदुःखाच्या गोष्टी करतील. कदाचित् ती त्याचे पाय चेपून देईल आणि तोहि कदाचित् तिचे पाय चेपील! होय, तेहि अगदींच शक्य होतें. तो संपूर्णपणें तिच्या अधिकारांत गेला होता. तिच्या प्रेमांत पडला होता. तिचा दास झाला होता. ती त्याच्या मुलाची आई होणार होती. तीं दोघं आतां परस्परांत मिसळून गेलीं होतीं. तिनें त्याला स्वतःशींच अनंत कालाकरितां बांधून घेतलें होतें. किती हळूवारपणें तो तिच्याशीं बोलत असे, किती मवाळपणें वागत असे! जसें एखादें आज्ञाधारक मूल! तिनें त्याचा इतका मृदु स्वर कधीं ऐकलाच नव्हता, इतकें मऊ वागताना तिनें त्याला कधीं पाहिलेंच नव्हतें.

ती गेली होती त्याच्याकडे आपला अहंकार घेऊन, व त्याच्या अहंकारावर टक्कर खाऊन चूर झाली होती. ह्या धिप्पाड पुरुषांत यमूला जें मार्दव सांपडलं, जी आज्ञाधारकता सांपडली, जें प्रेम सांपडलें, तें तिला कधीं सांपडलेंच नव्हतें! तिनें त्याला दिलें आव्हान. दिला त्याच्या मर्मावर घाव, व स्वतःच्या मर्मावर घाव घेऊन रक्त ओकत ती आतां इथें पडली होती.

–इथें पडली होती ? इथें पडली होती ? कुठें पडली होती ती ? वीणेनें डोळे किलकिले करून वर पाहिलें. सूर्य तिच्या चेहेऱ्यावर प्रकाशाचे झोत मारत होता. आतां टळटळीत मध्यान्ह होत होती. इतक्या दूर–रानांत–एकटी ! आणि आता ह्यावेळीं तीं दोघें छायेंत असतील. जेवत असतील. हास्यविनोद करीत असतील. सारा दिवस तीं दोघें असाच आनंदांत घालवितील आणि मग तीं दोघें एकमेकांच्या कुशींत झोंपी जातील. नंतर सदैव एकमेकांच्या सहवासांत तीं दोघें असतील– आणि ही एकटी असेल, आतांहि या उन्हातान्हांत, उपाशी तापाशी ती एकटीच होती. तिला कुणी "जेव" म्हणणारें नव्हतें. कुणी जवळ घेणारें नव्हतें, ह्या इथें आणि साऱ्या जगांत ती आतां एकटीच होती. तो तिला विसरला होता. त्यानें तिचें थडगेंहि बांधून टाकलें होतें. आणि यमूला तिच्याविषयीं विशेष कमलेंच कुतुहल नव्हतें. तिला केवळ तिच्यासाठीं थोडें वाईट वाटत होतें—थोडी करुणा वाटत होती. आज ती वीणेची दया करण्याच्या अवस्थेंत हाती. कारण आतां ती पोरकी नव्हती. अनाथ नव्हती. आतां तिला आधार मिळाला होता. आतां तिला मुकुंद मिळाला होता. आतां ती त्याची स्वामिनी होती, गृहिणी होती आणि वीणा मात्र होती एक परस्त्री !

मुकुंदनें संसाराच्या देव्हाऱ्यांत आतां यमूची प्राणप्रतिष्ठा केली होती व वीणा मात्र आतां उघड्यावर येऊन पडली होती. आपल्या पायानें ती येथें चालत आली होती.

आणि आतां तिला मुकुंद हवा होता. त्याचा स्पर्श हवा होता, त्याचें पत्नीपद हवें होतें. त्याचें दासीपद तरी हवेंच होतें. स्वाभिमान, बुद्धिवाद, समानाधिकार, कशाचीच तिला आतां मातब्बरी वाटत नव्हती. कांहीं वेळ तिची बुद्धि तिच्याशीं भांडली—ही दुर्बलता होती, हें पतन होतें, हा केवळ एक जुनाट संस्कार होता ! देव्हाऱ्याचा संस्कार ! चुकवूं म्हटल्यानेंहि तो तिला चुकविता आला नव्हता ! जशी मुकुंदची मिठी, मुकुंदचा स्पर्श तिला पुसता आला नव्हता !—तरी पण हा होता एक दुष्ट आणि तर्कशून्य संस्कारच ! तिची बुद्धी तिला सांगत होती. पण आंतरिक प्रेरणेच्या, स्त्रीसुलभ कामनेच्या महापुरानें तिच्या क्षीण तर्कांचा बांध नामशेष करून टाकला होता. आतां ती बुद्धिवाद जाणत नव्हती. तर्कवाद जाणत नव्हती. तिचें शरीर आणि तिचा आत्मा ह्या क्षणीं केवळ मुकुंदसाठींच आक्रोश करीत होते—दासी तर दासी ! ती त्याची दासीहि व्हावयास सिद्ध होती ! अखेर ती त्याचीच तर होती ! आतां दुसऱ्या कुणाची होणें तिला कसें शक्य होतें ?

त्याच्याविना ती कशी जगणार होती ? आयुष्याचें वैराण वाळवंट ती एकट्यानें कुठवर तुडविणार होती ?—आणि ती होती तर एकटीच ! ह्या गर्द रानांत, ह्या उघड्या बोडक्या डोंगरांच्या सहवासांत अथांग विक्राळ आकाशाखालीं ती एकटीच होती !

वीणेनें त्या रानाकडे पाहिलें, त्या डोंगरांकडे पाहिलें, त्या आकाशाकडे पाहिलें, व तिचें मन अवर्णनीय भीतीनें भरून गेलें ! स्तिमित दृष्टीनें त्या आकाशाकडे, त्या रानाकडे व त्या डोंगरांकडे पहात हुंदका देऊन ती ओरडली "मुकुंद !" आणि पळभरांत समोरच्या डोंगरावरून खोल, भयानक स्वरांत प्रतिध्वनी उमटला "मुकुंद !" तो प्रतिध्वनी ऐकून वीणा कांपली. "भुईवर पालथी पडली व डोक्यांत माती घालून तिनें आक्रोश केला, मुकुंद—मुकुंद—मुकुंद !"—आणि चेहेऱ्यावर चपराक मारावी तसे क्षणभरांत पुन्हा समोरच्या डोंगरावरून पडसाद उलटून आले "मुकुंद—मुकुंद—मुकुंद !" आणि उन्हानें रगरगणाऱ्या कड्या कपाऱ्यांतून ते अमानुष पडसाद कांहीं वेळ तसेच कांपत राहिले.

• • •



अनुक्रमणिका



पुन्हा कधींही कुठेंही दिसणार नाहीं— अशी

# पंचाण्णव पौंडांची मुलगी

संध्याकाळचे पांच वाजले. उन्हें सौम्य झालीं. शहराच्या मध्यभागीं असलेल्या मोठ्या बागेकडे लोक हवा खाण्यासाठीं येऊं लागले. शेंगावाले, चणेफुटाणेवाले, भेळवाले ओरडूं लागले. आणि एकाएकी, रंगीत चिमण्यांचा थवा चिवचिवाट करीत आभाळांतून जमिनीवर उतरावा तशा पांच सहा मुली बागेच्या मोठ्या फाटकापाशीं आल्या. गांवरान शेंगावाला, चणे फुटाणेवाला, भेळवाला, सगळ्यांना डावलून त्या फाटकाशेजारीच असलेल्या, वजन करण्याच्या यंत्राकडे आल्या.

यंत्रासाठीं मुद्दाम बनवलेल्या, एखाद्या मोठ्या लाकडी कपाटासारखें असलेल्या घरांत, यंत्राशेजारच्या स्टुलावर महादेव बसला होता, तो बावरून उभा राहिला. त्या मुलींच्या घोळक्यांतून एक तरुण मुलगी आंत आली आणि मान तिरकी करून तिनें महादेवला विचारलें,

"चालू आहे नं यंत्र?"

एखाद्या हिरव्यागार डेलियाच्या शेंड्यावर उमललेलें गुलाबी फूल दिसावें, तशी ती महादेवाला दिसली. हिरव्या साडीचा घोळ आवरून ती पायऱ्यावर चढण्याच्या बेतात होती. तिचा उभट चेहरा महादेवाच्या चेहऱ्यापासून फारतर तीन फुटावर असेल. स्नो पावडरचा सुरेख वास महादेवला आला आणि हंसरा चेहरा आणि मोठे डोळे असलेल्या त्या सुंदर मुलीला काय उत्तर द्यावें हें त्याला सुचेना. कसेंसेंच हंसून त्यानें खालीं पाहिलें. आणि खांदे उंचावून ती सुरेख मुलगी पण हंसली. हंसत हंसतां मुरडून तिनें मागें उभ्या असलेल्या मैत्रिणींकडे बघितलें. वाऱ्यानें वेल हलावी तशी ती हलली आणि मग आपला लहानसा गोरापान पाय उचलून तिनें पायऱ्यावर ठेवला. दुसरा ठेवला, यंत्राच्या उभ्या चिरींत आणेली टाकली. खर्र खट् आवाज झाला. तिकिट येऊन यंत्राच्या ओंजळींत पडलें. तें उचलून घेऊन ती पायट्यावरून खालीं उतरली. मागल्या मुली चिवचिवल्या—

"ए, किती ग?"

"भविष्य बघ आधीं."

"मागें फोटो कुणाचा आहे? अय्या दिलीपकुमार!"

मग सगळ्या मुली तिच्याभोवतीं जमल्या. रंगीन पदर फडफडले, पातळें सळसळलीं, रिबिनी चमकल्या. महादेव गोंधळून बघत होता. पुनः ती मुलगी हंसली. एखादा पाण्याचा झरा खळखळावा तशी; स्वच्छ, सहज, अवखळ. बासरींतून निघावा तसा तिच्या गळ्यांतून आवाज निघाला,

"अग, फक्त पंचाण्णव पौंड."



अनुक्रमणिका

"पुष्कळ झालं कीं ! माझं तर ऐंशीच आहे."

"नाहीं नाहीं. निमे, आणखी पांच पौंड जर वाढवलेस तर छान दिसशील तूं. उंचीच्या मानानं तेवढं पाहिजे ग !"

"अग पण कसं वाढवायचं ? मी किती प्रयत्न करते; पण वाढतच नाहीं."

"अंडीं खा अंडीं—"

"शी, कशीं तीं खायचीं ?"

फुटबॉलसारखा गोल गरगरीत गुजराथी, त्याची सोनेरी चष्मा लावलेली किडकिडीत बायको, आणि दोन मुलें फाटकांतून बाहेर आलीं. वजनाच्या यंत्रापाशीं जाण्याचा रस्ता अडवून उभ्या राहिलेल्या या मुलींकडे बघून गुजराथ्यानें हातांत धरलेला धोतराचा सोगा सोडला. त्याची गुबगुबीत मांडी झांकली. खांद्यावरचें मूल एका हातानें सावरीत, दुसऱ्या हातानें त्यानें नाक चोळलें आणि मऊ आवाजांत म्हटलें,

"बाई, जरा बाजू देनार का ?"

जवळ दगड पडतांच चिमण्या उडाव्या तशा त्या मुली पांगल्या. हंसत खिदळत फाटकांतून आंत शिरल्या, दिसेनाशा झाल्या.

महादेव बघत होता. त्याच्या छातींतली धडधड अजून चालू होती. तापलेलीं कानशिलें अजून निवलीं नव्हतीं. आपल्या दोन्ही हातांचें काय करावें हें त्याला कळत नव्हतें. ते कुठें ठेवावे हें समजत नव्हतें. ते उगीचच वर खालीं, बाजूला होत होते. आपला श्वास असा जोरानें कां होतो आहे, हेंहि त्याला कळत नव्हतें.

तो गोल गुजराथी त्याच्या समोर उभा राहून विचारत होता,

"ए, पोऱ्या. चिल्लर हाय काय तुझ्यापाशीं ?"

महादेव सावरून उभा राहिला.

"काय ?"

"अरे तुझ्यापाशीं चिल्लर हाय काय रुपायाची ?"

महादेवानें आखुड चड्डीच्या खिशांत हात खुपसले. शर्टचा खिसा बघितला. यंत्राच्या चावीखेरीज हाताला कांहीं लागलें नाहीं. तेव्हां तो उगीचच गोंधळला. एकदम म्हणाला,

"चिल्लर ना शेठ ? आहे, आहे कीं."

मग त्याला वाटलें कीं, आपण खिशांत कशाला बघतोय ? सुटीं नाणीं सगळीं यंत्रांत आहेत मोड ठेवलेलें कातडी पाकीट यंत्राच्या कप्प्यांत आहे. घाईनें चावी लावून त्यानें छोटें दार उघडलें आणि कातडी पाकीट बाहेर काढलें. शेटच्या हातांतली नोट घेऊन त्याला सोळा आणे दिले. पायट्यावर चढल्यावर शेठची बायको नाणें चिरींत घालूं लागली तेव्हां घाईनें महादेवाचा हात चिरीवर गेला.

मख्खपणें बाई पायट्यावर चढली आणि तिनें नाणें टाकलें. गुजराथ्यानें तिकीट बघितलें. तो म्हणाला,

"नव्वद पौंड !"

आणि त्यानें भविष्य वाचलें, 'नुकसानीचा पाया असलेलें अपयश !'

"कांय तरी लिवल्यात लेकाचे. फायदा नुकसानी ह्याना काय समजती ?"

मग तीं पोरें आलीं, त्यांनीं वजन केलें. गुजराथ्यानें स्वतःचें केलें. सगळं कुटुंब वजन समजावून घेत रस्त्यानें चालूं लागलें. त्याच्यानंतर एक म्हातारा आला. एक प्रौढ बाई आली. एक मिशावाला खेडूत आला. नाणीं सरकत होतीं, तिकिटें पडत होतीं. लोक भेळ खात

होते, हवा खात होते, वजन करत होते. चैन म्हणून हवा खायची, चैन म्हणून भेळ खायची, चैन म्हणून वजन करायचें. संध्याकाळचें सोनेरी उन्ह बागेवर पडलें होतें. थंड वारा वहात होता. माणसें हिंडत होतीं. हिरवळीवर बसत होतीं, बांकांवर बसत होतीं. हळूं हळूं बागेंतली गर्दी वाढत होती.

महादेव उभा होता, तो स्टुलावर बसला. आतां कोणी येत नव्हतें, आणि जरी आलें तरी यंत्र आपोआप काम करीत होतें. मग थोडें बाहेर डोकावावयाला काय हरकत आहे? पण काय डोकावायचें? बाग काय आज नव्यानें दिसत होती? माणसें काय आज नव्यानें दिसत होतीं? हें रोजचेंच आहे. दोन वर्षें महादेव इथें नोकरी करीत होता, मग त्याला मुद्दाम डोकावण्यासारखें बागेंत होतें काय?

महादेव उभा राहिला. पाठमोरा वळला. यंत्राच्या कपाळावर आरसा होता, त्यांत बघून त्यानें भांग नीट केला. त्याचा रंग चांगलाच काळा होता. भुंवया जाड होत्या. गालांवर मुरमाच्या चारदोन पुटकुळ्या तरारल्या होत्या. आणि ओठांवर, व हनुवटीवर पातळ केस दिसूं लागले होते.

खिशांत हात कोंबून, तो त्या रंगीत कपाटाबाहेर आला, फाटकापाशीं उभा राहून बागेंत बघूं लागला. हिरवीगार बाग माणसांनीं फुलून गेली होती, रंगीबेरंगी झाली होती. किती बायका होत्या, किती मुलें होतीं, किती पुरुष होते! बायका बसल्या होत्या, हळूं हळूं हिंडत होत्या. पुरुष बोलत होते, मुलें पळत होतीं, हांका मारीत होतीं. वाऱ्यानें फुलांचा ताटवा हलावा, तशी बाग हलत होती. मधमाशा गुणगुणाव्या तशी गुणगुणत होती. बागेंत लोकांच्या रंजनासाठीं पांखरें ठेवलीं होतीं, रानांतलीं जनावरें ठेवलीं होतीं. संध्याकाळ होत होती, दिवस मावळत होता म्हणून मोर ओरडत होते, कबुतरें घुमत होतीं, चिमण्या चिवचिवत होत्या. महादेवाची नजर पाळल्या कबुतरासारखी बागेवरून फिरत होती, पण ओळखीचा चेहरा दिसत नव्हता. इथें तिथें पातळें सळसळत होतीं, पदर फडफडत होते, रिबिनी चमकत होत्या. महादेवाची नजर इकडून तिकडे फिरतच होती. ओळखीचा चेहरा दिसत नव्हता.

मागून कुणी तरी ओरडलें,

"ए वजनवाला, अरे हें तिकिट अडकून बसलं कीं."

गडबडीनें महादेव परत कपाटांत आला. यंत्राचें दार उघडून त्यानें तिकिट काढून दिलें. त्याच्यापेक्षां उंचीनें थोडें जास्त आणि रंगानें तांबडें-लाल असलेल्या यंत्रापाशीं तो उभा राहिला. त्याची नजर, बागेंतून फाटकाबाहेर पडणाऱ्या माणसांभोंवती घुटमळूं लागली. अंधार पडूं लागला. रस्त्यावरचे आणि बागेंतले पारव्या रंगाचे दिवे प्रकाश टाकूं लागले. समोर आडव्या असलेल्या रस्त्यांवरून प्रकाशाचे झोत टाकीत मोटारी धावूं लागल्या. सायकली पळूं लागल्या. फूटपाथवरून माणसांची गर्दी जाऊं लागली. पारव्या दिव्याभोंवतीं किडे फिरूं लागले. पारव्या प्रकाशानें रंग बदललेलीं माणसें फाटकांतून बाहेर पडून घराकडे जाऊं लागलीं.

महादेवनें पारवी नळी मघांच पेटवली होती. कपाटांत उभा राहून तो सारखा बघत होता. मघांची ती पंच्याण्णव पौंड वजनाची मुलगी कुठें आहे? मघां आंत गेलेली ती एकशें तीस पौंडाची पंजाबी बाई सलवार फडकावीत बाहेर पडली. पोटांत मूल असलेली शंभर पौंडवाली ती काळी मराठी बाई आणि तिचा लठ्ठ नवरा मुलांना आवरीत मघांच गेला. तो उभ्या उभ्या भेळ खाणारा आणि पुनः पुनः वजनाचें तिकिट बघणारा म्हातारा गेला. आंत जातांना ध्यानांत राहिले तेवढे सगळे चेहरे बाहेर पडतांना पाहिले. पण हिरवी साडी, तांबडे काठ, हळदी ब्लाऊझ असलेली ती पंच्याण्णव पौंडांची उंच मुलगी कुठाय? नि त्या हंसऱ्या मैत्रिणी कुठं गेल्या? या फाटकाशिवाय आणखी चार छोटीं फाटकें बागेला होतीं. त्यापैकीं एकांतून ती परत तर गेली नाहीं? अशी वर, या डांबरी रस्त्यानें? मग ती जंगली महाराज रस्त्यावरच्या एखाद्या सुरेख बंगल्यांत रहाते का? का वाकडेवाडीपलीकडे, मुंबईरोडला असलेल्या नंबरवाल्या बंगल्यांतली ती होती? का पुढच्या फाटकापाशीं असलेल्या बसस्टॉपवर ती तीन नंबरच्या बसमध्यें बसली आणि इकडे खालीं, डेक्कन जिमखान्याकडे गेली? अशी कशी गेली ती? आणि मला दिसलें कसें नाहीं? कदाचित् आपल्या मैत्रिणींच्या घोळक्यांत ती अजून हिरवळीवर





अनुक्रमणिका

# निळा पारवा



— इंदिरा

[illegible] माथ्यावरती
झुलतो आहे
[illegible] निळा पारवा.
[illegible]

— [illegible] निळा पारवा.
[illegible]
[illegible] वारें
[illegible]

बसली असेल. आपल्या एवढ्याशा रुमालांतून तिनें खारे दाणे आणले असतील आणि खारीप्रमाणें एक एक दाणा कुरतडीत ती अजून गार हिरवळीवर बसली असेल. असेल, अजून कांहीं फार वेळ झाला नाहीं.

महादेवनें यंत्राच्या कपाळावर असलेल्या लहान घड्याळाकडे पाहिलें. आठ वाजून दहा मिनिटें झालीं होतीं. म्हणजे त्याची नोकरी आणखी फक्त वीस मिनिटें राहिली होती.

आतां बागेंतून एखादा दुसरा माणूस बाहेर पडत होता. भेळवाला आवराआवर करीत होता. फुगेवाल्याच्या गाडीवरच्या टेंबा आतां विझत आला होता. मद्यांचा गोंधळ अगदीं शांत झाला होता. म्हणजे ती गेली म्हणायची! महादेव स्टुलावर बसला. [illegible]च त्यानें वरच्या नळीकडे पाहिलें; खालीं पाहिलें, गुडघे हलवले, शीळ घातली, समोर पाहिलें.

समोरच्या रस्त्यांवर आतां क्वचित सायकल पळत होती. मोटार धांवत होती. तुरळक माणसांची ये जा चालू होती.

लाल टोमॅटो, पिवळी जर्द शेव, पांढरे चिरमुरे आणि गॅसची बत्ती असलेली भेळवाल्याची गाडी हळूं हळूं त्याच्यासमोर आली. भेळवाला म्हणाला,

"कां वजनवाले, किती वाजले?"

महादेवानें चमकून घड्याळाकडे पाहिलें. पावणे नऊ वाजत आले होते. दिवा विझवून तो बाहेर आला. कपाट लावून त्यानें कुलूप घातलें. मोकळ्या रस्त्यांवरून सावकाशपणें चालत तो पुलाच्या वाडींत असलेल्या आपल्या घराकडे चालू लागला. त्याला विलक्षण भूक लागली होती. पंच्याण्णव पौंडाची मुलगी पुनः दिसली नाहींच.

• •

दुसरे दिवशीं, आणि नंतर प्रत्येक दिवशीं महादेवानें अधीरपणें वाट पाहिली. आणि हिरवी साडीवाली मुलगी पुनः दिसली नाहीं. इतक्या मुली येत होत्या, बसत होत्या, हंसत होत्या, शेंगदाणे खात होत्या, वजन करीत होत्या; आणि त्यांत ती उंच मुलगी मात्र दिसत नव्हती. रोज महादेवाला वाटे, आज ती येईल. संध्याकाळ झाली कीं फाटकाशेजारीं उभा राहून तो बघत राही. मुली येत, तास दोन तास हिंडत आणि निघून जात. पण त्यांत ती दिसली नाहीं. महादेवाला वाटे, आपण या फाटकाशेजारीं उगींच उभे राहिलों. कदाचित् ती दुसऱ्या फाटकानें गेली असेल, हिरवळीवर बसली असेल आणि निघून गेली असेल. आपल्याला काय कळणार? त्यापेक्षां ड्यूटी सोडून थोडा बागेंत हिंडलों असतां तर बरें झालें असतें. पंधरा वीस मिनिटें हिंडलों, तर कुठें बिघडलें? शेठ कशाला बघायला येतो आहे? सकाळीं नऊपासून दुपारीं बारापर्यंत, आणि पुनः तीनपासून साडेआठपर्यंत एका जागीं बसून माणसाला कंटाळा नाहीं का येत? संध्याकाळीं थोडा वेळ बागेंतून फिरलों तर कांहीं वावगें नाहीं!

आणि ठरवल्याप्रमाणें महादेव बागेंत फिरून बघत होता. पण, तरीहि [illegible] त्याची गांठ पडत नव्हती. इतक्या मुली नजरेला पडत होत्या. पण [illegible] ती मात्र दिसत नव्हती. महादेव जेव्हां फाटकापाशीं उभा राहून [illegible] होता तेव्हां ती दुसऱ्या फाटकानें येत होती का? परस्पर येऊन जात [illegible] का? तो जेव्हां बागेंतून हिंडत असे त्या वेळीं, ती अद्याप आलेलीच [illegible] आणि हिरवळीवर [illegible] तो यंत्राशेजारीं उभा रहात असे, तेव्हां ती नेमकी [illegible] बागेंत घडत होतें का? महादेवची आणि तिची चुकामूक [illegible] होती का? [illegible] चुकामूक! वेगवेगळ्या पद्धतीनें; पण दररोज चुकामूक

अनुक्रमणिका

होत असली पाहिजे. ती येत होती; जात होती; आणि महादेवाला दिसत नव्हती, असें घडत असलें पाहिजे. रोज संध्याकाळीं महादेवाची निराशा होत होती. स्वच्छ कपडे घालून, केस नीट विंचरून तो रोज वाट पहात होता आणि त्याची निराशाच होत होती. सात आठ दिवस तो असा वाट पहात राहिला, बागेंतून हिंडत राहिला. तरीहि ती मुलगी दिसली नाहीं. त्यानें वाट पाहण्याचें सोडून दिलें, बागेंत फिरायचें सोडून दिलें. पुनः तो नेहमींप्रमाणें यंत्राशेजारच्या स्टुलावर गंभीर चेहऱ्यानें बसून राहूं लागला. पुनः पहिल्यासारखेच त्याचे दिवस उदास, कंटाळवाणे जाऊं लागले. खरें तर महादेवाचें वय हंसण्याखिदळण्याचें होतें. पुलाच्या वाडींतील त्याच्या बरोबरीचीं पोरें किती [illegible]ड होतीं. घरापुढूनच वहाणाऱ्या नदीच्या कांठानें तीं दिवसभर उनाडत, मासे पकडत. आजूबाजूच्या रानांतले पेरू चोरून आणत, विड्या सिगारेटी ओढत, आणि दुसऱ्या गल्लींतल्या पोरांशीं मारामारी करत. त्यांच्यापैकी कांहींजणांपाशीं सुरेख चाकू होते. सहज बोलतांना तीं पोरें 'भोसकीन,' 'डेडळा पाडीन' असे शब्द वापरत. गांवांत कांहीं दंगल झाली कीं, शिपायी लोक त्यांच्यापैकीं कांहीं जणांना धरून नेत. गांवांतल्या दादा लोकांच्या भोंवती भोवती हिंडणारीं कांहीं मुलें भांगेची हिरवी गोळी खायला शिकलीं होतीं. बदफैली बायकांशीं तीं रस्त्यांत बोलत उभीं रहात, त्यांनीं दिलेला चहा पीत, पानपट्टीच्या दुकानाशीं जाऊन पान खात. गांधी टोपी, रेघारेघांचा शर्ट आणि खालीं रुंद पायजमा अशा वेषांत हिंडणारीं, महादेवाच्या बरोबरीचीं हीं मुलें उदास, गंभीर कधींच नसत. रस्त्यानें जाणाऱ्या मुलींची ती चेष्टा करून सिनेमांच्या खिडकीशीं जाऊन दंगल करत, कसल्याहि हरताळ मिरवणुकांतून, धुंद होऊन घोषणा करत, गणपती उत्सवांत गुलाल फासून, धुंद होऊन नाचत; मुठेच्या लालभडक पुरांत, पुलावर उभीं राहून धडाधड उड्या टाकत. बरें तीं सगळींच पोरें निव्वळ उनाडपणा करीत असें नाहीं. त्यांच्यापैकी कांहींजण सिनेमाच्या तिकिटांचा काळाबाजार करत. कांहींजण शेंगा, पेरू, केळीं फेरीनें विकणाऱ्याचा धंदा करत. कांहींजण थिएटरपाशीं, मंडईपाशीं, सायकलीपाठीमागें दोन पैसे घेऊन सायकल-स्टँड चालवत. कुणी स्टेशनवर हमाली करत, कुणी ऑफिसमधें, शाळेंमधें गड्यांचीं कामें करत. म्हणजे तीं नोकरी करीत होतीं, पैसे मिळवीत होतीं, आणि तरीहि गंभीर, अबोलकीं नव्हतीं.

महादेव गंभीर होता. त्याला हंसूं क्वचित येई. लहानपणापासून त्याला सारखीं कामें करावीं लागलीं होतीं. जेवणाचे डबे पोंचवणें, मुलांना संभाळणें, भांडीं घासणें, अर्धांग झालेल्या माणसाला खुर्चीवर घालून ती रस्त्यावरून हिंडवणें. महादेवानें अनेक ठिकाणीं, अनेक कामें केलीं होतीं. त्याला कुणी मारलें होतें, कोणी उपाशी ठेवलें होतें, सर्वजण सतत टाकून बोलत आले होते. महादेव हंसायचें विसरला होता, मोकळेपणानें बोलायचें विसरला होता. तो नेहमीं गंभीर असे, एकटा असे.

वाट पाहिली आणि निराशाच पदरीं आली तेव्हां महादेवानें बागेंत बघितलें नाहीं, फाटकापाशीं बघितलें नाहीं. दिवस जात राहिले. महादेव रोजचें काम करत राहिला. असा महिना गेला. आणि एके दिवशीं, ध्यानीं मनीं नसताना पंचाण्णव पौंडाची मुलगी आली. या खेपेला तिच्याबरोबर बुटकी आणि काळी अशी एकच मैत्रिण होती. हिरव्या साडीऐवजीं आज तिनें मोठमोठे काळे कांठ असलेली पांढरी स्वच्छ साडी नेसली होती, खणाचा ब्लाऊझ घातला होता. महादेव एकदम बावरून उभा राहिला. त्याच्या काळजांत लक्‌ झालें! भेळवाला, शेंगावाला, पेरूवाला, सगळ्यांना डावलून ती महादेवकडेच आली. फुलानें लहडलेली जाईची फांदी समोर आल्यासारखी महादेवाच्या समोर आली. तिचे गुलाबी लहान ओठ विलग झाले. पारव्या दिव्याचा उजेड पडावा तशी ती हंसली. तिनें विचारलें,

"दोन दोन पैशांचीं दोन नाणीं टाकलीं तर चालतील का?"

महादेव हः हः करून हंसला आणि त्यानें नकारार्थी मान हलवली.

ती काळी मुलगी वाईट हंसून म्हणाली,

"काय हरकत आहे? एक आणा झाला म्हणजे झालं ना?"

चेहरा गंभीर करून महादेव म्हणाला,

"नाहीं बाई, चालणार नाहीं. निकेलच पाहिजे."

यावर तोंडाला रुमाल लावून ती सुंदर मुलगी हंसली. असें सारखें हंसूं तिला कशाचें येत होतें आणि कसें येत होतें कोण जाणें. मग भर्रकन् ती पायरीवर चढली, तिकिट घेऊन खालीं उतरली.

"अय्या, पंच्याण्णवच कीं ग."

"होय? अग मग ती दुधाची साय, लोणी, शिरा. सगळ्याचं झालं काय?"

"सगळं फुकट गेलं! एक पौंडाचा सुद्धा फरक नाहीं!"

काळ्या मुलीनें तिच्या हातांतलें तिकिट हिसकून घेतलें आणि भविष्य वाचलें,

"Your planets give strife and discord. जाल तिकडे लढा आणि भांडणें हेंच तुमचें ग्रहमान."

"गेल्या खेपेला हेंच होतं."

"मग जाशील तिकडे लढा आणि भांडणें झालीं का?"

"अग, जीवन हाच एक प्रचंड आणि अखंड लढा आहे."

पंच्याण्णव पौंडाची मुलगी हनुवटी वर करून हंसली. काळी मुलगी वाईट हंसत म्हणाली,

"वहावा, जीवन हें एक अखंड चाललेलें भांडणहि आहे."

यांत एवढें हंसण्यासारखें काय आहे, हें महादेवाला कळलें नाहीं. पण त्या गोऱ्यापान, सडसडीत मुलीचें तें मोकळें हंसूं बघून त्यालाहि हंसूं आलें. गालांतल्या गालांत नव्हे; महादेव चांगला मोठ्यानें हंसला. हातांचे तळवे त्यानें चोळले आणि खालीं वाकून तो मोठ्यानें हंसला. त्यासरशीं मुलींचें हंसणें एकदम बंद झालें.

काळ्या मुलीनें मान वळवून रागानें महादेवकडे पाहिलें. चार पावलें ती पुढें आली. डोळे एवढाले करून म्हणाली,

"काय रे, हंसायला काय झालं? बराच आहेस कीं."

आणि मग एकमेकींच्या दंडाला धरून त्या दोघी बागेंत गेल्या, एकमेकीला धक्के मारत, कुलकुलू बोलत चालूं लागल्या. एकदम थांबलेलें त्यांचें हंसणेंहि पुनः सुरू झालें.

महादेव गंभीर झाला आणि स्टुलावर बसून राहिला. काळ्या मुलीच्या त्या दटावणीनें तो ढेकळासारखा विरून गेला. पुनः त्याच्या चेहऱ्यावर ती उदासीनता, डोळ्यांत पहिलें कारुण्य आलें. पण खरी गोष्ट अशी होती कीं, या काळ्या मुलीकडे लक्ष कां द्यायचें? ती कोण? तिच्या दटावणीला भीक घालायला तिचें वजन काय पंचाण्णव पौंड होतें? ती उंच, सडसडीत आणि गोरीपान थोडीच होती? तिचा चेहरा काय डेलियाच्या फुलासारखा ताजा, टवटवीत होता? ती जवळ येतांच, जाईच्या वेलीपाशीं जातांच यावा तसा सुरेख वास थोडाच येत होता? मग तिला

जुमानावयाचें कारण काय? हां. आतां पंचाण्णव पौंड वजनाची ती मुलगी जर हंसली असती, हेटाळणीनें तिनें जर पाहिलें असतें, तुच्छतेनें ती जर असें बोलली असती तर तोंडांत मारल्यासारखें गप्प बसणें बरोबर होतें. पण ही कोण? अरे, सोन्यासाठीं चिंधी संभाळायची! तिची मैत्रिण म्हणून हिच्याशीं अदबीनें वागायचें; नाहीं तर विचारतो कोण? बसल्या बसल्या महादेवाच्या मनांत हे विचार आले आणि तो तडफेनें उठून उभा राहिला, यंत्रावर फडकें मारूं लागला. पाठीमागें लावलेलें, गुरु नानक, महात्मा गांधी, सुभाष बाबू हे फोटो पुसूं लागला. लोक येऊं लागले. यंत्रांत आणे पडूं लागले. तिकिटें पडूं लागलीं.

मुलगी दोन वेळां आली आणि महादेवाच्या मनांत चांगलीच उलथापालथ झाली. पूर्वी तो अबोल, उदास होता तो मनाशींच का होईना, बोलूं लागला; आपल्याशींच का होईना, हंसूं लागला. थोडें नीटनेटकें रहावें असें त्याला वाटूं लागलें. त्याचे कपडे स्वच्छ राहूं लागले. नेहमीं वाढलेले त्याचे केस वेळच्या वेळीं कापले जाऊं लागले. हातापायाचीं नखें तो काढूं लागला. बागेंतल्या नळावर जाऊन, हात, पाय, तोंड वरचेवर धुवूं लागला. सिनेमांतल्या नटीच्या जागीं त्याला ती मुलगी दिसूं लागली. वरचेवर तो पांच आणे खर्चून हिंदी सिनेमा बघूं लागला. प्रेयसीच्या वियोगामुळें प्रियकरानें गायलेलीं ठेकेबाज गाणीं त्याला आवडूं लागलीं. कधीं मधीं तीं तो हलक्या आवाजांत गुणगुणूं लागला. कधीं पडत नव्हतीं अशीं चमत्कारिक स्वप्नें त्याला पडूं लागलीं. आपल्या हातून कांहींतरी विशेष घडतें आहे, याची जाणीव होऊन तो स्वतःवर खूप राहूं लागला. महादेवामध्यें हळूं हळूं असा एक विशेष बदल होऊं लागला. कसलाहि नव्हता तो हा नाद त्या पोराला लागला.

दुसऱ्या महिन्यांतहि त्यानें वाट पाहिली. त्याचे डोळे सारखे तिला शोधत राहिले. पण ती दिसली नाहीं. पुनः त्यांची चुकामूक होत राहिली, का ती मुळीं तिकडे फिरकलीच नाहीं कोण जाणे. पण महादेवाची धडपड चालूच राहिली. मग ज्याअर्थी ती प्रथम महिन्याच्या पहिल्या तारखेला आली, दुसऱ्या वेळेलाहि पहिल्या तारखेलाच आली त्याअर्थी आतांहि येईल अशी खूणगांठ मनाशीं बांधून तो एक तारखेची वाट बघूं लागला. दिवस जातां जाईनात; एक तारीख येतां येईना. अधेंमधें ती येत नाहीं, हें अनुभवानें पक्कें झालें होतें; तरीहि महादेव फाटकापाशीं उभा राहिला, बागेंतून हिंडला. क्वचित्, पाठमोरी मुलगी पाहून त्याचें काळीज धडधडलें,

अनुक्रमणिका

धडधडत्या काळजानें, लाजाळू डोळ्यांनीं तो पाठमोऱ्या मुलीमागें रेंगाळत राहिला. हीच ती, हीच का ती, असा ध्यास त्याच्या मनानें घेतला; पण पुढें होऊन चेहरा बघण्याचें धाडस त्याला झालें नाहीं. मग अचानक चेहरा वळला. ती दुसरीच मुलगी निघाली आणि महादेव शरमून गेला. खालीं मान घालून यंत्राशेजारीं बसला. अशी फसगंमत झाली. शरम वाटली. आणि तरीहि एक तारखेपासून तीस तारखेपर्यंत महादेव वाट बघत राहिला.

ती नेमकी पहिल्या तारखेला पुनः आली. पुनः तिनें वजन केलें. तें एका पौंडानेंहि वाढलें नाहीं म्हणून ती पुनः खट्टू झाली. तिचा गोंडस चेहरा उतरला. हंसत, लवलवत पुनः ती निघून गेली. महादेव खूष झाला. हिरव्या गवतावर कोंकरूं बागडावें तसें त्याचें मन बागडलें. त्यानें शीळ घातली, गाणें गुणगुणलें. अदबीनें मोड दिली. यंत्र पुसून पुसून लख्ख केलें. आणि पहिल्या तारखेची वाट पाहूं लागला—एक तारखेला ती येणार याची आतां त्याला खात्री होती. या खेपेला येईल तेव्हां तिचें वजन वाढूं दे अशी तो मनांतल्या मनांत प्रार्थना करूं लागला. चांगलें पांच पौंडानें तिचें वजन वाढावें, अंगापिंडानें भरून ती यावी, तिकिट बघून खूष व्हावी, असें त्याला वाटूं लागलें. वजन वाढण्याच्या बाबतींत आपण कांहीं करूं शकत नाहीं, याचें त्याला वैषम्य वाटूं लागलें. या शेटयाभाट्यांच्या बायका कशा गचगचीत असतात, तिकीट बघून त्या कशा नाकें मुरडतात. देव त्यांना नको तें वजन देतो आणि या बापडीला एखादा दुसरा पौंडसुद्धा देत नाहीं हा काय न्याय म्हणावा काय, असें तो स्वतःशींच म्हणूं लागला; महिन्यांतला एक एक दिवस जाऊं लागला. पांच तारीख गेली, दहा गेली, पंधरा गेली, तीस गेली. एक तारीख आली! आतां ती येणार, हंसणार. 'अहो, तुमच्यापाशी आठ आणे सुटे आहेत का' असें विचारणार! रात्रीं महादेव बराच वेळ जागा राहिला. त्याला झोप आली नाहीं. कधीं उजाडतें असें त्याला होऊन गेलें; ती पंच्याण्णव पौंडाची मुलगी सारखी त्याच्यासमोर येऊन हंसूं लागली. तिच्या अंगाचा सुरेख वास सारखा त्याच्याभोंवती फिरूं लागला. तिचे गोरे पाय त्याला दिसूं लागले.

एक तारीख आली—महादेवानें अधीरपणानें वाट पाहिली. संध्याकाळ झाली. हवा खाण्यासाठीं लोक आले आणि तास दोन तास बसून निघून गेले. बाग मोकळी पडली. मुलगी आली नाहीं. कां आली नाहीं? महादेव नाराज झाला. उदास झाला. पण त्याला खात्री होती कीं ती येईल. एक तारीख आणि दोन तारीख. फरक काय? एक दिवस उशीरा केल्यानें वजनांत काय फरक पडणार? कदाचित् ती दोन तारखेला येईल. आणि दोन तारखेलाहि ती आली नाहीं. महादेव जास्ती निराश झाला. पण, तरीहि त्यानें वाट पाहिली—तारखामागून तारखा गेल्या. महिना संपला, दुसरा महिना आला. तीहि पहिली तारीख चुकली! आणि मग सगळें चुकतच गेलें. तीन चार महिने गेले. ती आली नाहीं. ती काळी पोरगीहि दिसली नाहीं. सुरवातीला तिच्याबरोबर होता तो बोळका? तो आला असेल किंवा नसेलहि! कारण महादेवाच्या ध्यानांत आतां ते चेहरे राहिले नव्हते. अहो, तीन चार मिनिटें खालच्या नजरेनें बघितलेले, ओझरते बघितलेले, ते चेहरे कसे आणि किती दिवस ध्यानांत रहाणार? महादेव पुनः पहिल्यासारखा झाला. पहिल्यांदा होता, त्याहिपेक्षां जास्ती बापुडवाणा दिसूं लागला. त्याच्या अंगावर मळके कपडे आले, दोन दोन महिन्यांचे केस डोक्यावर दिसूं लागले. नखें वाढूं लागलीं—त्याचें सिनेमा पाहणें, गाणीं गुणगुणणें, शीळ घालणें, सगळें बंद झालें. जितका वर गेला होता तितका तो खालीं आला.

उन्हाळा संपला. बागेंतले माळी उद्योगाला लागले. त्यांनीं फुलझाडांच्या कुंड्यांतली जुनी माती बदलून नवी घातली. खत घातलें. नवीं रोपें करायला टाकलीं, जुनीं झाडें छाटून टाकलीं—पावसाळा सुरू झाला. नव्या रोपांनीं जीव धरला, छाटलीं झाडें फुलूं लागलीं—बागेंत कमी लोक फिरायला येऊं लागले. कधीं झिमझिम् तर कधीं धोधो असा पाऊस

# कुशल !



— सरिता पदकी

"आलें कालच परत; —इश्श ! कशाची ग घाई ?
तुझ्यापरी का मी आतां ? —चार लेकरांची आई !

हो, हो, आहेत खुशाल आई, बाबा भाऊ पण
घर झालं आहे सुनं जातां चिमण्या उडून !

तूंच कौतुकें लाविली दारीं छोटी फुलबाग
जोपासिती साक्षेपानं लक्ष देत जागोजाग !

पान फुटतां गुलाबा दूधकळी वा जाईला
भारावती आठवून पोरी, तुझ्या बाळलीला !

शेजारची सुषमा ना ? टाकी पाऊल एकेक;
आल्या चौकशी करीत तुझ्या मैत्रिणी कितीक !

– आणि कोण शेजारचं तो हो ?–रमेश ?–काळ्यांचा !
नाहीं फारसं बोलला होता घुमाच सदांचा !

फक्त जातांना म्हणाला "सांगा नमस्कार" तुला,
"नका ओळख विसरूं"... असं कांहींसं बोलला !

कां ग अशी खुळ्यापरी एकाएकीं निघालीस ?
एवढेंच कां पुसाया दूर इतुक्या आलीस ?"

• • •

पडत राहिला. बागेवर हिरवी कळा दिसूं लागली—आणि श्रावण आला. बाग तरारली. गुलाबाच्या झाडांना तांबडीं लाल फुलें आलीं. नाना रंगी डेलिया फुलला. हिरव्या सालव्हियाला तांबडेभडक तुरे फुटले. जिरेनियमनें नाना रंगाचे घोस उभारले. व्हर्दिना आणि फ्लॉक फुलला. सगळी बाग रंगीबेरंगी झाली. सगळीं झाडें हिरवीकंच झालीं. सुवासाचा दर्या उसळला. पिवळी कर्दळ, तांबडी कर्दळ, गुलाबी कर्दळ, सगळी दुनिया रंगाची झाली. थंड वारे सुटले आणि लोक गरम कपडे अंगात घालून बागेकडे येऊं लागले.

अशा सुरेख दिवसांत, ध्यानीं मनीं नसतांना एकदम पंच्याण्णव पौंडाची मुलगी थेट महादेवाच्या यंत्राकडे आली. महादेव चकित झाला. डोळे विस्फारून आणि ओठ उघडून तो बघत राहिला—अरे, हीच का ती ? काय हा बदल ? पंच्याण्णव पौंडाची मुलगी छान फुगली होती. तिच्या गुलाबी चेहऱ्यावर अधिक तकाकी आली होती. जरीकाठाचें फिक्कट गुलाबी पातळ तिनें नेसलें होतें आणि तिच्या गोंडस हातांत मोत्याच्या चमकदार बांगड्या होत्या, गळ्यांत मंगळसूत्र होतें, मोत्यांची माळ होती. ही सडसडीत उंच मुलगी किंचित् ठेंगणी दिसूं लागली होती. तिचें तें सारखें लवलवणें, सारखें हंसणें कमी झालें होतें. महादेव चकित झाला. आतां पांच काय, पंधरा पौंड घ्या बाई !

बाई पुढें आल्या आणि त्यांच्याबरोबर एक उंच, गोरा गोमटा, निळें स्वेटर आणि पांढरी स्वच्छ पॅंट घातलेला हंसतमुख तरुणहि आला. त्यानें विचारलें,

"वजन करायचं आहे का ग ?"

"बघूं तरी किती वाढलंय ?"

महादेवाला सुरेख वास जाणवला. बाई पायऱ्यावर चढल्या. लगबगीनें तो गोरा तरुण पुढें आला. जणु कांहीं बाई कुठेंतरी उंच चढत होत्या, अवघड चढण चढत होत्या. तोल गेला तर त्यांना हात द्यायला पाहिजे होता.

काटा खरकन् फिरला.

"अय्या, आणेली टाका नं ?"

"अरे, हो हो."

अर्ध्या बाह्यांतून दिसणारा पुष्ट हात हाल्ला. खिशांतून शेंगा काढाव्या तशी मोड, नोटा त्यानें काढल्या—आणेली शोधून यंत्रांत टाकली.

"बाई बाई, कमाल आहे हं."

"किती आहे बघूं ?"

"एकशेंदहा !"

"म्हणजे कांहीं जास्त नाहीं."

"अहो, पण लग्नापूर्वी पंच्याण्णव होतं."

तो तरुण झकास हंसला.

"बाप रे. म्हणजे माझं पंधरा पौंडानीं कमी आहे का ? वजनवाले, घ्या बुवा आणखी एक आणा तुम्हांला."

तो तरुण पायऱ्यावर चढला. खडाक् आवाज होऊन तिकिट पडलें.

"वन् फिफ्टी ! बघ. म्हटलं नाहीं ?"

"हो हो, थापा नकोत. लग्नापूर्वी होतात तेवढेच आहांत तुम्ही."

अनुक्रमणिका

तिनें त्याला एक चापट मारली आणि मग ती एकदम ओशाळली. इकडे तिकडे पाहून म्हणाली,

"चला कीं—"

एकमेकांच्या अंगाला अंग घासत तीं दोघंजणं बागेंत गेलीं. महादेव स्टुलावर बसला. हाताचे तळवे त्यानें जोरानें चोळले. शीळ घातली. काय करावें हें त्याला कळेना. एकदम उठून त्यानें फडकें घेतलें आणि तो यंत्र पुसूं लागला. रेसमधें पहिल्या आलेल्या घोड्याला मालक जसा मालीश करतो तसा तो तें लाल यंत्र पुसूं लागला. पंच्याण्णवचे एकदम एकशें व्हा! वहावा. 'अजि कौन बजाये बांसुरिया......मेरा तन डोले, मेरा मन डोले......

साडे आठ वाजले–बाग मोकळी झाली. लोक घरोघरीं गेले. आणि महादेवाला वाटलें, कांहीं तरी चुकलें! त्याला आनंद झाला होता; लहान कोकरासारखें त्याचें मन उड्या घेत होतें; आणि तरीहि त्याला वाटलें कीं, कांहींतरी चुकलें! कांहीं तरी बिघडलें! काय बिघडलें? काय चुकलें? हिरवळीवरून धांवतां धावतां कांहीं तरी पायाला रुतलें. काय बरें? महादेव शोधत राहिला. कुठें दुखतें आहे हें शोधत राहिला. त्यानें यंत्राचें घर बंद केलें. झिमझिम पावसानें ओल्या झालेल्या डांबरी रस्त्यानें तो घराकडे जाऊं लागला. गारठा झोंबत होता. दिव्यांचीं प्रतिबिंबें रस्त्यांवर लखलखत होतीं. पावसाचे कण उजळीत मोटारी धांवत होत्या. महादेव शोधत होता. दोन्ही हातांची घडी छातीवर घालून तो रस्त्यानें वाकत वाकत जात होता आणि त्याला कांहीं सांपडत नव्हतें. अरे, आपलें कांहींतरी दुखतें आहे, कुठें तरी खुपतें आहे. पण काय तें?

पुनः मोठा खंड पडला. बरेच दिवस ती मुलगी बागेकडे आली नाहीं. महादेवला कांहीं कळेना. कधींमधीं त्याला तिची आठवण होई. तो फाटकाकडे बघत राही. बागेंत बांकावर बसलेल्या जोड्यांकडे बघत राही. फुलांचा बहार ओसरून गेला. तात्पुरतीं अशीं फुलांचीं झाडें माळ्यांनीं उपटून टाकलीं. बागेचा रंग विटला. पानें गळूं लागलीं. आणि बऱ्याच दिवसांनीं पुन्हां तें जोडपें महादेवानें पाहिलें. तो तरुण होता तसाच होता; पण ती एकशेंदहा पौंडाची मुलगी पार सुकून गेली होती. तिचा रंग विटला होता. खूप पुढें आलेलें पोट घेऊन ती कष्टानें चालत होती. नेहमींप्रमाणें ती यंत्राकडे आली नाहीं. फाटकांतून सरळ आंत गेली. पंधरा वीस मिनिटेंच तीं दोघेंहि बांकावर बसलीं आणि लगेच उठून फाटकांतून बाहेर पडलीं. महादेवच्या यंत्राकडे तिनें पाहिलें. तिच्या डोळ्यांतली चमक आतां नाहींशी झाली होती. ती लवलव पूर्ण थांबली होती. हंसूं कुठल्या कुठें गेलें होतें. जड ओझें घेऊन जाणाऱ्या माणसासारखी ती सावकाश रस्त्यानें चालत होती. आणि तो तरुणसुद्धां हंसत नव्हता, मोठ्यानें बोलत नव्हता. हलक्या आवाजांत एखादा शब्द बोलून तो पुनः थंड नजरेनें समोर पहात होता. त्यांचीं अंगें एकमेकाला थटत नव्हतीं. कितीहि सावकाश चालला तरी तो तरुण तिच्या पुढेंच जात होता, थांबून मागें पहात होता. सावकाश ती त्याच्यापाशीं पोंचत होती आणि पुनः त्यांची चाल सुरूं होत होती. रस्त्यानें ती दोघें दिसेनाशीं होईपर्यंत महादेव तिकडे बघत होता.

• •

वर्ष दीड वर्ष गेलें. महादेव त्या मुलीला विसरून गेला. तो आतां ओठावरचे आणि हनुवटीवरचे केस कात्रीनें कापूं लागला होता. स्टुलावर बसून बसून कंटाळा आला म्हणजे आतां तो अधून मधून बिडी ओढी. सिनेमा पाहण्याचा त्याचा शोक आतां वाढला होता. बागेंत चिवड्याचा मांड घालून असलेल्या त्याच्याच वयाच्या एका पोराशीं त्याची संगत झाली होती. यंत्र सोडून तो त्याच्यापाशीं जाऊन बसे. पोरीबाळींसंबंधी विलक्षण अशा कांहीं गोष्टी त्याला त्याचा तो दोस्त सांगत असे. या शाळा कॉलेजांत जाणाऱ्या आणि चांगलेचुंगले कपडे घालणाऱ्या पोरी कशा बनेल असतात हें तो महादेवाला पुनः पुनः सांगे. चिवडा घ्यायला आलेल्या पोरीबाळींशीं तो जें धीटपणें बोलत असे तें ऐकून महादेव बावरून जाई.

मग एकदां किती तरी दिवसांनीं तो गोरा तरुण यंत्राकडे आला. आतां तो हडकला होता आणि बाईच्या ऐवजीं एक लहान गुबगुबीत मूल त्याच्याबरोबर होतें. त्या मुलाचें त्यानें वजन केलें. आणि त्याला बोटाला धरून तो बागेंत जाऊं लागला. तेव्हां धीर गोळा करून महादेवानें विचारलें,

"साहेब, बाई नाहीं आल्या?"

तो तरुण कांहीं वेळ गप्प उभा राहिला. महादेवाकडे त्यानें टक लावून पाहिलें; पुनः कुठें तरी पाहिलें. सावकाशपणें तो म्हणाला,

"तूं बाईना ओळखतोस?"

महादेव घाईनें म्हणाला,

"होय तर साहेब—पुष्कळदां त्यांनीं वजन केलंय माझ्याकडं."

साहेब फार गंभीर झाले. आजारी असलेला माणूस बोलावा तसे बोलले

"बाई गेल्या रे."

"म्हणजे?"

"वारल्या, बाळंतपणाच्या आजारांत."

मुलाला चालवीत साहेब बागेकडे गेले. महादेवाला एकदम कसेसेंच झालें. तो धांवत मागून गेला आणि साहेबांना म्हणाला,

"साहेब, ह्यांना मी घेऊं का?"

तें लहान पोर आळीपाळीनें बापाकडे आणि महादेवाकडे बघत होतें. साहेबाच्या होकाराची वाट न बघतां महादेवानें त्याला उचलून घेतलें, खांद्यावर टाकून थोपटलें, त्याच्या केसावरून, गालावरून हात फिरवला, वरचेवर त्याचें तोंड, डोळे, केस न्याहाळले आणि मुलाला साहेबांच्या हवाली करून महादेव परत आला, खालीं मान घालून स्टुलावर बसला.

• • •



नवरस
आमच्याकडेहीं
आहेत
असें वजावणारी

# बटाट्याची चाळ



: पु. ल. देशपांडे

**प्रास्ताविक** : मनुष्य हा प्रयोगशील आहे. आणि तो प्रयोगशील आहे म्हणून स्खलनशीलहि आहे. त्यांतल्या त्यांत स्खलनशीलतेची अधिकांत अधिक शक्यता नाटकांत आहे. कारण नाटक हें जगाच्या अंतापर्यंत प्रयोगावस्थेंतच राहणार आहे. आजवर झाले ते नाट्यप्रयोग आणि पुढें होत रहातील तेहि नाट्यप्रयोगच. हा समास प्रत्येकानें आपापल्या सोयीप्रमाणें सोडवायला हरकत नाहीं. नाट्याचे प्रयोग किंवा नाट्यांत प्रयोग असा अनुक्रमें षष्ठी अगर सप्तमी तत्पुरुष, दोन्ही प्रकारानें सोडवावा. कदाचित् तो बहुव्रीहि, द्वंद्व, द्विगु, कर्मधारय किंवा अलुक् समास म्हणूनहि सोडवावा. कारण प्रास्ताविकाच्या आरंभीं मनुष्य हा प्रयोगशील आहे असें म्हणून ठेवलेलेंच आहे. नाट्याप्रमाणेंच आज संगीतांतहि नवे नवे प्रयोग होत आहेत. प्रस्तुत संगीतकांत नाट्य आणि संगीत ह्या दोन्ही बाबतींतला प्रयोग करावयाचा नम्र मानस आहे.

आजवर 'संगीतिका' झाल्या त्यांत आणि ह्यांत काय फरक आहे असा प्रश्न साहजिकच कुणी विचारेल! त्याचें विचारणेंहि योग्य आहे. स्थूल मानानें फरक इतकाच कीं आजवरच्या संगीतिका ह्या 'भव्य भूतकालां'-तील महाभागांच्या जीवनपटांतील रेशमी आणि जरतारी धाग्यांची गुंफण बांधून गेल्या. हें संगीतक आजच्या जीवनाविषयीं आहे. कथासूत्र रेशमी तंतूचें नसून साध्या पुडीच्या सुताचें आहे. तितकेंच मळकट आणि तितकेंच पुचाट!

परंतु पुडीच्या सुतासारखें का असेना शेवटीं कुण्या मानव-कुडींतल्या प्राण्यांचेंच तें जीवनसूत्र आहे ना? मग तें केवळ आजचें आहे म्हणून कां उपेक्षावें?

दमयंतीनें प्रथम नळाला पाहिलें त्यावेळची तिची नाजुक धडधड आणि आण्णा पावश्यांच्या प्रभीनें बाबा बर्व्यांच्या भाच्याला प्रथम नळावर पाहिलें ती धडधड निराळी हा धडधडीत अन्याय कां? राजकन्येचें हृदय आणि पावश्यांच्या प्रमीचें हृदय ह्यांत असा फरक कां मानावा? नळ राजा असेल आणि बाबा बर्व्यांचा भाचा ए. जी. च्या ऑफिसांत असेल पण कलि शिरायचाच झाला तर बाबा बर्व्यांच्या भाचाच्या फाटक्या मोजांतून शिरणार नाहीं असें थोडेंच आहे? धर्मराज खेळला कीं तें "द्यूत" आणि समेळकाका लावतात तो "आंकडा" हा पंक्तिप्रपंच का? गुप्त्यांची कुमुद उभी राहिली की ग्यालरी आणि उर्वशीचा तेवढा "सौध!" शकुंतला दुष्यंताला पाहून तेवढी "मोहित" झाली आणि नाडकर्ण्यांची बिजू मात्र जगू गायतोंड्याच्या "मागें" लागली काय?—हा शुद्ध अन्याय आहे. गिरिशिखरावरील प्रासादांइतकेंच चाळ-गॅलरी-ग्यारेजला जीवनांत महत्त्व आहे. केवळ जुनेपणाच्या भांडवलावर उभें रहाण्याचे व कवितांचे विषय होण्याचे दिवस गेले. नवरस प्राचीन जीवनांत प्रकटला तसाच अर्वाचीन जीवनांतहि आहे. शिवाय आजचें अर्वाचीन उद्यांचें प्राचीन आहे. न जाणों बटाट्याच्या चाळीचें विधियोगानें 'मोहेंजोदारो' झालें—(देव करो आणि तसें न होवो.)—तर दहा नंबरांतील जनोबा रेग्यांच्या घरच्या 'आडकित्याला'—द्वारकानाथ गुप्त्याच्या "वाटरमन्' पेनला



...एच्च. मंगेशरावांच्या तबल्याच्या हातोडीला—'लोको' ऑफिसांतल्या बाबुकाका खऱ्यांच्या (चाळींतले इतिहास संशोधक.) घरांतल्या सोवळ्यांत बांधलेल्या लोणच्यांच्या बरण्यांना—बाबा बर्व्यांच्या कोंकणी पायतणांना आणि अण्णा पावश्यांच्या डिस्पोजल्स मध्यें घेतलेल्या पाण्याच्या गळ्यांत अडकवण्याच्या वाटर बॉटलला काय भाव येईल! इथून पांच हजार वर्षांनंतर कुशाभाऊंची 'बादली' ही विसाव्या शतकांतील 'विशिष्ट आकृतीचें' पात्र म्हणून कौतुयाल्यांत ठेवण्यांत येईल आणि आज जी फुटकी बादली किंवा त्रिलोकेकरशेठची पगडी कुणी दोन आण्याला उचलायला तयार नाहींत--त्या गोष्टी पंचविसाव्या शतकांतले लोक दोन दोन आण्याचें तिकीट काढून पहायला येतील. जंब्या ठोसराच्या लोटीवर 'ठोसर-कालीन लोटी' हा प्रबंध लिहिला जाईल. तात्पर्य ही मंडळी वाटतात तितकीं सस्त्यांतलीं नाहींत.

महाकाव्याचा विषय व्हायला काय असावें लागतें ह्याची मराठींतील एका विद्वान प्राध्यापकानें यादी दिली आहे. त्यांत त्यानें अश्व–रथ–धनुष्यबाण–ऋतूंचीं वर्णनें–उद्यानें–द्यूत अशी एक तपशीलवार यादी दिली आहे. ह्या जीवनांतहि अश्व आहेत–व्हिक्टोरियाला जोडले आहेत हा मामुली फरक आम्ही मानतों. तिथें द्यूत होतें, इथें जंब्याच्या खोलींत

"गांजा"चा डाव चालतो–आतां तो ब्रह्मचारीच आहे तेव्हां युधिष्ठिराचा आखिरी 'पण' लावूं शकत नाहीं हें मान्य! चाळींत धनुष्य देखील आहे. आवडाक्का त्याच्यावर वातीचा कापूस पिंजतात. तळमजल्यावरच्या धूतवस्त्रेश्वर लांड्रीचे मालक बाबूराव साखरपेंकर पातळांचेंच काय परंतु गंजीफ्राकांचें देखील वस्त्रहरण करून दुःशासनावर ताण करतात. शिकारीचीं वर्णनें करूं म्हटल्यास वाघ सिंहाच्या शिकारीच्याच उत्साहानें इथें मूषक-मत्कुण-मच्छरांची शिकारहि होते हें नमूद करणें इष्ट आहे. वरच्या मजल्यावरून सांडपाण्याची वादली रिकामी करून पर्जन्यास्त्र सोडलें कीं संध्याकाळीं खालची मंडळी चौकांत शेगड्या फुलवायला ठेवून धूम्रास्त्र सोडतात.

वरील विवेचनावरून (ह्यांतील मौलिक आणि तौलनिक चिकित्सा गरजूंनीं ध्यानांत घ्यावी.) नवरसात्मक काव्यच काय परंतु महाकाव्य व्हावें अशी कची सामुग्री वटाट्याच्या चाळींत आहे हें साऱ्या रसिकांच्या ध्यानांत येईल. असलें महाकाव्य लिहिण्याचा आमचा मानस आहे. योग्य समय प्राप्त होतांच तेंहि कार्य सिद्धीस जाईल. तूर्त वानगी म्हणून संगीतक लिहिलें आहे.

**सूत्रधार :**

रसिका, संगीतक हें नवें
नवे सूर अन् नवीन गायक
नव्या नायिका नवें कथानक
इथें न गिरिवर
नदी न सागर
नाहीं उपवन नाहिं सरोवर
सौध न शिखरें गिरि ना गव्हर
राजसुतांचीं हीं नव गीतें
सामान्यांचीं हीं निश्वसितें
जीवन न्यारें इथें स्पंदतें
मला ठाउकें–रसिकवरा तुज गीत असें हें हवें
रसिका–संगीतक हें नवें ॥

*[ चाल बदलून— ]* जरा द्या कान
जरा द्या ध्यान
जरा जपून पुढती चला
शिरा इथून् पुढच्या आळिला—

*[ ह्यानन्तर सकाळीं रोलेक्स्-घटीला जें वाद्यसंगीत वाजतें त्यांतला एखादा राग वाजवला जातो. व त्या सुरानें सावध होऊन कुणी तरी गाफील सनातनी म्हणतो. ]*

घनःश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला—

**सूत्रधाराचा आवाज**—(ती भूपाळी थोपवीत)—थांब गायका थांब!
ही इथें पहांट न फुटे गात भूपाळी—
रखडत येते घेउनि संगे दुधवाला गवळी—

**भय्यांचें समूह गीत :** ( हें गीत गातांना डोळ्यांतल्या न उडालेल्या झोपेचा भाव गळ्यांत दिसावा. )

भय्या धीरे धीरे चाले
कावड डुगुडुगु हाले
दार ठोठावीत बोले
बाई दूध–बाई दोध–बाई दोऽऽऽ ध !
ह्या इथें उगवता सूर्य दिसे ना कोणा—
ही ट्राम चालली पहिली बडवीत धाट घणघणा
कोंबडा इथें ना कधीं देतसे बांग
हा पेपरवाला पोऱ्या आणी जाग

*( पेपरवाल्या पोऱ्याच्या ललकाऱ्या—*
...मग जाग जगावर येते
घरिघरीं घरघरे स्टोव्ह
कुणि आधण त्यावर ठेवी
कुणि जाइ आणण्या पाव
कुणि रात्रींच्या स्वप्नांची
करि व्यर्थ मनांत उजळणी
कुणि चिंतेच्या चित्रांचीं
फेकितसे पानें पिसुनी

*[ आवाज बदलून ]* रसिका, इथेंच थोडा थांब
इथून नाहीं चालायाचें
अंतर आतां लांब—
—त्या तिथें चाळ वटाट्याची
वस्ती वीस बिऱ्हाडांची
वीस घरांचें इवलालें जग
( वीस परंतू वीस खास नग )
डॉक्टर कोणी येथें हौशी
कुणी अजागळ कोणि मिजासी
आस्तिक कोणी नास्तिक कोणी
कुणी प्यार पंछी—
उजवे कांहीं डावे कांहीं
कुणी बापुडा तटस्थ राही
धर्मवीर धगधगीत कोणी
कोणी पद्य स्त्री
( खास जात त्याची )—वस्ती वीस बिऱ्हाडाची...



*(चाळींतल्या एका खोलींतून गुणगुणणें ऐकूं येतें)*
झुळूझुळूझुळू झुरतो झरा ग बाई

**सूत्रधार :** ऐकलेंस का रसिका याचें मंजुळ गुणगुणणें
कविराज बसे टोकित अक्षर घडविण्यास गाणें—
नांव तयाचें रंगो विठ्ठल
कविता करण्यामाजीं अट्टल
नळाजवळच्या राहुनि खोलिंत पाही झुळुझुळु झरा
कवींची असली न्यारी तऱ्हा.

*( गुणगुणणें अधिक मोठें होतें. )*
झुळुझुळुझुळुझुळुझुळु झुरतो झरा ग बाई
सससससरा ग बाई
तुतुतुतू—तुरा ग बाई
जजजज जरा ग बाई
बबबब बरा ग बाई
खखखख खरा ग बाई

**सूत्रधार :**
(अत्यंत दुष्टपणानें) खरा खरा खाजवुनी कितिदां माथा—
कशीवशी जोडितसे अक्षर कंथा—

**कवि :** (अत्यंत मोठ्या समाधानाच्या स्वरांत)
सुटलों जमलें यमक अखेर !
धाडुनि देतों नवीन कविता
नवीन अंकासाठीं
"चला–उठा हं, ऐकलेस का
घोरत पडशिल किती? आला दिन माथ्याबरती—

**सूत्र०** : कविपत्नीच्या डोळ्यापुढलें स्वप्न गुलावी पुसे
दिवसभराच्या उसाभरीचें चित्र लावितें पिसें—

**कवि** : ऐकशील का गे माझें झुळझुळीत गीत—

**ती** : द्या तें घालतें चुलींत—

**कवि** : हाय दैवा–काय गति ही अरसिका किति ही पहा

**ती** : पेटवीतें वाड होइल वादलीभरुनी चहा—

**कवि** : (सात्विक व साहित्यिक संतापानें)
खबर्दार जर भलतें सलतें बोलशील तर पहा
साहित्याच्या फत्तेपुरचा मी तर बादशहा—

**ती** : ओसाडीच्या मुलखाचें हो तुम्हा राज्य आंदण

**कवि** : असेंच का गे चालायाचें अपुलें हें भांडण ?
तुला न ठाउक रसिकवरांच्या मी कंठांतिल लाल

**ती** : काय तया मेल्यांना ठाउक कविपत्नीचे हाल !
झुळुझुळु झुळुझुळु झरा वाहतो–शब्दांचा खेळ
तासतासभर नसे नळाचा पाण्याशीं मेळ !

**कवि** : थांब थोडी ऐक सखये काव्यपंक्ती मम नवी
भावना मी त्यांत भरली ठेंचुनी तुज जी हवी–

**ती** : ठेंचतां कां भावनांना ठेंचुनी टाका मला !

**कवि** : छे–प्रिये–हें काय हें?–छेः कठिण झाला मामला.

**ती** : भावना अन कल्पना मज कांहिंही आतां नको
पाप सातां जन्मिचें म्हणूनीच तुमची बायको.

**सूत्रधार** : *(अगदीं वेळेवर)* रसिका, घेइ काढता पाय !
पतिपत्नीच्या रणसंग्रामीं
तुझें नि माझें काय ?
महिषासुरमर्दिनी युगांतील नव्या चालली कुणी
घेउनि घागर नळाकडे बघे आणाया पाणी—

(*अंतराळांतून सूर येतात*) : नदीच्या ग आजूबाजू
कुणी वाजवीतो शीळ
उभा माझा पैलतीरी
सखा घननीळ—बाई सखा घननीळ...

**सूत्रधार** : *(संतापून)* पुराण कविनो जरा आटपा
थिटलेली वाणी—
पार पळालें इथें नळाच्या तोंडांतिल पाणी—

(*अभिनय गीत*) : दणदणत चरण ये
खणखणत वदन ये
तोंड फेकीत ये ये नळाला.
वाम करिं बादली

कळशि कशि आदळी
हादरित चाळिचा पूर्ण मजला !
"दूर व्हा मावशी
कळशि भरुं द्या कशी"
देत जाई ढुशी—भीति सकळां—"
जलभरण स्थान तें



समरभू भासते
कडकडुनि वीज जणु मेघ फुटला—
कळशि कन्येस दे
कविकरीं बादली
घागरी कटिवरी—ये घराला—

*( रणवाद्यांचा गजर – भेरी कर्णे इत्यादि वाजतात. )*

**नळावरची एक बाई :** चला आटपा गंगूबाई
आम्हालाही आहे घाई

**दुसरी :** नका दाखवूं नस्ता तोरा
'सुप्रिटेण' जर असेल नवरा
ब्लाक चांगला शोधा दुसरा

**तिसरी :** टळा एकदां चाळीमधुनी—

**चौथी :** तुला चांगली हिंदु-कालनी
पेशल् खोल्या पेशल न्हाणी
थाटा अन्य बिन्हाड—

**पहिली बाई :** जिभेला नाहिंच का हो हाड ?

**सूत्रधार**—रसिका, तुझें न येथें काम !
अणुयुद्धाहुनि घोर असा नित्याचा नळसंग्राम
गृहिणी सचिव सखी एकांती
ललित कलांतिल प्रिय शिष्या ती
कविकुलगुरुच्या विसरा पंक्ती
काल्प्रवाहीं वाहुनि गेला त्या युवतींचा ग्राम ॥
तुझें न येथें काम—

**(वातावरणांतून पुन्हा आवाज ) :** कराग्रे वसते लक्ष्मी
करमध्ये सरस्वती
करमूले तु गोविंद
प्रभाते करदर्शनम्
मना सज्जना भक्तिपंथेचि जावें
तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें—

**सूत्रधार**—*(त्या आवाजावर आवाज काढून )*
कोण तूं ? कवण्या देशीं
गाशी श्लोक असा कसा
असमर्थ इथें सारे – समर्थ कोणिही नसे.
उदास जीवनीं ह्यांच्या दासबोध नको तुझा
रामदास इथें नाहीं, ट्रामदास समस्त हे—

**दुरून अण्णांचा आवाज :** सामर्थ्य आहे वडवडीचें
जो जो भकेल तयाचें
परंतु तेथें दिडक्यांचें । अधिष्ठान पाहिजे ॥

**कोपऱ्यांतून काका जोगदंड :** वशिल्यानें होत आहे रे
आधीं वशिलाच पाहिजे.

**तारेवर पंचा वाळत टाकत द्वारकानाथ गुप्ते :**
मना सज्जना ट्रामपंथेचि जावें
तरी वांचतो एक आणा स्वभावें
'वशीला' फुकाचे कशा दोन आणे
उशीरां सदाचें हपीसांत जाणें

**कारकुनांचा कोरस :** गणाधीश जो ईश ह्या कार्कुनांचा
तया मागुती नाच बापा सदाचा
नमूं चारदां मूळ चप्रासि साचा
हजेरी हळू आणितो बीनवाचा

**सूत्रधार :** रसिका, इतुका बोध पुरे.
जळतां जळतां येथें जीवन
निघे काजळी हें ज्ञानांजन
काव्यशास्त्र साहित्य यापुढें शब्दांचे भंवरे ॥
पळापळानें दिवस वाढतां
सारें थंडावतें—
मागुनी रामराज्य येतें—

**रामा :** बाई जरा घाई करा—
टाका झणीं धुणीं भांडीं—
जायचं मला शिनीमाला
संग घेऊन मागारनीला
पयल्या 'छूट'च्या 'शो'ला म्हंतो जाउन् बशिन टेचामंदी !

**बाई :** रामा—आंत नको येऊं—
अजुनी नाहीं उकळी आली
वरणाची ना डाळहि शिजली
कुठून भांडीं धुणीं तुला मी इतुक्यांतच देऊं ?—
तुझी सदाची कां रे घाई
शेजाऱ्याघरिं जाउन येई
अजून पुरते झाले का रे रामा साडेनऊ ?—

**रामा :** ब्राई जरा घाई करा टाका झणीं धुणीं भांडीं—

**पंत :** रामा जा चल नीघ पुढें !
तुझ्यावांचुनी काय गमे तुज अमुचें खेटर अडे ?
पगार घेतां फुकटच का रे ?
स्वावलंबनें बघशिल कैशी 'तिरपिट त्रेधा' उडे !

*( मंद्र सूर )* ऐका माझें जरा बोलणें
उद्यांपासुनी स्वावलंबनें
तुम्हीच उरका भांडिं घासणें

अनुक्रमणिका

तुम्हीच काढा केर नीट अन् तुम्ही धुवा कपडे ।। –
रामा जा चल नीघ पुढें !

**रामा** : आत्  माजा मयुन्याचा टाका पगार ।
बोलयाचा काय् नाय–आन् सांगयाचा काय नाय
पाहिन भिजा रोजगार ।।



**बाई** : रामा–तूंच राखी मम लाज...
चहा ठेविते तुझिया साठीं
ही आणेली असु दे गाठीं
तूं नसशिल तर कुठुन सिनेमा
कुठला भगिनि–समाज ?—रामा ऽ ऽ ऽ ऽ ऽ
ह्यांचि सदाचि असलीच तऱ्हा
बोल नको तूं मानूस खरा
नकळे बाई कसला चढला ह्यांनाच असा माज ?—
रामा ऽ ऽ ऽ ऽ ऽ
त्वां धुतलेलीं घालुनि कुडतीं
ह्यांस कचेरिंत मिळते बढती
बोल वरी त्या फुका लावितां
चढवुनिया आवाज...रामा–रामा—
तूंच रखि मम लाज !

**पंत** : रामा चुकलों–मज करि क्षमा–
वस्त्रविश्रामा ऽ ऽ
पात्रप्रोक्षण कामा ऽ ऽ
पर्णभरितमुख–कर्णविडीयुत
कुरलकेश शिरतैलविभूषित
अपरान्तक निजधामा—
*(पट्टी बदलून)*
तूं नसशिल तर कसें व्हायचें सुसह्य हें जीवन
कुठलें पात्राविना व्हायचें नित्याचें भोजन ?
तूं नसशिल तर कुठुन यायचा गोविंदा दारीं
कसें फुटावें दहिंलाहीचें मडकें अंगावरीं ?
तूं नसशिल तर कशी दिसावी गोमू दारांत ?
कुठुन व्हायचा चौपाटीच्या नाच बंदरांत ?
तूं नसशिल तर जिन्याखालची जागा होइल सुना—
कुणी करावी तेथें नंतर सांगा तेलफणी—
तूं नसशिल तर कुणि फेकाव्या रसमय पिचकाऱ्या ?

दुग्ध केंद्रिं मग कुणि लावाव्या सांग गड्या बाऱ्या ?
तूं नसशिल तर कुणि आणावें गिरणींतुनि पीठ ?
तूं नसशिल तर कुणि घालावें काळें जाकीट ?
तूं नसशिल तर हवीं कुणाला गोंड्यांचीं वटणें ?
तूं नसशिल तर उरेल केवळ उभय नयन मिटणें—
तूं नसशिल तर—



**सूत्रधार** : रसिका, परिसा रामकथा
चाळिची व्याकुळ विरहव्यथा—
मुलें शाळें जाती पतिहि रिघती कार्यकरणीं
कुण्या गेहीं आतां जमतिलचि वेकार गृहिणी
पुढें डाळी पाटीं निवडित खडे वैसति कशा—
मुखें हातांसंगें हलवित रिकाम्या चवकश्या—
कुणाचीशी कोणी सुरस कथिते चोरुनि कथा
कुणी सांगे वेडी स्वमनिं सलणारी भवव्यथा
कुणी घेई वेणी समय वघुनी माळिण खडी
कुणी पंख्याखालीं पडुनि नुसता वेळ दवडी—
रसिका—चतुर गड्या तूं खरा
वांया गेली माझी शिखरिणि
लक्ष राहिलें तुझें गुंतुनी
भुलूं नको रे अरग, पाहुनी पल्किडला नखरा ।।

ती तिथें उभी राहिली खऱ्यांची शांता
तिज पसंत प्रियकर जिन्याजवळच्या जोशांचा अंता—

**शांता** : भर दुपारचें—उघड्या नयनीं ऽऽऽ
स्वप्न देखिलें—मी चित्र रेखिलें—
टपोर डोळे...(जरी त्यावरी चष्म्यांची कुवडी !)
विशाल वाटे भाल—ओठ जणु संत्र्यांच्या फोडी—
(फोडी संगें साल होउनी गाल जरी आले)
स्वप्न देखिलें—चित्र रेखिलें—
चाल कशी झोंकदार ? (पोंक न लपलें)
कुरळ केश माथ्यावर (मधुनि मधुनि पिकले)
कंट वाहुवर विसावण्या शिणला माथा—
विरुनी अनंतीं जाइन मी रे वघतां वघतां—

**शांतेची आई** : शांते ऽ ऽ ऽ

**सूत्रधार** : हांक ऐकुनी मातेची
कशी दचकली राणी
गेलें दिवास्वप्न भंगुनी.

**शांतेची आई** : शांते करिसी काय इथें ?

**शांता** : छेः कुठें मी काय, कधीं ग, कुठें काय केलें ?

**शांतेची आई** : त्या पदराखालीं, काय दडवुनी सांग ठेवियेलें ?

**शांता** : मी ? पदराखालीं—कुठें—नाहीं ग—आइ नाहिं कांहीं

**शांतेची आई** : कारटे, पाहिलें—दे तें—फोटो—ऑं ? अगवाई
हा मेला तर जिन्याजवळच्या जोशांचा अंता
थांव येऊं दे हापिसांतुनी काढतील कांटा ।।

**अंतराळांतला आवाज** : तो रविकर का गोजिरवाणा
आवडला अमुच्या राणीना—

**सूत्रधार** : कुठला रविकर कुठली आली येथें फुलराणी ?
विजनांतील त्या मुग्ध मनांचीं इथें नको गाणीं !
काल पाहिल्या चित्रपटांतिल शिळ्या कढीला ही
आज दुपारीं आणित खोटा ऊत उभी राही—
तिचा लाडका जिन्याजवळचा अंतोवा जोशी
पत्रें टंकित वसे कचेरिंत थकुनी मेजाशीं—
वसला घेउन पुढें दिगारा
टकटकटकटक टंकित पत्रें
प्रिय सर प्रिय सर शिणलीं गात्रें
खरोखरी प्रिय सरला पित्रे
सरला पित्रे ती पलिकडली
याहुनि शांता गोड गोडुली
शांता शांता इनोसंट मन
सरला पित्रे पर्मेनंट पण !
हुडकुन काढिन म्हणतों पत्ता
पगार अन् महागाई भत्ता
टकटकटकटक टकटकटकटक
छान रेडियो जमेल जागा
हवेशीर अन् दोघांपुरती
सरला पित्रे तशी वरी ती
शांतेहुन पण वरीच काळी
दांत मूळचे किंवा कवळी
करीन खात्री येतां जवळी
प्रिय सर प्रिय सर सरला पित्रे
अंतू टंकित वसला पत्रें
भावि सुखाचीं पहात चित्रें



**हेड क्लार्क** : जोशी ! ! चलो आटपा काम—
समोरचें तें वाचुन तरि घ्या
"हराम है आराम"
जोशी—चला आटपा काम—

**सूत्रधार** : आषाढघनापरी कडकडे वरिष्ठवाणी वरी
स्वप्न भंगलें—शांता—सरला विरल्या निमिषांतरी—
रसिका, फिरुनि चला चाळींत !
सांजवेळ जाहली परतले पती धामें गाळीत.

अनुक्रमणिका

अर्ध्या पेंगुळलेल्या नयनीं—चार गिळुनिया घास
आळेवणी निद्रेची आतां शिणलेल्या देहास—
छे ! पण अजुनी निद्रा कुठली अजुन चालते ट्राम
इथें न मिळणें मागुनियाही हुकुमाचा विश्राम—
आणि पलिकडे कुणी गातसे दर्दभरें गाणें—
पिया कुणाचा परदेशाला गेला हरि जाणें.

**चाळींतले संगीत-कला-तडाग एच्च. मंगेशराव :**
पिया गये परदेस–

**सूत्रधार :** हे तर रसिका चाळींतिल रे अमुच्या सुरसम्राट
सूर साधना ! साधेल कशी ह्यांना ह्या जन्मांत ?
कसलें गाणें जनता घेते चाळीचा धसका
भय चोरांचें आम्हा मुळिं ना नको अम्हा गुरखा–
सर्व घराणीं कोंबुनि भरलीं यांनीं नरड्यांत–
तानमूर्च्छना केकाटे जणुं बकरी परड्यांत–

**एच्च. मंगेशराव :** ऩीप ऩीप प ऩी ऩी ऩी ऩी पर्सा पर्सा पर्सा
पिया गये परदेस–
सासबुरी मोरि ननद चुनरिया–
अजहुन आये
धीट लंगरवा–पनी सारे सा–सारे सारे सारे सारे सां—

**सूत्रधार :** चाळकऱ्यांशीं पुरें मांडिलें
संगितांत वैर–
कसें आवरूं झाले असल्या गवयाचे थेर–

**आचार्य बाबा बर्वे :** दीन दलितांचा एक नारायण
जावें त्या शरण कोणी बोले–
सूर बुडवावा मांडावें भजन
नामसंकीर्तन साधा आतां
टाळमृदुंगाचा होऊं द्या गजर
करा भीमातीर ग्यालरीचें–

**एच्च. मंगेशरावांचा आवाज :** पिया गये परदेस—
**चाळकरी मंडळी**—जयजय रामकृष्ण हरी—
**मंगेशराव :** नीप नीप निनिपम पनीसा—
**चाळकरी :** ग्यानबा तुकाराम—
**मंगेशराव :** पिया गये परदेस—
**चाळींतील आबालवृद्ध स्त्रीपुरुष :**
रामकृष्ण हरी—
ग्यानबा तुकाराम—
ग्यानबा तुकाराम—

*कांहीं वेळ नुसते टाळ मृदंग—मंगेशरावांचा ' पाडाव ' होतो. )*

**सर्वजण अत्यंत गंभीरपणानें :**
भजनें भंगला गायकाचा सूर
राहिला अभंग तरोनीया वर—

**सूत्रधार :** रसिका, सरलें रामायण
हीच रोजची कथा
हेंच ह्या चाळींतिल जीवन...

• • •

तितिक्षा म्हणजे
हर्ष, खेद, लोभ, क्रोध
अशा साऱ्या
विकारांपलिकडची
'कंडक्टर' अवस्था.
उतारूंसकट सारी बस
खायला आली
तरी बेहत्तर
पण पैशांची थैली
आणि मनःशांति
शाबूत हवी. हें खरोखर कठीण असलें पाहिजे.



# तितिक्षा

: इ रा व ति  क र्वे

"बाबूजी, बेहनजी! जरा आगे बढो— आगे बढो—" तेंच तेंच वाक्य तो परत परत उच्चारीत होता. पण आंत शिरल्या-बरोबर जरा इकडे तिकडे पाहून, जागा रिकामी आहे असें दिसताच मी दाराशेजारच्याच एका बांकावर जागा धरली व इतर बाबूजी बेहनजींना पुढें जाण्यासाठीं वाट मोकळी केली.

एकामागून एक माणसें भरत होतीं. बसा-यच्या जागा संपल्यावर लोकं उभीं राहूं लागलीं. पहिल्या पहिल्यानेंच आंत शिरलेलीं दोघंजणं सारखीं घड्याळाकडे बघत होतीं—शेवटीं न राहवून एकजण ओरडला, "काय रे, माणसं आंत घेण्याचं संपणार आहे का आज?" कंड-क्टरनें नुसतें ओरडणाऱ्याकडे पाहिलें व परत दाराकडे वळून "बाबूजी, माईजी, आगे बढो" हा मंत्रोच्चार करून कांहींजणांना हातानें जरा पुढें रेटून, खालच्या लोकांसाठीं जागा केली. रांगेतलीं माणसें—मला वाटतें पन्नास असावींत—घेतल्यावर गाडी रें रें करीत चालू लागली. दर मुक्कामाला गाडींतील एखाद दुसरें माणूस उतरलें तर चार पांच तरी आंत चढत होतीं.

दोन दिवसांच्या धो धो पावसानें हवा निव-ळण्याऐवजीं जास्तच कुंद व दमट झाली होती. दिल्लीच्या दाट वस्तींतून गाडी चालली होती. गलिच्छ घरें, पुढें सांचलेलीं पाण्याचीं डबकीं, मधून मधून वस्ती नसलेल्या भागांत सांचलेलें पाणी व बसमधें गर्दींत घामावलेलीं माणसें ह्या सगळ्यामुळें कांहीं विचित्र उग्र दर्प हवेंत भरून राहिला होता. कंडक्टर गर्दींत शिरून तिकिटें फाडीत होता, पैसे घेत होता व दर पांच मिनि-टांनीं मुक्काम आला कीं दाराशीं जाऊन आंतील उतारूंना उतरवीत होता व नव्यांना चढवीत होता. परत एकदां घड्याळवाला उद्धटपणें ओरडला, "काय जागेवर पोंचवण्याचा विचार आहे तुझा का इथेंच कुजवणार आहेस आज?" दाराजवळून आंत परतणाऱ्या कंडक्टरनें तिकिट फाडतां फाडतां म्हटलें, "बाबूजी, त्यांना पण घरीं जायचें आहे." "उद्धट, लेकाचा!" घड्याळवाला आपल्याशींच पण लोकांना ऐकूं येईल असें पुटपुटला. एक क्षणभरच तिकिटांच्या पानांची चवड हातांत धरून कंडक्टरनें वर पाहिलें—परत भोकें पाडण्याचा चिमटा हातीं घेतला व तो खालीं पाहून तिकिटें फाडूं लागला.

त्याच्या डाव्या हातांत वीतभर लांब व चार बोटें रुंद अशी निळ्यापांढऱ्या रेघांची सुती कापडाची पिशवी होती. तिचे बंद आंगठा व शेजारचें बोट ह्यांत ताणून धरून, तोंड उघडें राहील अशी ती धरली होती. उर-लेल्या तीन बोटांत नोटांच्या घड्या उभ्या घट्ट दाबून धरल्या होत्या. कोणी नोट दिली कीं तो त्याची उभी घडी करून त्या बोटांत धरी व उजवा हात पिशवींत घालून नाणीं काढून मोड देई. ह्याच्या तीन बोटांत नोटा तरी किती मावणार हा प्रश्न माझ्या मनांत आला तोंच त्याचें उत्तर मिळालें. मधें क्षणभर फुरसत मिळाली तेवढ्यांत त्यानें बोटांतल्या नोटा काढून एकदां मोजल्या व शर्टच्या वरच्या खिशांत ठेवल्या व परत आपलें काम सुरू केलें. बस शेवटच्या मुक्कामाला जाईपर्यंत नाण्यांच्या भारानें पिशवी फाटत कशी नाहीं किंवा त्यांत दुसऱ्या कोणी पटकन हात कां घालीत नाहीं ह्या दोन प्रश्नांचें उत्तर मात्र मला मिळालें नाहीं.

बस सब्जी मंडीशीं आली. सरकारी कचे-ऱ्यांजवळ लोक रांग करून उभे होते व एकएक जण आंत चढला होता; इथें रांग वगैरे करण्याची बात नव्हती. गाडी थांबल्याबरोबर वीस पंचवीस जण धांवत दाराशीं आले. चौघं-पांचजण आंत शिरल्यावर जागा भरली व कंडक्टरनें दाराला आडवा हात लावून आतां जागा नाहीं म्हणून सांगितलें. कांहींनीं आर्जवं केलीं कांहींनीं शिव्या दिल्या—एक वयस्क लठ्ठ बाई एक पोर कडोसरीला मारून सर्वांना बाजूला सारीत दाराशीं आली व कंडक्टरला बाजूला सारून आंत शिरूं लागली. बाहेरून एकच गिल्ला झाला. "ही कोण मागून येऊन आंत शिरणार? तिला कसा आंत येऊं देतोस? आम्ही काय म्हणून बाहेर रहाणार?" लोकांची दाराशीं झिम्मड झाली. तेवढ्यांत ही बाई पायरी चढून आली—तिनें एक पाय बसच्या आंत घालण्यास उचलला. "बाई आंत जागा नाहीं" बाईचें तोंड अखंड चालू होतें. तिच्या अंगावरचें पांढरें फडकें बाहेर कोणाच्या तरी पायाखालीं अडकलें होतें तें धरून मागें वळून तिनें चार सणसणीत शिव्या मोजल्या, तशीं फडकें मोकळें झालें पण पदर घसरून तिच्याच पायाखालीं आला. कंडक्टरच्या हाताला घट्ट लोंबकळून ती चढत होती. अर्धी साडी ढुंगणा-खालीं घसरली होती, आंतला परकर दिसत होता—पदर कधींच पडला होता. शेवटीं तिनें एक हिसडा दिला "ही गाडी चुकली तर सत्संग चुकेल, हरिकीर्तन चुकेल. तुला गाढ-



अनुक्रमणिका

वाला काय त्याची पर्वा !" असें तोंडानें चाललेंच होतें. ती आंत आली. साडी सबंध सोडवून् एका हातांत घेतली–पोराला सांवरलें व शिव्या देत देत दोन्हीकडच्या बांकांतून पुढें गेली. कंडक्टरनें घंटी दिली–दाराला हाताचा अडसर केला व आंत घुसणाऱ्या लोकांना मोठ्या मिनतवारीनें निवारलें. गाडी चालू झाली.

दारापाशीं खूप दाटी झाली होती. "बाबूजी, माईजी आगे बढो" त्यानें परत घोषणा केली व तिकिटं द्यावयाचें काम सुरू केलें. "कुठं जायचें ?" "कुठून बसलांत आपण? अडीच आणे," ... "नाहीं नाहीं, कदापि नाहीं. दोनच आण्यांचं तिकिट आहे. तूं लुच्चा आहेस."

शेजारचीं दोन तीन माणसं म्हणालीं, "असेच असतात हे कंडक्टर. दर बघत नाहींत, कांहीं नाहीं. तोंडाला येईल तें सांगतात. इथून तिथून लुबाडण्याचा धंदा !"

"नाहीं, अडीच आण्याचाच दर आहे बाबूजी." "हें बघा..." पलिकडचे दोघे तिवे ओरडले—"पुढच्या स्टॉपवर आम्हाला उतरायचंय. अजून तिकिटं दिलीं नाहींस—अशी हुज्जत घालीत बसणार आहेस का आमचीं तिकिटं फाडणार आहेस ?"

कंडक्टरनें पहिल्या माणसाचें तिकिट फाडलें व ह्या दोघां तरुणांचे पैसे घेऊन त्यानें यांचींही तिकिटं फाडलीं. तों मुक्काम आला. बस थांबली. लोकं उतरूं लागलीं. कंडक्टर घाईघाईनें दरवाजाशीं गेला. कांहींजणं उतरतां उतरतां पैसे देऊन तिकिटं घेऊन जात होतीं. दोघे विद्यार्थी उतरूं लागले. "बाबूजी, तुमचीं तिकिटं ?" "कां नाहीं आंत असतांना फाडलींस? आतां देतों आहे होय पैसे ? विसरा बच्चंजी." दोघेही कशी फजिती केली म्हणून फिदी फिदी हंसत उडी मारून पसार झाले.

क्षणभर कंडक्टरनें मान वर केली; उजवा हात लांबवला. मला वाटलें तो त्या विद्यार्थ्यांच्या पाठोपाठ उडी मारून त्यांना मागें ओढणार. पण छे ! सहनशीलतेची—तितिक्षेची—परिसीमा गांठण्यास शिकवणाऱ्या कंडक्टरचा जन्म घेतलेल्या त्या भावी बुद्धानें तसें कांहीं केलें नाहीं. नवीं माणसें आंत येत होतीं. तो जरा बाजूला झाला व म्हणाला, "भाईजी, माईजी, जरा आगे बढो..."

● ● ●

झिप्रे,
तीर लाव
आणि माझा कालीज
फोडून टाक !...

**: अनंत काणेकर**

# सांबर



*[गोंड, भिल्लमारख्याच सांबरी या एका वन्य जमातीच्या जीवनांतील हा एक प्रसंग आहे. अर्थात् ही जमात काल्पनिक आहे. सांबरी पुरुषानें एक तरी सांबर मारलाच पाहिजे. सांबर मारला नाहीं तोंपर्यंत समाजांत त्याला मान नाहीं.*

*दाट जंगलांतलें सांबाऱ्यांचं एक खेडें, मुग्लीमायची झोंपडी.*

*सूर्यास्त झाला आहे. रात्र पौर्णिमेची आहे. कुंपणाकडे उभी राहून म्हातारी मुग्लीमाय अस्वस्थपणें, कुणाची तरी वाट पहाते आहे. अठराएकोणीस वर्षांची झिप्री कुंपणाच्या पलीकडून धांवत आंत येते.]*

**झिप्री** : मुग्लीमाय ! कुंजा कुटं हाय् ? ( मुग्लीमाय दचकते. घाईनें डोळे पुसते तिचे डोळे पुसतांना पाहून) मुग्लीमाय, हें काय ? तुजा डोल्यांत पानी कां ? कुंजा कुटं हाय ?

**मुग्लीमाय** : अग, त्येचीच वाट बगतेय्. सोन्यादेव सुर्या वर आल्यापास्नं जंगलांत गेलाय्. सोन्यादेव खालीं गेला, आतां रुप्यादेव चंद्रम् वर येल् तरी पन कुंजा आला नाय् आजून्.

**झिप्री** : आज कशाला गेला जंगलांत ?

**मुग्लीमाय** : मीं पाटवला. मी बोल बोल बोलली त्येला. ईस् वर्सांचा जाला, आजून् सांबर मारला नाय्. नाईक घराच्या तोंडाला काला लावतो ! त्येच्या आजानीं एक इसा सांबर मारला,—त्येच्या बापसानीं दोन इसा सांबर मारला. कुंजा एक पन् मारतो नाय्. मी बोल बोल बोलली त्येला. गेला वरसभर बोल्बोल बोलली. तीरकमठा घेऊन आज बोलला, 'आज सांबर मारल् नाय्, तर तुला तोंड दाखवील नाय् माय !'

**झिप्री** : मुग्लीमाय, मुग्लीमाय, 'तुजा तोंड बगेल् नाय, तुजा तोंड बगेल् नाय्,' असां रोज रोज तूं त्येला बोलते. मला समदा सांगितला त्येनी. त्येच्या डोल्यांत पानी आलां. त्येचा कालीज खाते तूं, माज कुंजाचा कालीज खाते तूं, मुग्लीमाय !

**मुग्लीमाय** : तुजा कुंजा ! माजा कोन् नाय कुंजा ? लगन् ठरवला तो कुंजा तुझा जाला ! त्येची आय् मेली, त्येचा बापुस मेला तंवा एवडा एवडा बचडा होता. माजा पोराचा पोर-माजा रगत् देऊन त्येला मोटा केला मी.

**झिप्री** : तुजा रगत् देऊन ?

**मुग्लीमाय** : हां हां, माजा रगत् देऊन. एकदां डोले पांढरे करूनशी पडला—एवडासा बचा होता—तो डोले उगडीना. भगतदादा बोलला, 'तुला एक झाडाची मुली देतो. मानूसच्या रगतमधी मुली घासून दिली तर पोर डोले उगडील.' कनल्याच्या तिरानीं माजा हातचा पंजा भोसकून मी रगत् काडला—

**झिप्री** : मंग आतां बोलं बोलून दुख कशाना देते कुंजाला ?

**मुग्लीमाय** : सांबर मारला नाय् तर जमात कसा मानेल ? सांबारीचा नाईक कसा होईल कुंजा ?

**झिप्री** : कुनी येडा पन् सांबर मारतो, मुग्लीमाय ! सांबर [illegible] काय हाय् ?—माजा कुंजा सांबर करतो !

**मुग्लीमाय** : सांबर करतो ?—सांबर करतो म्हंजी काय ?

**झिप्री** : डोंगराच्या पायटीशीं मोटा झाड मरून पडला होता. सांबराच्या शिंगासारके त्येच्या खांद्याफांद्या होत्या. कुंजा त्येच्याकडे घंटा घंटा टकत बसला. बगून बगून एक दिवस कोयती घेतला, आन् काढून



अनुक्रमणिका

छाटून ते झाडाचा सांबर केला! माज्या झोपडींत तो सांबर हाय्. मुग्लीमाय, कुंजा सांबर करतो. कुंजा सांबर मारतो नाय्–पन् सांबर करतो!

**मुग्लीमाय** : देव जिता सांबर करतो तसा माज्या कुंजानीं झाडाचा सांबर केला?

**झिप्री** : हां हां, कुंजानीं सांबर केला. असा कुनी नायकानीं केला होता सांबर? कुंजा मला म्हनतो, 'मी कसा मारेल सांबर, झिप्रे? तुजा मोटा मोटा डोला मला सांबरचे डोल्यांत दिसते! तुज्या डोल्यासारका त्येचा डोला बगून कमट्यांचा तीर मी काढून घेतो, झिप्रे!' आसा बोलतो कुंजा.

**मुग्लीमाय** : तूं त्येला बायल्या केलास झिप्रे! नाच आन् गान्यांत तूं त्येला येडा केलास, झिप्रे! त्येला बायल्या केलास—

**झिप्री** : कुंजा बायल्या? असा देखणा मरद् समद्या सांबाऱ्यांत कोन नाय्, मुग्लीमाय, असा नाचनारा, असा गानारा, असा झाडाचा सांबर करनारा कुनी झाला नाय् सांबाऱ्यांत! नाचाचा नाईक, गान्याचा नाईक, सांबाऱ्यांचा नाईक कुंजाच हाय्!

**मुग्लीमाय** : झिप्रे, तूं बाय मानूस असा म्हनतेस, पन्—

**झिप्री** : पन् काय नाय्. समदे पोरा पन् त्येच म्हनतात. इचार टिप्याला, इचार भोकशाला, इचार बगलूला. पोरें म्हनतात, 'सांबर मारन्यांत काय हाय मोटा? नाय् मारला तर नाय् मारला. आमचा कुंजा गबरू सांबर करतो! नवा नाच करतो! नवा गाना करतो!'

**मुग्लीमाय** : असा समदे पोरा म्हनतात? माज्या कुंजाला नायक म्हनतात?



**झिप्रीः**—हां, हां, हां, कुंजाच आमचा समद्यांचा नायक हाय्. आज पुनवेचा नाच करायला तो झाडाचा सांबर घेऊन समदे पोरापोरी हिते येतील तुजे झोपडींत आतां, मुग्लीमाय.

**मुग्लीमायः**—समदे येतील पन् माजा कुंजा कुटं हाय्? (पौर्णिमेचा पूर्ण चंद्र वर आला आहे.) रुप्यादेव वर आला पन् कुंजाचा पता नाय् अजून्. माजा कालीज धडकतो, झिप्रे!

(बगलू येतो.)

**झिप्रीः**—काय रे बलगू?

**बगलूः**—समदे पोरापोरी येतात हिते पुनवेच्या नाचाला. मी जंगलात्ना आलो. कुंजाला बगितला जंगलांत.

**मुग्लीमायः**—कुंजाला बगितला जंगलात? बगितला तूं, बगलू?

**बगलूः**—हां, बगितला. भोकशा पन् त्येच्या मागं हाय्. सांबर दिसलाय् म्हनाला.

**मुग्लीमायः**—भोकशा हाय्? मंग बरा हाय्. एकला नाय् माजा कुंजा.

(ढोलक्याचे आवाज ऐकूं येतात टिप्या, भुली वगैरे सांबारी तरुण तरुणी गात, नाचत, ओरडत येतात. कुंजानें केलेला झाडाच्या खोडाचा सांबर त्यानीं बरोबर आणला आहे.)

**टिप्या** : कुंजा कुटं हाय? रुप्यादेव चंद्रम् केवाचा वर आलाय्. कुंजा नायकाबगर गानां कोन् म्हनेल?

**मुग्लीमाय** : (लाकडी सांबर पहात) हा सांबर माज्या कुंजानीं केला?

**भुली** : हां हां. कुंजा नायकान् केला. कुंजा नायक काय काय करतो. नवा नवा नाच करतो,–नवा नवा गाना करतो. झिप्रीला इचार!

**टिप्या** : कुंजा गेलाय् कुटं, मुग्लीमाय?

**मुग्लीमाय** : अरे, सांबर माराया गेलाय्. येल इतक्यांत. बगलूनीं बगितला जंगलांत.

**टिप्या** : तो काय मारेल सांबर,—सांबरकडे टकत बसतो—सांबरवर गाना करतो! हो कीं नाय्, झिप्रे?

**झिप्री** : हां हां. माजा कुंजा गाना करतो सांबरावर.

**मुग्लीमाय** : त्येचा गाना म्हन, झिप्रे. मला ऐकूं दे. तुमी पोरापोरी नाचारं. सांबरदेवी खुषी होयेल् आन् तुमचा कुंजा लवकर येल्. झिप्रे, गाना बोल.

(एक तरुण ढोलकें वाजवूं लागतो. मध्यें झाडाचें सांबर ठेवून भोंवती पोरें पोरी नाचूं लागतात.)

**झिप्री** : (गाते)

चंद्रम्, चंद्रम्, रुप्या देव आला
चंद्रम्, चंद्रम्, रुप्या देव आला
चंद्रम् भिंदी सांबर बसला
सांबरच्या डोल्यांत चंद्रम् हंसला
चंद्रम्, चंद्रम्, रुप्यादेव आला
चंद्रम्, चंद्रम्, रुप्यादेव आला

(नाचगाणें रंगांत आलें आहे, इतक्यांत धांपा टाकीत भोक्शा येतो. भोक्शाचें सर्व अंग रक्तानें माखलें आहे. नाचगाणें एकदम थांबतें. सर्वांच्या नजरा भोक्शावर खिळतात. भोक्शाच्या तोंडांतून क्षणभर शब्द फुटत नाहीं.)

**मुग्लीमाय :** आला कुंजा ? मारला त्येनीं सांबर, भोक्शा ?

**भोक्शा :** कुंजा नाईक—कुंजा नाईक त्येनीं नाय् मारला सांबर-सांबरनीं त्येला मारला !

**झिप्री :** (भोक्शाचे खांदे गदगदा हालवून) कोनाला सांबरने मारला ?

**भोक्शा :** कुंजा नाईकच्या सांबरनें पोट फाडला !

**मुग्लीमाय :** अरे भोक्शा, सांबर कसा मारेल माज्या कुंजाला ?

**भोक्शा :** झाडाच्या झाळींत सांबर अडला आन् उलटा फिरून उभा राह्यला. कुंजानीं कमठ्याला तीर लावला, पन् मारला नाय. सांबरच्या डोल्याला डोला लावून टकत राह्यला. कुंजाचा सांबर म्हणून मी तीर नाय् टाकला. कुंजा मारेल मारेल असा मी बगतां, तों सांबर कुंजाच्या पोटांत शिंगाची दुश्शी मारून उडाला. तीर मारून मी सांबर पाडला—

**झिप्री :** आन् कुंजा ? —कुंजा—?

**भोक्शा :** कुंजाकडे मी धावला. त्येच्या पोटांतून रगताचा ओढा चालला होता. बोलला, 'भोक्शा', भोक्शा, मला पानी दे—मुग्लीमायला बोल मी सांबर मारला नाय—' मीं झऱ्याकडे पलाला आन् पानांतून पानी आनला. पन्-पन् कुजा नाईक मरून गेला होता. त्येला पाटीवर घेऊन माजे झोपडींत आनलाय् मी. चला, चला, तुमी समदे चला.

**मुग्लीमाय :** (मटकन खालीं बसली आहे.) माजा कुंजा मेला नाय् ! माजा कुंजा मेला नाय् !

**झिप्री :** (तिच्याकडे झटकन वळून) ) कुंजा मेला नाय्–कुंजाला तूं मारला–माजा कुंजाला तूं मारला !

**मुग्लीमाय :** माझ्या रगतानी बचवला त्येला—मी कसा मारेल, मी कसा मारेल, झिप्री ?—(एकदम उठून उभी रहाते) झिप्र, माजा कुंजा मीच मारला–तुजा कुंजा मीच मारला–हा हा हा, माजा कुंजाला मीच मारला ! झिप्री, मला मारून टाक ! (भोक्शाचा तीरकमठा घेऊन झिप्रीच्या हातांत देते) झिप्र, तीर लाव आन् माजा काळीज फोडून टाक. झिप्र, तीर लाव, झिप्र, तीर लाव !

(झिप्री तिच्याकडे क्षणभर रोखून पहाते; हातांतला तीरकमठा तिच्या पायाकडे भिरकावते, आणि 'कुंजा ! कुजा' असा हांका मारीत करणा-पलीकडे धांवत सुटते. तिच्यामागून टिप्या, मुक्री वगैरे, भोक्शा वगैरे सर्व जण धांवत जातात. फक्त ते लाकडी सांबर आणि मुग्लीमाय तिथें रहातात. मुग्लीमाय त्या निर्जीव सांबराकडे डोळे फाडून पहात आहे.)

**मुग्लीमाय :** (टाहो फोडत) अरे सांबर, माजा कुंजाला तूं नाय् मारला. कुंजाला मी मारला—मी मारला—मी मारला रे मी मारला !

(सांबराकडे भकास डोळ्यांनीं पहात ती उभी आहे. चंद्रावर काळ्या ढगाचें सावट हळूहळू येतें तसें सर्व दृश्य काळवंडून जातें.)

• • •



शंख निनाद, कुशल हातांनीं रेखाटलेलें परंपराद्योतक असें कोरीवकाम, लुकलुकणारी दीपमालिका हीं सर्व अशा शुभसमयीं आनंदांत आणि समारंभपूर्ण अशा वातावरणांत मोलाची भर घालतात.

या प्रसन्नचित्त आणि प्रफुल्लित समयीं आम्हांला आपल्याशीं सहभागी होऊं द्या. नूतन वर्ष, शांति, उत्कर्ष, औद्योगिक उन्नति आणि आर्थिक सौख्य प्राप्त करून देणारें ठरो हीच सदिच्छा.



## महिन्द्र अँड महिन्द्र लिमिटेड

मुंबई • कलकत्ता • दिल्ली • मद्रास

इंडियन इंडस्ट्रीज् फेअर, नवी दिल्ली येथील आमच्या विभागाला भेट द्या.
२९ ऑक्टोबर — १५ डिसेंबर, १९५५



दोनदां करपलेली
ही अभागी वेल.
इरावती

# अविधवा

वठलेल्या झाडाला हिरवे कोंब फुटावेत तसं इरावतीच्या विरक्त मनाला आयुष्यांतले उपभोग जवळ करावेत असं वाटूं लागलं होतं. शोक करीत रहायचं, सन्त वृत्तीनं जगायचं, तरुण वयांत व वाढत्या वैभवांत अलिप्तपणें दिवस घालवायचे हें तिचं तिलाच चुकीचं वाटूं लागलं. तिच्या आयुष्यावर असलेलं सावट नाहींसं होण्यासारखं नव्हतं. तिच्या सुखाच्या नि संसाराच्या स्वप्नावर वज्राघात झाला होता. इरावती-सारख्या उत्कट नि निग्रही मुलीच्या मनावरचा तो घाव भरून येण्या-सारखा नव्हता. पण हें सगळं खरं असलं तरी जें परत मिळणं अशक्य आहे त्यासाठीं सारखं हळहळणं खुळेपणाचें आहे असं आजकाल तिला पटूं लागलं होतं. आणि तिचं अपंग झालेलं हृदय चाचपडत पंख उभा-रीत होतं.

इरावतीला जें हें जाणवूं लागलं होतें तें बालपणापासून तिचं पालन करणाऱ्या वृद्ध मावशीला केव्हांच उमगलं होतं. आईबापांच्या पश्चात् त्या अनाथ मुलीला मावशींनीं वाढवलं होतं. इरावतीच्या नांवावर भरपूर पैसा ठेवलेला होता. पण पैशापेक्षां अधिक मोलाचं प्रेम मावशींनीं तिला दिलं व लहानाची मोठी केली. इरावती डॉक्टर होऊन ह्या वर्षं दीड वर्षांच्या अवधींत दोन अडीचशें रुपये कमवूं लागली होती. आपली जबाबदारी नीटपणें पार पाडल्याचं समाधान लाभणाऱ्या मावशींना एकच रुखरुख होती कीं इरावतीनें आपलं सतत वाढणारं दुःख निपटून आनंदी वृत्तीनें रहावं. त्यांना ठाऊक होतं कीं इरावतीनें आपल्याच वर्गांतल्या एका गरीब पण उमद्या मुलाशीं विवाह ठरवला होता. त्यांच्या प्रणयाचा गाजावाजा झाला नव्हता. डॉक्टर झाल्यावर दोघं विवाहबद्ध होणार होतीं. त्यांत कुणाची आडकाठी येण्यासारखी नव्हती. परंतु मेडिकलच्या शेवटच्या वर्षांत असतांना इरावतीचा प्रियकर अपघातांत सांपडून मृत्युमुखीं पडला. वारला!—आणि तेव्हांपासून इरावती मूढ, शून्य झाली. जात्याच हुशार म्हणून ती परीक्षा पास झाली आणि हाताचा गुण म्हणून तिला प्रॅक्टिस मिळत गेली. परंतु तिचा कशांतच जीव नव्हता. एखाद्या तपस्विनी-सारखी ती जगत होती. विधवेसारखी!—मावशींना हें सारं माहीत होतं. त्या आघातांत त्यांनींच तिला संभाळली, जपली होती. पण म्हणूनच त्यांना वाटत होतं कीं इरावतीनें हें सारं दुःख गिळायला हवं. त्यांनीं स्वतः नाहीं का पतीच्या मृत्यूचं दुःख ऐन तारुण्यांत गिळलं?—इराव-तीचं तर लग्न व्हायचं होतं. अजून तिची तिशीसुद्धां उलटली नव्हती. सगळं आयुष्य समोर होतं. आणि आतां पैसा मिळूं लागला होता. [illegible] लाभूं लागली होती. आतां असं सुतक्यासारखं वागून कसं भागेल?—रूपांत ती उजवी नव्हती नि डॉक्टरी पेशाला पांढरे कपडे आवश्यक होते; तरी देखील एखादे वेळीं तिनें रंगीत साडी अगर नव्या नमुन्याची कुर्ती वापरायला हरकत नव्हती. आकर्षक वेषभूषा करावी, गाणीं गुणगुणावींत, सिनेमे पहावेत, चार चौघांत मिरवावं, नवे मित्र करावेत—इरावतीनं

परत पूर्णिमारखं वागावं असं त्या माउलीला फार फार वाटे व त्यासाठीं ती धडपड करी.

कठोर काळानें आणि प्रेमळ मावशीनें इरावतीचं टाहो फोडणारं हृदय हळूं हळूं बरंचसं शांत केलं. एकांतांत एकसारखी आसवं ढाळणारी इरावती कोरड्या डोळ्यांनीं दूर कुठेतरी टक लावून पाहूं लागली. आठवणी विसरण्यासाठीं दवाखान्यांत जास्त काम करूं लागली. कधीं तिला वाटे, अविनाश गेला कुठचा!—अपघाताच्या आदल्या दिवशीं काम संपवून हॉस्पिटलमधून परततांना तो भेटला होता. झाडाखालीं उभं राहून दोघं अर्धा एक तास बोलत होतीं. त्यानें शिंपडलेल्या सेंट्चा वास अजून आपल्या साडीला येतो आहे हें दाखविण्यासाठीं तिनें त्याच्यापुढें पदर केला होता; अन् मग तो घाईघाईनें निघून गेला होता. एका औषधाच्या कारखान्यांत तो थोडं काम करून फीपुरते पैसे मिळवी, तिकडे त्याला जायचं होतं; व उद्यां परत तो भेटणार होता—अविनाश उद्यां भेटणार आहे अशा कल्पनेच्या कोषांत ती स्वतःला लपेटून घेई. त्या गुंगींत तिचा वेळ जाई. उसना हुरूप येई...कधी तिला वाटे, कीं अविनाश जाऊन कितीतरी कालावधी लोटला आहे. केवढा बदल झाला आहे भोंवतालीं. तें कॉलेज, तें हॉस्पिटल, मित्रमैत्रिणी-सारं नाहींसं झालं आहे. ती एक प्रतिष्ठित डॉक्टर झाली आहे. अगदीं वेगळ्या, वरच्या पातळीवरच्या आयुष्यांत आली आहे...नुकतंच जागं झाल्यासारखं ती चोहोंकडे पाही. एखाद्या देवाच्या तसबिरीकडे पहावं तसं अविनाशच्या फोटोकडे पाही. कोरडेपणीं. अन् नव्या जोमानें कामाला लागे...

भोंवतालच्या जगानें, मावशीनें अन् खुद्द इरावतीच्या मनानें तिला व्यामोहाच्या गर्तेतून बाहेर काढायचा आटापिटा आरंभला होता. चवी-ढवी, चैन, विरंगुळा, विश्रांति—असले स्वतःचे चोजले पुरवायची इच्छा इरावतीला अजून होत नव्हती. पण चैन नाहीं तरी जरूरी म्हणून कांहीं गोष्टी करणं तिला भाग होतं. अडलेल्या बायका सोडवायला म्हणून ती जाई, अन् पेढ्याफळांची करंडी घेऊन परत येई. त्या बायांच्या आग्रहासाठीं तिला मिठाई तोंडांत टाकावी लागे. घरीं लोक आले तर चांगलं दिसावं म्हणून नवा टीसेट आणावा लागला होता. मावशीचं चाललं होतं कीं राहायला तरी मोठी जागा सुद्धां घ्यायला हवी आतां. आणि—आणि रात्रीं अपरात्रीं रिक्षा करून 'व्हिजिट'ला जावं लागे तेव्हां मोटार घ्यायचा विचार तिच्या मनांत डोकावून जाई. आणिक पांच सहा वर्षांत मोटार घेण्याइतके पैसे जमणं कठीण नव्हतं. चैन नाहीं पण आवश्यकता म्हणून तिच्यासारख्या डॉक्टरबाईनं मोटार ठेवण्यांत वाईट काय होतं?—

पण मग अशा भराऱ्या मारणारं तिचं मन कधीं भोवंडून जाई. वाटे, अविनाशला सोडून आपण काय हें आरंभलं आहे. अविरचं आपलं प्रेम कमी होत चाललं काय?—हा विचार तिला अति खिन्न करी. त्याच्यावर फार फार प्रेम केलं होतं तिनें अजूनही करीत होती! अविनाशच्या अशा आठवणी दाटल्या म्हणजे तिचा चेहेरा उतरून जाई. भरल्या ताटावरून ती उठून जाई. वाटेंत भेटलेल्या ओळखीच्या डॉक्टरशीं तुटकपणें बोले. एखाद्या समारंभाचं निमंत्रण स्वीकारताना मावशीला म्हणे,

"मावशी, ह्या समारंभाला जाण्यांत मी चूक तर नाहीं ना करीत?"

"चूक कसली? एवढं अगत्यानं बोलवलंय् त्यांनीं; अन् तूं गेली नाहींस तर काय वाटेल यांना?—अशी लंकेची पार्वती बनून जा मात्र चुकीचं आहे हो!—बे, ती माळ घाल. धूळ खात पडली आहे—" मावशी संधी साधून तिला नटवायची लगबग करीत.

मोत्याची एकसरी, रेशमी साडी अन् नव्या सँडल्स घालतांना इरावतीला अपराध्यासारखं वाटे. अन् मग त्या नव्या वेषभूषेंत नि समारंभाच्या गर्दीत तिचं मन हलकेंच बहरून जाई...असे समारंभ, चहापार्ट्या, सभा मधूनमधून होत. अन् मग इरावती दचकून स्वतःला विचारी,

"मी त्याला विसरत तर नाहीं?"

"त्याच्या स्मृति टवटवीत ठेवायला पारोशानंच कशाला जगायला हवं?" ती स्वतःचंच असं सांत्वन करी. अन् मग त्याचं चिंतन करीत नव्या आयुष्यांतल्या आनंदाला सामोरी जाई. त्याच्या नांवानें उगांच आसवं ढाळण्यापेक्षां त्याच्या प्रीतीचा सुगंध सांभाळीत निर्भर मनानें जगणंच श्रेयस्कर आहे असं तिला वाटूं लागलं होतं—

मनाच्या ह्या उभार अवस्थेंतच तिला त्या सुगंधाची स्मृति आली. एका दुपारीं निजायच्या खोलींतलं गोद्रेजचं कपाट तिनें सहज उघडलं, त्यांत एका खणांत तिला 'जून सेंट्'ची रिकामी बाटली आढळली. ती बाटली तिनें अविनाशला भेट दिली होती. सुगंधाचं, सुवासाचं त्याला वेड होतं; पण उदबत्तीचा पुडा अगर चाफ्याचीं फुलं घेण्याइतकीही त्याची ऐपत नव्हती. तो सेंट् त्याला आवडला नि म्हणून तिनें त्याच्यासाठीं तो खरेदी केला. तो सेंट् त्याला इतका आवडला कीं त्यानें ती कुपी तिच्या अंगावर ओतली आणि तिला मिठी मारून तो कितीतरी वेळ बसून राहिला. एखाद्या सुगंधी कळींत भुंगा बसावा तसा. रिकामी झालेली बाटली तेव्हां तिनें पर्समध्यें सहज म्हणून टाकून दिली...अन् मग गोद्रेजच्या कपाटांत खास जपून ठेवून दिली.

ती छोटी, पातळ बाटली हातांत खेळवतांना अन् छातीशीं धरतांना इरावतीला सगळी आठवण मिठी मारूं लागली. त्याचा स्पर्श स्पष्ट जागवूं लागला. 'जून'चा तो मंद गोड वास सर्वत्र दरवळूं लागला. एका अननुभूत भावनेनें ती सुखावून गेली. अविनाश गेला ह्याचा शोक करणं तिला उथळ वाटलं. त्याची स्मृति जपण्यांत कर्तव्य केल्याचं खोल समाधान मिळालं. अन् मग वाटलं कीं आतां दुकानांत जावं नि तशी बाटली पुन्हां विकत घ्यावी. सेंट वापरावा, अंगावर शिंपडावा, सुगंधांत, सुखांत न्हाऊन

निराशं! अविनाश गेला तरी आयुष्य आहे. त्याच्या स्मृति आहेत, अन् हा सुखद्धी आहे. आयुष्याच्या ओढीनें ती प्रथमच इतकी वेडावून गेली. मावशीला ओरडून म्हणाली,

"मावशी, मी जरा बाहेर जाऊन येणार आहे ग—"

धुतलेल्या कपड्यांच्या घड्या करण्यांत गुंतलेल्या मावशीना धड ऐकूं गेलं नाहीं. इरावतीला वाटलं, तिला पुन्हां ओरडून सांगितलं तर ती आश्चर्य दाखवील; अन् त्यानें आपला आवेश ओसरून जाईल. तिनें घाईनें 'गोदरेज' बंद केलं. ट्रंकेंतलं मावशीनें ठेवलेलं आगलेलं जॉर्जेटचं पातळ बाहेर काढलं. केस ठीक करतांना तिला वाटलं, कीं गळणारे केस थांबवायला एखादं तेल लावायला हवं. आणि मग आरशापुढें कपडे बदलतांना सौंदर्यसाधनांची मोठी यादी तिच्या मनांत तयार होऊं लागली.

इरावती घराबाहेर पडली ती अगदीं वेगळ्या, हलक्या फुलक्या, आनंदी मनःस्थितींत. ह्या वेळेला खरं म्हणजे जगतापांच्याकडे जायला हवं होतं. लेकीचं पोट दुखूं लागलंयू म्हणून जगतापीणबाईंचा दोनदां निरोप येऊन गेला होता. इरावतीची दवाखान्यांत जायचीही वेळ झाली होती. निदान संध्याकाळचं बाहेर पडायचं तें इतकं नटून नि बाजारच्या रस्त्यानें जायला नको होतं. पण इरावतीला कमलीच काळजी, किंतू वाटत नव्हता. इतक्या प्रसन्न मनःस्थितींत ती प्रथमच हिंडत होती. तसं हिंडण्यांत, नटण्यामुरडण्यांत, बाजारांतून जाण्यांत केवढं सुख आहे हें ती प्रत्यक्ष अनुभवीत होती. जिकडे तिकडे केवढा आनंद भरला होता. दुःख विसरून, क्लेश विसरून जो तो हिंडत होता. इरावतीसारखा. इरावतीलाही आपल्या वेदनेचा बाऊ करायचा नव्हता. आणि पोळलेल्या मनानेंच सारा गहिरा आनंद लुटायचा होता.

दुकानांच्या पाठ्या वाचीत ती मजेत चालली होती. दुकानादुकानांतून किती तरी तऱ्हेचा माल आकर्षक रीतीनें मांडून ठेवला होता. सगळंच विकत घ्यावं अशी तिला वासना झाली. रस्त्यावरची वाढती गर्दी तिला फार आवडली. किती तरी बायका गर्भार दिसत होत्या; त्यांच्या दर्शनानें तिला मोठं सुख वाटलं. हॉस्पिटलमध्यें काम करीत असलेला एक वॉर्डबॉय तिला भेटला तेव्हां सगळं पूर्वीचं आयुष्य पाहिल्यासारखं वाटलं. हमरस्ता सोडून ती मंडईच्या वाटेला गेली. अन् मग तिथेंच वळणावर थांबली. प्रथम सहज म्हणून, अन् मग अगदीं भांबावून!

तिच्या समोरूनच जाणाऱ्या एका वृद्ध इसमानें तिचे पाय नि डोळे खिळवून टाकले होते. पुन्हां पुन्हां चकितपणें ती त्या गृहस्थाकडे पहात होती. वार्धक्यानें वाळलेली, दाढी वाढलेली, धोतराला दहा ठिकाणीं गांठी मारलेली व डाव्या हातांत मेथीची शिळी जुडी घेऊन जाणारी ती मूर्ति किती करुण दिसत होती. आपल्याच व्यथेंत चूर होऊन समोर पहात तो चालला होता. इकडे तिकडे पाहिलं असतं तरी त्या वृद्धानें इरावतीला ओळखलं नसतं. पण इरावतीनें त्यांना ओळखलं. अविनाशचे ते वडिल होते—इरावतीचे सासरे!—

अविचे दादा दिसेनासे होईपर्यंत इरावती रस्त्यावर उभी राहून वेड्यासारखी त्यांच्याकडे पहात होती. मग ती भानावर आली. एकदम तिला अंधारून आल्यासारखं झालं. आधारासाठीं ती शेजारच्या एका दुकानांत शिरली. ती वृद्ध कारुण्यमूर्ति आपल्यामागें येत आहे असा तिला भास झाला व दुकानाच्या दारांतच थबकून तिनें रस्त्याकडे वळून पाहिलं. रस्त्यावर तिला हवीशी वाटलेली रहदारी चालूच होती. अविनाशचे वडील त्यांत नव्हते. इरावतीला जरा सुटल्यासारखं, जरा करकचल्यासारखं वाटलं. अन् उसना उत्साह आणीत ती दुकानदाराला म्हणाली,

"सेंटस् पाहायचे आहेत मला—"

"दाखवतों ना—" कांचेची नुरक पेटी बाहेर काढीत दुकानदार म्हणाला.

"जून-जून सेंट दाखवा—"

"हे पहा ना, नवे नवे सेंटस् आले आहेत,—" अनेक छोट्या छोट्या कुप्या बाहेर काढीत दुकानदार म्हणाला.

"नको—मला जूनच हवाय्—जून नाहीं ह्यांत?"

"जून येत नाहीं हल्लीं—हा बघा ना नवा—"

'जून' हल्लीं मिळत नाहीं हें कळल्यावर इरावतीचं तोंड कडू झालं. त्या मंद गोड सुगंधाची ती आठवण आणूं लागली. पण तिला इतक्या अत्तरांच्या पुढें 'जून'चा वास आठवेना. अविनाशही दिसेना. दचकून तिनें रस्त्याकडे पाहिलं.

"हा बघा—मिस्चिफ—जूनसारखाच आहे हुबेहूब."

इरावतीनें वळेंच त्या जूनसारख्या असलेल्या सेंटची बाटली खरेदी केली व ती दुकानाबाहेर पडली. आतां कुठें जायचं?—इरावतीला एकदम वाटलं, दादांच्या मागोमाग आपल्याला अविच्या घरीं जायला हवं. जुन्या वस्तींतलं त्याचं बिऱ्हाड तिनें एकदोनदां दुरूनच पाहिलं होतं. त्याच्या घरीं

ती एकदांही गेली नव्हती. त्याच्या घरच्या कुणाचींच तिची ओळख झालेली नव्हती. आपल्या घरच्या अठरा विश्वे दारिद्र्याची अविनाशला शरम वाटे. इरावतीला घरीं न्यायला अजून अवकाश आहे असं वाटे. मेडिकलची शेवटची परीक्षा संपली कीं मग तो तिला आईकडे नेऊन सांगणार होता कीं, ही बघ तुझी सून! श्रीमंताची असली तर आपल्या घरात समावेल. दादा कुठें आहेत ?—दादांचा आशीर्वाद हवाय......

आठवणींच्या वाटेवरून अविनाशच्या घराकडे जाणारी इरावती मध्येंच थांबली. खरंच ती त्याच्याकडे चालली होती! त्याच्या घरीं ती कशी जाणार? इरावतीला विचित्र झालं. रस्त्यांत घेरी येईल ह्या भीतीनें तिनें रिक्षा केली व ती आपल्या घरीं आली.

"कुठें गेली होतीस?—" दार उघडीत मावशी तिला म्हणाल्या, "औषध आणायला?—"

"तेल आणायला. पावडर लिपस्टिक आणायला. सेंट् आणायला—" इरावती आंत घरांत जात म्हणाली, "सेंटच आणला नुसता—"

मावशींना बोध होईना. इतकी नटून इरावती उड्या मारीत गेली व अत्तराची बाटली घेऊन आली हें पाहून त्यांना आनंद मात्र झाला. त्या तिच्या मागोमाग गेल्या. पलंगावर पसरलेल्या इरावतीच्या हातांतली बाटली त्यांनीं घेतली व वास घेत त्या म्हणाल्या,

"अशीच एक बाटली तुझ्याकडे आहे नाहीं ग? रिकामी, जुनी?"

"हो, जूनची! अविनाशनें दिला होता तो सेंट—"

इरावतीनें उशींत तोंड खुपसलं. तिचा वक्षःस्थळावरून ढळलेला पदर ठीक करीत मावशी म्हणाली, "म्हणून घेतलीस ही बाटली तूं! मी तर किती दिवस तुला म्हणतें आहे इरा, कीं स्वतःचं आयुष्य फुलवून—"

त्यासरशीं इरावतीला हुंदका आला. पण तिनें तो दाबला व उशींतलें तोंड वर करीत म्हटलं,

"माझं आयुष्य मी फुलवीत बसलें आहे मावशी—म्हणूनच माझं कर्तव्य मी विसरलें...मावशी, त्याचे वडिल आज मला दिसले. अगदीं थकलेले. दारिद्र्यानं गांजलेले. त्यांची फार गरिबी आहे ग. अविच नाशरीवर नि कर्जावर शिकत होता. त्याच्यावर आशा होती साऱ्या घराची. काय झालं असेल आतां त्या घरांत? कसे जगत असतील ते लोक?—माझ्या सासरचीं माणसं? दोन वर्षांत मला त्यांची आठवण आली नाहीं. माझ्याच दुःखांत मी चूर. अन् हें आयुष्य आतां फुलवतें आहे. मावशी, मावशी—"

इरावतीला मावशीच्या कुशींत शिरावंसं वाटलं. पण कसल्याशा परके-पणाच्या भावनेनें ती दूर सरली. तिच्या कोपराचा धक्का बाटलीला लागून सारा सेंट तिच्या साडीवर सांडला. त्या वासाचा भपकारा इरावतीच्या हुंदक्यांत, हृदयांत भरला. अविनाशच्या आठवणीनें ती व्याकूळ झाली. तिच्या लक्षांत आलं कीं 'जून' पेक्षां ह्याचा वास वेगळा आहे. ती एक-दम थबकली. अन् मग हॉस्पिटलमध्यें अविनाशच्या विछिन्न प्रेताभोंवती शोक करणाऱ्या त्याच्या आईवडिलांच्या व बहिणीच्या आठवणीनें ती कावरीबावरी झाली—

'मिसचिफ्' चा तो दर्प थोड्याच दिवसांत नाहींसा झाला. ती रिकामी बाटली तशीच टेबलावर पडून राहिली. ती 'गोदरेज' मध्येंही ठेवली गेली नाहीं नि अडगळींतही टाकली गेली नाहीं. त्या बाटलीकडे पाहून इराव-तीला कांहीं बोध होत नव्हता. त्याचा वास तिला येत नव्हता. कसल्याच आठवणी येत नव्हत्या. उमाळे येत नव्हते. तशा उमाळ्यांची, दुःखी व विरक्त विचारांची तिला लाज वाटूं लागली होती. दोनएक वर्षे आपण केवळ शोक करीत राहिलों, आपल्या दुर्दैवाचे देव्हारे माजवले, ह्याचा विषाद तिच्या मनांत भरून गेला होता. तसं पाहिलं तर तिचं दुःख, तिची हानी फार मोठी नव्हती. तिला मावशी होती. दवाखाना होता, आराम-शीर आयुष्य होतं. अविनाशच्या वृद्ध मातापितरांच्यावर आलेला प्रसंग त्यापुढें केवढा दारुण होता! उतार वयांत, पोखरणाऱ्या दारिद्र्यांत त्यांचा हातातोंडाशीं आलेला पोटचा गोळा नाहीसा झाला होता. त्यांच्या सीशा आकांक्षा जळून गेल्या होत्या. अन् पुन्हा परिस्थितीशी टक्कर द्यायला उभं राहावं लागलं होतं. अविनाशचा मृत देह हॉस्पिटलमध्यें पाहिल्यावर इरावतीला घेरी आली होती व पंधरा दिवस मावशीच्या शुश्रुषेखालीं ती बिछान्यांत पडून होती. परंतु हंबरडा फोडणाऱ्या त्याच्या आईवडिलांना पाठोपाठ घरीं परतावं लागलं होतं, व लगेच मुलाच्या अभावी घर सावरून धरावं लागलं होतं...

जगतापांच्या मुलीच्या अवघड केसमध्यें इरावती आठवडाभर गुंतली होती. पण तिचं कामांत मन नव्हतं. दम्यानें पिडलेली आई, काळजीनें खंगलेले वडील, धाकटे बहीणभाऊ—हॉस्पिटलमध्यें पाहिलेले अवि-नाशच्या घरच्या लोकांचे चेहेरे इरावतीच्या डोळ्यांपुढें सारखे येत... अन् मग धोतराला दहा ठिकाणीं गांठी मारलेली, दाढी वाढलेली, खंग-लेली अविच्या दादांची मूर्ति तिच्या समोरून सावकाश निघून जाई. तिचं मन अनावर होई, अन् मग माघार घेई. आपण उगांच बेशुद्ध पडलों, नाहीं तर अंत्यदर्शनाला अविच्या घरीं जातां आलं असतं. नंतर तरी समाचाराला जायला हवं होतं, असं तिला वाटे नि मग ती जास्तच अस्वस्थ होई.

जगतापांच्या मुलीची नीट सुटका झाली आणि वरदाभर रुपये घेऊन इरावती घरीं परतली. सतत श्रम करून ती दमली होती नि टॅक्सींत डोळे मिटून पडून राहिली होती. मध्येंच तिनें डोळे उघडले तेव्हां तिच्या लक्षांत आलं कीं अविनाशाच्या घराजवळून तिची गाडी चालली आहे. त्या जुनाट वस्तींतून ती दोनतीनदां गेलेली होती. कॉलेज गॅदरिंगहून परततांना रात्रींचं अविनाशला इथें सोडून ती मैत्रिणीच्या मोटरमधून पुढें गेली होती...घर दाखवायला म्हणून अविनाशनं तिला आगळं होतं नि मग विचार बदलून रस्त्यावरूनच परत पाठवलं होत...ह्या वस्तींत आपल्याला दोनतीन वर्षांनीं रहायचं आहे असे विचार तिनें मनांत वागवलेही होते. अन् आतां दोनतीन वर्षं झालीं होतीं व ती त्या वस्तीत आली होती...इरावतीला वाटलं कीं उतरावं नि सरळ अविनाशाच्या घरांत जावं. ती त्या घरची होती. सून होती; लक्ष्मी होती !–पांढऱ्या पायाची का होईना–पण कुणीतरी लग्यावांधलाची होती. अविला तिनें वरलं होतं. दोघांच्या मनांचं मीलन झालेलं होतं. ती त्याची पत्नीच होती. फक्त लौकिकदृष्ट्या अक्षता पडायच्या होत्या. नंतर अविला अपघात झाला नसता तर ती त्या घरांत नसती का राहिली ? फक्त कांहीं महिन्यांचाच फरक. पण तिच्या लेखीं त्याला किंमत नव्हती. अविनाशचं सारं तिला स्वीकारायला पाहिजे हेंच खरं होतं !

"ड्रायव्हर—" ती एकदम टॅक्सीवाल्याला म्हणाली. टॅक्सीचा वेग कमी झाला. अन् इरावतीच्या आतुरतेचाही. तिच्या अंगाला कंप सुटला व पायांत गोळे आले. कसं त्या घरांत जायचं—कां जायचं–काय करायचं, कळेना तिला. छे, त्या घरांत आतां ती कधींच जाणार नव्हती. त्या घराशीं तिचा संबंध नव्हता. ती फक्त अविला ओळखत होती. तो गेला, नि सरलं सगळं !—परत डोळे मिटत ती म्हणाली, "ड्रायव्हर, जरा जोरानं ने गाडी—"

अगदीं मलूल होऊन इरावती तिन्हीसांजेची घरीं आली. मावशी तिची वाटच पहात होती. पैशांची थैली तिला दिल्यावर, कढत कढत कॉफी घेतल्यावर व मावशीनीं तिची दृष्ट काढल्यावर तिला बरं वाटलं. अगदीं मोकळं मोकळं, रिकामं वाटलं. अविच्या घरच्या लोकांचा विचार न करणंच सूज्ञपणाचं आहे हें ती स्वतःला सांगूं लागली. अविनाशाच्या मृत्यूची जाणीव जितकी दुःखदायक तितकाच त्याच्या घरचा विचार भीतिदायक होता ! मृत्यूचा दाह आतां कमी झाल्यावर ह्या नसत्या जबाबदारीच्या जळवा चिकटून घ्यायला नकोत असं तिचं थकून गेलेलं मन घोकूं लागलं.

..सातआठ दिवस इरावतीनें असे पोकळ मनानें काढले. सुख दुःख–कांहींच शिवत नव्हतं सासरच्या माणसांचा विचार तिनें दूर केला नि अविनाशच्या आठवणीनें अस्वस्थ व्हायचंही टाळलं होतं. तिच्या वठलेल्या मनाला आलेले कोंब वाढत नव्हते. पण आहे त्या जागी ती घट्टपणें, चिवटपणें उभी होती. स्वतःचं दुःख विसरण्यासाठीं दुसऱ्याच्या अडचणी सोडवत राहिली.

गुंतवून ठेवलेल्या तिच्या मनाला एक दिवस अविचे दादा अचानक दिसले. 'महिला आरोग्य समितीं' त तपासणी संपवून ती दुपारची परत निघाली होती. बसस्टॉपजवळ रिक्षाची वाट पहात होती. ताटकळत उभी राहिली असतांना तिला अचानक दादांची आठवण आली. अन् मग एका बसमध्यें दादाच बसलेले तिनें पाहिले ! दूरवर रिक्षा दिसत होती नि दुपारचं ऊनही वाढत होतं. पण भारावल्यासारखी ती बसकडे गेली व निमूटपणें आत जाऊन बसली.



अनुक्रमणिका

बस सुरू झाली नि इरावती दाराजवळच्या एका जागेवर बसली. दादा समोरच होते. हातांत एक टाइपरायटर धरून एका लठ्ठ माणसाशेजारीं ते अंग चोरून बसले होते. तेंच दहा जागीं गांठी मारलेलं धोतर, मळखाऊ कोट, पांढरी पडलेली व अंगभर वाढलेली दाढी. अनंत क्लेश सहन करून थकलेली मुद्रा. इरावतीचं हृदय त्यांच्याकडे पाहातां पाहातां अगदीं द्रवून गेलं. गालांचीं उंच हाडं नि जिवणीची रेषा थेट अविनाशासारखी होती. इरावतीच्या घशांत अडकल्यासारखं झालं व मुठींत घाम जमा झाला.

बस धक्के देत थांबत होती. तिकिटवाला टकटक् वाजवीत येत होता. दादांनीं कोटाच्या आंतल्या खिशाच्या तळांतून एक गुळगुळीत पावली काढली व त्याला दिली. तिकिटवाल्यानें ती उलटसुलट केली व म्हटलं,

"चालायची नाहीं ही—"

"चालायची नाहीं ?—" दादानीं दचकून म्हटलं. "एवढेच पैसे आहेत माझ्याजवळ. म्हणून तर इथवर चालत आलों. बघ, बघ, खोटं नाहीं तें नाणं—"

दादांची ती धांदल, कावरी बावरी नजर व त्यांच्या जवळचं एकच नाणं पाहून इरावतीचं हृदय कासावीस झालं. दयेनं, आपुलकीनं भरून गेलं! बसमधले सगळे उतारू दादांकडे पाहूं लागले ह्याचा तिला राग आला. वाटलं, आपण पर्समधली नोट पुढें करावी आणि त्यांचं तिकिट काढावं. उठून त्यांना आपल्या जागीं बसवावं. हात धरून, सांभाळून त्यांना घरीं पोंचवावं—

पण इरावतीची पर्सवरची पकड सैल झाली नाहीं. एका परक्या माणसाचं तिकिट तिनें कसं काढायचं ?–ते काय म्हणतील ? तूं कोण म्हणून विचारतील–ती श्वास रोखून नुसती पहात राहिली—

"बघूं – ? ठीक आहे कीं–" दादांच्या शेजारच्या लठ्ठ माणसानें तिकिटवाल्याकडून तें नाणं घेतलं व आपलं मत निर्णायक स्वरूपांत सांगितलं. तिकिटवाल्यानेंही मग खळखळ केली नाही. दादांना तिकिट देऊन तो पुढें झाला.

"काय, टाइपरायटर का ?" तो लठ्ठ माणूस दादांना विचारूं लागला.



"आँ ?–हो–टाइपरायटर—" दादा कसेबसें म्हणाले.

"विकायचा आहे ?–"

"नाहीं–नाहीं. आणलाय असाच चार दिवस—"

"छोकऱ्यासाठीं—?"

तें संभाषण ऐकणाऱ्या इरावतीच्या पोटांत खड्डा पडला.

"नाहीं. माझ्यासाठीं –" दादा तुटकपणें म्हणाले व बसचा वेग कमी होत आहेसं दिसतांच खालीं उतरायला उठले.

इरावतीला वाटलं, आपणही उठावं. दादा मध्येंच कुठें उतरले ? त्या परक्या लठ्ठ माणसानें नकळत केलेला वार त्यांना सोसवला नाहीं काय ? अन् ते गेले तर आपण कसं बसून राहायचं ? – पण ती बसून राहिली; अन् दादांना सोडून बस पुढें निघाली. दादांचे डोळे, शब्द, ती गुळगुळीत पावली व जुनाट टाइपरायटरचं खोकं—इरावतीला सारखं दिसूं लागलं. कुठल्याशा कचेरींत ते पूर्वी टायपिस्ट होते असं अविच एकदां म्हणाल्याचं स्मरलं. तिथलंच त्यांना एकवीस रुपये पेन्शन मिळत होतं. आणि आणिक पैसे मिळविण्यासाठीं ते आतां अधू डोळ्यांनीं वळणारीं बोटें चालवणार होते — इरावती करुणेच्या भावनेनें कासावीस झाली. अन् चुळबुळत तशीं बसून राहिली.

बस सोडून व रिक्षा करून अखेर ती घरीं आली. मनाची समतोल वृत्ती बिघडवून, हळुवार भावनांनीं भरलेल्या अवस्थेंत परतली. तें घरही तिला परकं वाटलं. ती मावशी आतां नको भेटायला असं वाटलं. किती दिवस मावशीनं तिला जपायचं ? आतां तिनेंच नको का सासूला जपायला ? मिळालेले पैसे सासऱ्याला नकोत का द्यायला ?

इरावतीला वाटलं, माघारी जावं. हें घर वर्ज्य केलं म्हणजे त्या घरीं जायचा धीर होईल. पण ती तशीच आंत गेली. दिवाणखान्यांतल्या कोपऱ्यांत साईबाबांच्या तसबिरीपुढें मावशी डोळे मिटून बसल्या होत्या. इरावतीला मावशीसारखं साईबाबांचं वेड नव्हतं. साधू, बुवा, असले कांहीं नाद नव्हते. पण उदबत्तीच्या सुगंधी वलयांनीं ती थबकली. अन् फाटक्या कपड्यांतली, दाढी वाढलेली, दादांच्यासारखी दीनवाणी दिसणारी ती तसबिरींतली मूर्ति पाहतांच व्याकूळ होऊन आसवं ढाळूं लागली...

इरावतीची मनःस्थिति पाहतां पाहतां पार पालटून गेली. अविनाशाच्या मृत्यूचं दुःख मागें पडलं. त्याच्या आठवणी कुरवाळण्याचा चाळाहि बंद झाला. स्वतःची विरक्त राहाणी व नव्या आयुष्याची ओढ – ह्या दोन्हींचं द्वंद्व थांबलं. अविनाशाच्या दादांची ती केविलवाणी, करुण मूर्ति अहोरात्र डोळ्यांपुढं येऊं लागली. अविचं घर सारखं समोर दिसूं लागलं. तिच्या मनांतलीं आंदोलनं संपलीं आणि त्या घराशीं आपले संबंध आहेत, त्या घराबद्दल आपल्याला कांहीं कर्तव्यं आहेत ह्या कल्पनेचा पगडा तिच्यावर बसला. तीं कर्तव्यं पार पाडणं आपल्याला अशक्य होऊन बसलं आहे हीही जाणीव जास्त स्पष्ट होत गेली. अन् मग एका वैफल्याच्या कोंडमाऱ्याच्या भावनेनें ती वेडीपिशी झाली.

तशांतच तिला अविनाशाच्या घरासमोर एक केस मिळाली. नव्हे, वाण्याची ती बाई अविनाशाच्या घरासमोर राहाते हें समजतांच इरावतीनेंच त्या बाईच्या घरीं जायचं ठरवलं. गर्भारपणांतील रक्तदोषामुळें त्या बाईणीला रोज दवाखान्यांत येणं कठीण होतं. इरावती एक दिवसाआड विज़ीट फी न घेतां तिला तपासायला जाणार होती — दुसऱ्याच दिवशीं इरावती सकाळची दवाखान्यांत जाण्यापूर्वी त्या पेशंटकडे निघाली: अविनाशाचं घर

न्याहाळतां येईल, दादांचं दर्शन होईल, कदाचित् आईही दिसतील ह्या कल्पनेनें ती आतुर झाली होती नि कावरीबावरीही झाली होती.

त्या वस्तींत शिरल्यावर व त्या रस्त्यावर आल्यावर तिच्या छातींत धडधडलं. टाइपरायटरचा खडखडाट व्हावा तसं. हातांतली बॅग घट्ट धरून ती धीरानें पुढं आली. अविचं घर तिनें दुरूनच ओळखलं. एका जुनाट वाड्याच्या पुढच्या दोन खोल्या. इरावती त्या माडीकडे दृष्टी लावीत जास्त पुढें येऊं लागली. रस्त्यावर उभं राहून तरी ती दारूं डोळे भरून पाहावी असं तिला वाटलं. पण तेवढ्यांत वाणीच सामोरा आला. डॉक्टर येत आहेत हें त्यानें दुकानांतून पाहिलं व तो रस्त्यावर आला. दुसऱ्या दिशेकडे पहाणाऱ्या इरावतीला म्हणाला, "बाई, इकडे — ह्या बाजूला. हें घर आपलं — "

इरावती भानावर आली. दृष्टी वळवून, मन आवरून वाण्याच्या मागोमाग दुकानांत शिरली व अंधेऱ्या जिन्यानें वर गेली. अंधेऱ्या खोलींत तिनें त्या बाईला तपासलं. निरोप द्यायला वाणी परत रस्त्यावर आला म्हणून समोर बघतच तिला परत जावं लागलं. आपल्या सासरच्या जवळ येऊन खालच्या मानेनें माघारी परतावं लागलं.

...पण मग एकच ध्यास घेऊन बसलेलं इरावतीचं मन वेगवेगळ्या युक्त्या शोधूं लागलं. थर्मामीटर पहायला उजेड हवा म्हणून ती वाण्याच्या सज्जांत येऊं लागली. औषधं लिहून द्यायला म्हणून दुकानात बसूं लागली. ह्यामुळें थोडा वेळ तरी तिचा अविच्या घराकडे, घराच्या आंतल्या भागाकडे, शोधक नजरेनें पहातां येऊं लागलं.

समोरच्या माडीवरून त्या अंधेऱ्या बिऱ्हाडांतलं नीटसं दिसत नसे. दादांच्या टाइपरायटरचा एकदां आवाज आला अन् थर्मामीटर झटकायचं विसरून इरावती वेड्यासारखी पहात उभी राहिली. अंधारांत, एक एक बोट दाबीत म्हातारे दादा काम करीत होते. इरावतीच्या अंगावर कांटा उभा राहिला. तेच दादा एकदां उघड्या अंगानें उभे असलेले तिनें रस्त्यावरून पाहिले. अंगावरच्या फासळ्या उमटून दाखवणारा त्यांचा कृश देह पाहतांच तिचं हृदय अनुकंपेनें विव्हळूं लागलं. दादांनीं सहज रस्त्यावर पाहिलं; इरावतीची व त्यांची दृष्टादृष्ट झाली. इरावती विलक्षण दचकली. मग तिला उमगलं कीं ते तिला ओळखणार नाहींत. त्यांच्या लेखीं तिला अस्तित्व नव्हतं...

वारंवार त्या बिऱ्हाडाकडे बघून इरावतीला कांहीं कांहीं आंतल्या गोष्टी दिसूं लागल्या, व बाकीच्यांचा ती अंदाज बांधूं लागली. समोरच्या कोनाड्यांत देव ठेवले होते. त्याच्या आंतल्या भागांत मोरी असावी. भिंतीला टेकून आई बसत असाव्यात. खोकल्याचा आवाज तेथूनच येई. आईंना डोळें भरून पहायची इरावतीला फार इच्छा होती. पण त्या बाहेर येत नव्हत्या. आजारपणामुळं ?—मुलाच्या मृत्यूमुळें ?...

एका सकाळीं अविची धाकटी बहीण गॅलरींत बसलेली दिसली अन् नेहमीं दुःखी मुद्रेनें तिकडे बघणारी इरावती जरा खुलली. अविच्या दोन्ही बहिणींना व धाकट्या भावाला तिनें पाहिलं नव्हतं. मोठी बहीण लग्न होऊन सासरीं गेली होती. सासऱ्याचा नि नवऱ्याचा अति जाच झाला कीं मधूनच माहेरीं येई. धाकटा भाऊ असाच कुणाकडे राहून शिकत होता. अन् ही आठदहा वर्षांची बहीण...

"धाकटीचं नांव मंदा." अवि एकदां गप्पा मारतांना इरावतीला म्हणाला होता, "—पण खरं म्हणजे तिचं नांव शकुंतला ठेवायला हवं होतं. खूप मोठे नि छान केस आहेत तिचे—" इरावतीनें गॅलरींतल्या उन्हांत बसलेल्या त्या शकुंतलेकडे पाहिलं. तिचे केस खूप दाट नि भरघोस होते पण केसाला तेलपाणी नव्हतं. मधूनच ती डोकं खाजवीत होती त्यावरून उवा झाल्या असाव्यात असं वाटत होतं. तेल, शिकेकाई, आठवड्याचं न्हाणं...ह्या मुलीचं कांहींहि नीट होत नव्हतं काय ?

वाण्याच्या घरांत, स्वतःच्या घरांत, दवाखान्यांत सगळीकडे आतां अविच्या भावंडांचा व आईवडिलांचा विचार इरावतीच्या मनांत घोटाळूं लागला. अविनें वेळोवेळीं सांगितलेल्या अनेक गोष्टी तिला घोळांत पाडूं लागल्या. "इरा...तुला पाहिलं कीं माझ्या मोठ्या बहिणीची आठवण येते. तुझ्यासारखीच प्रसन्न चेहऱ्याची नि हुशार डोक्याची होती ती. पण सगळं धुळीला मिळालं. ठरलेला हुंडा दादा देऊं शकले नाहींत नि तिचा सासरीं छळ सुरू झाला. केव्हां ती घरीं येईल ह्याचा नेम नसतो. दर खेपेला पोर घेऊन येते नि पैसे घेऊन परत जाते. एकदां मी मिळवता झालों कीं हिच्या सासरचं तोंड बंद करून टाकणार आहे. आईच्या दम्यानं सारं घरच जर्जर झालं आहे. धाकटा मुकुंदा हुषार आहे ग. पण वाईट संगतीनें तो बिघडत चालला आहे. कसं वळण लावायचं त्याला ? मी तर असा पैसे जमविण्यांत नि हॉस्पिटलच्या कामांत अडकून पडलों आहे..." इरावतीला कुठचं कधींचं बोललेलं स्पष्ट आठवूं लागलं. वडिलांच्या मनाविरुद्ध कर्ज काढून, कष्ट करून शिकत राहाणारा अवि तिला ठायी ठायीं दिसूं लागला. अविनाशला ती दरखेपेला सांग, "कसंहि असूं दे. तूं ही एकट्याची जबाबदारी कां समजतोस ? एकट्याचे दोनअडीचशें रुपये कां मोजतोस ?–माझेही तितकेच त्यांत मिळव. माझंही तें कर्तव्य मी समजतें. मला त्यांत कांहीं वाटत नाहीं रे अवि; मला उलटंच हौस आहे सासूसासऱ्यांचं करायची; दीर नणंदांत मिसळायची—"

पण मग आतां ती काय करीत बसली होती ? कुठलं कर्तव्य पार पाडीत होती ?–अवि गेला म्हणून काय बिघडलं ? तिनें नको का पुढें सरसावायला ?–इरावतीचं जखडलेलं हृदय पुढें झेपावूं लागलं. आपल्या निष्क्रियतेचा, आठवणी उगाळण्याचा, दुरून बघत राहण्याचा तिला वीट आला. टेबलावर औषधांच्या ढीगभर जाहिराती नि इंजेक्शनच्या नळ्या पडल्या होत्या. आईंच्या दम्यावर हजार औषधं सुचवतां येण्यासारखीं होतीं. मंदाला तेलाची बाटली नि भावाला फीचे पैसे देणं अगदीं अगदीं जरूर होतं. आणि ती लग्न झालेली लेकुरवाळी मोठी बहीण ! ती तर इरावतीसारखी होती. तिला संततिप्रतिबंधक सल्ला देणं अगत्याचं होतं. तिच्या हुंड्याचं, अविच्या कर्जाच्या हप्त्याचं, सारं, तावडतोब मिटवायला हवं होतं. केवळ स्वप्नरंजनांत, तत्त्वज्ञानांत रमण्यांत काय मतलब होता ?



अनुक्रमणिका

तिच्यांपासून तुटक झालेल्या मावशी ज्ञानेश्वरी वाचीत सारा वेळ बसत. इरावती कधीं तें ऐकत बसे. पण मग एकदम म्हणे,

"मावशी, पुरे तुझं वाचन. पोथी ठेव नि पैसे काढ. मला मनीऑर्डर करायची आहे अविच्या घरीं—"

मावशी वाचन न थांबवतां सतरंजीखालचं बँकबुक काढीत व इरावतीकडे सरवीत. इरावतीचं अनिवार झालेलं मन पलट खाऊन म्हणे,

"कसे ग पैसे पाठवायचे त्यांना?–कसे स्वीकारतील ते. मोठे स्वाभिमानी नि ताठ आहेत ते—"

पुन्हा कुचंबणा, पुन्हां निष्क्रियता. इरावती उठे अन् वाण्याच्या घराची वाट चालूं लागे—

एक दिवस वाणी आपल्या दुकानांतून अविच्या बिऱ्हाडाकडे पाहून बडबडत होता. इरावतीला पाहतांच तो वरमला व तिचं स्वागत करून तिला वर नेऊं लागला. पण इरावती दुकानांत थांबली. सरळच म्हणाली,

"कांहीं भांडण झालं का त्यांच्या घरच्या कुणाशीं ?–"

"तर हो–" वाण्यांतला दुकानदार जागा झाला. "तीन वर्षांची बाकी थकली आहे. अन् पुन्हा पोरीला पाठवतो थेरडा. कुठं काड्याची पेटी–कुठं अधोलीचे जोंधळे—"

इरावतीचं शरीर ब्यांकडासारखं ताठर झालं. तिला तें ऐकवेना. एकदम ती म्हणाली, "असं करा. बिलाची काळजी करूं नका. मी देईन तुमची बाकी. अन् लागेल तो जिन्नस देत चला त्यांना—"

वाणी जरा चकित झाला. मग सावरून घेण्यासाठीं म्हणाला, "बाई, आम्हाला देखील त्यांची परिस्थिती कळते. हातातोंडाला आलेला त्यांचा मुलगा गेला. फार हुषार होता तो. तुमच्यासारखाच डॉक्टरी शिकलेला. अन् आतां घरच कोसळलंय. एकटा म्हतारा काय करणार ?–पुन्हां म्हातारी आजारी, धाकटं कार्ट कुठं बेपत्ता. मोठी मुलगी आली होती–"

"आली आहे ?–मला भेटायचं आहे तिला." इरावती अधीर होऊन म्हणाली.

"काल आली होती नवऱ्यानें हाकलून दिल्यावर. सगळा गोंधळ आहे बघा. अन् मदत कोणी नि काय करायची. माझं बिल मी सोडीन. पण घरभाडं ? वर्षाचं भाडं थकलाय्, उद्यां जप्ती देखील यायची–"

इरावती उठली व रस्ता ओलांडूं लागली. तिच्या मनाचा धीर आतां सुटला होता. निर्धारानें ती त्या वाड्यांत शिरली व जिना चढूं लागली अविच्या बिऱ्हाडाशीं येतांच तिनें बंधलेला पदर मोकळा केला, नीट घेतला घसा खाकरून दाराची कडी वाजवली.

जिन्यांत अंधार होता. घरांत कांहीं हालचाल होत नव्हती. इरावती थोडं थांबून कडी वाजवीत होती कुणीच दार उघडेना हें पाहून तिच्या मनाची तार सैल झाली. आपल्याला परत जावंसं वाटेल ह्या भीतीनें ती कडी घट्ट धरूं लागली. तशीच ती अंधेऱ्या पायरीवर उभी होती. तिला दार कुणी उघडत नव्हतं, घरांत कुणी येत नव्हतं. मावशींनीं परवांच म्हटलेला 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा । मजवर दया करा—' हा अभंग तिला आठवला व ती रडवेली झाली.

"कोण आहे ?" आंतून एक मुलाचा त्रासिक आवाज आला. "दार उघड; नुसतं काय विचारतोस ?—" एक बाई बोलली. मुकुंदाचा वा आईचा तो आवाज हें इरावतीनें ओळखलं व म्हटलं, "मी आहे–दार उघडा–"

मुकुंदानें दार उघडून म्हटलं, "कोण हवंय."

क्षणभर त्या तेरा चौदा वर्षांच्या, चिडक्या चेहेऱ्याच्या पोराकडे इरावती पाहात राहिली. मग भानावर येऊन म्हणाली, "आक्का आल्यायत ना–"

"तुम्ही तिच्या सासरहून आलात होय ? आजच गेली ती. आईच्या पाटल्या घेऊन गेली. सांगा तिच्या नवऱ्याला—"

त्याच्या खुनशी चेहेऱ्याकडे अपराधी मुद्रेनें पहात ती म्हणाली, "मी त्यांच्या सासरची नाहीं. मी डॉक्टर आहे. 'महिला आरोग्य समिती' तर्फे फुकट औषधोपचार करणारी. तुमच्या आईही आजारी आहेत ना–"

तिच्या दृष्टींत, स्वरांत विलक्षण मार्दव आलं व तिनें हलकेच एक पाऊल पुढें घेतलं.

पण तेवढ्यांत मुकुंदा ओरडला, "आईला जगायचं नाहीं आतां. औषध पिऊनच ती अर्धमेली झालीय्. अन् ह्या फुकटपायींच मला तुरुंगांत जायची पाळी आली. जा तुम्ही—"

त्या एवढ्याशा पोरट्यानें इरावतीच्या तोंडावर दार लावून घेतलं. त्याच्या वागण्याला कडवटपणा नि दाराचा आवाज इरावतीचं मन चिरून गेला. तिला कांहीं सुचेना. क्लोरोफॉर्मचा वास सुटल्यासारखं वाटलं. सगळं अंधेरलं. जिन्याच्या पायऱ्या दिसेनात. आपण अशाच कोसळून जमिनींत गाडल्या जाणारसं तिला भासूं लागलं.......

• •

आतां ती त्या घरांत बसली होती; आपल्या सासरच्या दाराजवळच्या भिंतीशीं, फाटक्या चटईवर. तीन दिवस तिच्या मनाची विलक्षण घालमेल झाली होती. असे विचित्र क्लेश त्या कडव्या मुलीनं आजपर्यंत सहन केले नव्हते. अविच्या घराचं दार त्या दिवशीं बंद झाल्यापासून तिच्या भावनांची सारीं कवाडं उघडीं गेलीं होतीं. वाण्याचं बोलणं, मुकुंदाचे उद्गार, अर्धवट उघडलेल्या दारांतून दिसणारा भयाण संसार–साऱ्या गोष्टी तिला भाजून काढीत होत्या, आणि कसलाही विवेक न सांभाळता त्या बंद दारावर धडक घेऊन आंत जायचं, दादांना सगळं सांगायचं, सगळा संसार आपल्या खांद्यावर घ्यायचा तिनें निर्धार केला होता.

त्या घरांत ती आली. दादांनींच तिला आंत घेतलं. ज्या घरांत शिरतांना धान्यमाप लवंडायचं त्या घराचं आढं लागेल म्हणून वांकून ती आंत आली. आईदादाना नमस्कार न करतां समोर टाकलेल्या चटईवर बसली. अन् मग खालच्या मानेनें घोगऱ्या स्वरांत म्हणाली,

"माझं नांव इरावती. मी तुमच्या अविनाशाची...आम्ही दोघांनीं लग्न करायचं ठरवलं होतं."

त्या दीनवाण्या खोलींतला वारासुद्धा हालला नाहीं. इरावतीनें दचकून वर पाहिलं. आई डोळे मिटून भिंतीशीं टेकून बसल्या होत्या. दादा अस्वस्थपणें हात चोळत बाहेर पहात उभे होते. त्यांना आपलं बोलणं समजलं नाहीं कीं ऐकूं गेलं नाहीं हें इरावतीला समजेना. विलक्षण व्याकूळ होऊन ती म्हणाली, "मनानें आम्ही एकमेकांना वरलं होतं. लग्न झाल्यासारखंच होतं. परीक्षा आटोपल्यावर ते तुम्हांला सांगणार होते. आम्ही

दोघं..." ती घाईघाईनें समजावणीच्या, क्षमेच्या सुरांत बोलत सुटली. आपल्या स्नेहाचा, प्रेमाचा, भावी सहजीवनाच्या स्वप्नांचा सारा पाढा तिनें सांगितला. आपल्यावर विश्वास ठेवावा, आपल्याला त्यांचीच समजावी, आपल्याला मुलाच्या जागीं मानावं—ह्यासाठीं ती काकुळतीनें, कळवळून बोलत होती. हृदय उघडं करून, जीव तोडून सांगत होती. मावशीशीं, स्वतःशीं देखील ती इतकं भरावून बोलली नव्हती. कितीतरी वेळ ती बडबडली अन् केव्हांतरी मूक झाली...

आई अगर दादा कुणीच बोललं नाहीं. ते तिला थांबवून बोलले नाहींत कीं ती थांबल्यावर बोलले नाहींत. गॅलरींत बसलेला मुकुंदा कडवटपणें बाहेरूनच ओरडला,

"अविचं नांव सांगून पैसे हवेत तुम्हाला? अविनं कर्ज काढलीं होतीं त्यांत तुमचंही होतं?...म्हणून तुम्ही आलांत?..."

त्या बोलण्यानं इरावती घायाळ झाली. दादांनीं असं मानायला नको म्हणून काकुळतीनें तिनें त्यांच्याकडे पाहिलं. मग म्हटलं, "नाहीं. मी पैसे द्यायला आलेय. माझे पैसे, माझी विद्या, माझं सगळं तुमचं आहे. ह्या घराचं, घराण्याचं आहे..."

"मग टाक हजार रुपये—" मुकुंदा कुत्सितपणें ओरडला.

दादांनीं घसा साफ केला नि मुकुंदाला दटावलं. इरावतीकडे न पाहाता ते म्हणाले, "म्हणजे अविनाशनं कांहीं ठरवलं असावं असा आम्हाला संशय आला होता तो खरा म्हणायचा! हॉस्पिटलमध्यें त्या दिवशीं बेशुद्ध पडलेली मुलगी तूं होतीस तर—"

"हो!—" इरावती हुंदका येऊन म्हणाली, "मला धक्का बसला नि मी मग आजारी पडले. नाहींतर तेव्हांच आले असते—" क्षमेची नजर तिनें आईच्याकडे वळवली. आईचे मिटलेले डोळे उघडले नव्हते. नि शरीरही हालत नव्हतं. दादाही आतां त्या भिंतीला टेकून उभे राहिले व म्हणाले,

"बरं झालं तेव्हां नाहीं आलीस तें!—अन् आतां आलीस हें देखील फार चुकलीस. जा आतां, घरीं जा. चांगली सुटली आहेस... आम्ही त्याला जन्मच दिला म्हणून भोगतों आहों सारं. तुझं लग्न झालं नाहीं हें..."

"लग्न झालं होतं असंच मी मानते. मनानें वरल्यावर..."

"मनाचे खेळ खेळूं नकोस. सुटलीस त्याचा फायदा घे नि सोन्यासारखं आयुष्य सत्कारणी लाव. मजेंत जग. आमचं हें असंच चालायचं. कुणास ठाऊक, अवि असता तर..."

"नाहीं, ते असते तर त्यांनीं नक्कीच सावरलं असतं! नौकरी न करतां ते शिकत राहिले म्हणून त्यांच्यावर तुमचा राग होता, मला माहीत आहे. पण त्यांनीं तुमच्यासाठीं, आक्का-मंदा-मुकुंदासाठींच, सारं चालवलं होतं. ते—आम्ही दोघं सगळं आयुष्य तुमच्या—"

"तुझा पैसा मी घेतला नसता. मला शिकवतेस होय?—" दादांच्या मनावरचा ताबा एकदम सुटला व हातवारे करीत ते म्हणाले, "मग तो मेला कशाला? – लहानपणीं एकदां जिन्यावरून पडला होता तेव्हां कसा मेला नाहीं?—अन् कर्जाचे हप्ते माझ्या डोक्यावर ठेवून कां उलथला?—तूं शिष्टपणें देणगी द्यायला, दान करायला यायची होतीस म्हणून?—"

"नका असं बोलूं..." इरावती आसवं आवरीत म्हणाली.

दादांनीं तिला कोपरापासून हात जोडून नमस्कार केला नि म्हटलं, "जा—! अविनाशचं हें एक निस्तरायला लावूं नकोस. दुःखावर डागण्या देऊं नकोस. पाया पडतों—" भ्रमिष्टासारखे ते बाहेर बघूं लागले नि न बोलतां हातवारे करूं लागले.

क्षणकाल कुणीच कांहीं आवाज केला नाहीं. मग आईनीं मिटल्या डोळ्यांनींच म्हटलं, "मंदे, त्यांना कुंकू लाव—"

इतका वेळ चपापून कोपऱ्यांत उभी असलेली मंदा पुढें आली. कोनाड्यांतला करंडा घेऊन इरावतीकडे गेली. कपाळावर टेकलेलं तिचं बोट धरावं, तिला जवळ घ्यावी व पोटभर रडावं असं इरावतीला वाटलं. मी राहूं इथें?—मंदाला असं विचारावंसं वाटलं. माझ्या घरीं ये—मंदाला सांगावंसं वाटलं. पण धुमसणारा मुकुन्दा, हातवारे करणारे दादा, दृष्टी बंद करून बसलेली आई अन् अविनाशच्या मृत्यूमुळें अपघातांत सांपडलेला तो अर्धमेला संसार तिला बोलूं, बसूं देईना. निरिच्छेनें ती उठली व जड मनानें बाहेर आली.

तिला आतां फार थकल्यासारखं झालं होतं. थोडा वेळ ती बाप्याकडे टेकली. बाप्यानें अविच्या घरची परवड तिखटमीठ लावून सांगितली. मुकुंदा सट्टा खेळूं लागला आहे...दादांना भ्रमाचे झटके येतात...तिला तें ऐकवेना! तशीच ती उठली व दवाखान्यांत गेली. होईल तितकं काम करून न जेवतां हॉस्पिटलमध्यें गेली. मग सहित्य समितींत. मन गुंतवण्यासाठीं, घरापासून दूर पळण्यासाठीं ती धडपडत होती. उपाशी पोटानें, तापलेल्या अंगानें..

कातरवेळची ती नाइलाजानें, नकळत घरीं परतली. मावशी दारांत उभ्या होत्या. त्यांच्याशेजारी तितकीच काळजींत असलेली मुलगी उभी होती. मंदा?—इरावतीनें तिला ओळखलें. "काय ग मंदा—" ती धांवतच आंत शिरली व मंदाचे खांदे धरून तिचं तुटक बोलणं ऐकूं लागली.

"...सावकारांनीं दुपारीं भांडीकुंडीं नेलीं. घरमालकानेंही जागा सोडायला सांगितलंय. आम्ही काय करायचं हो आतां? आई बोलत नाहीं. दादा कांहींबाही बडबडतात. मुकुंदाचा पत्ता नाहीं सकाळपासून—आम्हांला म्हणे कुठें देवस्थानीं जायचंय राहायला—मला भीति वाटते—भीति वाटते हो इरावतीवहिनी—"

तिची 'वहिनी' ही हांक इरावतीचं हृदय काळवून गेली. अन् तिनें सांगितलेल्या वार्तेनं इरावतीला ब्रह्मांड आठवलं. सगळंच संपत होतं! शेवटचं कांहींतरी करायला हवं होतं! काय करायचं? कपाळ फोडून घ्यायचं? इरावतीनें एकदम कपाळ पुसलं! घाम, कुंकू सारं निपटून टाकलं. तिला विलक्षण आवेश आला. विझणाऱ्या ज्योतीसारखी ती एकदम तळपूं लागली. मंदाला सोडून पुढें निघाली नि अविच्या बिऱ्हाडीं आली. दार उघडंच होतं. आंत दादा बसले होते व आई उरलेसुरले जिन्नस आवरीत होत्या. त्यांच्या पुढ्यांत जाऊन ती म्हणाली, "पाया पडते, अजून सारं सुरळीत होईल. माझं ऐका. मला पदरांत घ्या. ह्या घरची माना...ही पहा, विधवा बनून मी आलेय आहे—"

• •

तिच्याकडे दोघांनीं पाहिलंही नाहीं. ताण असह्य झाल्यानें ती धरणीवर कोसळली तरी त्यांनीं तिला हात लावला नाहीं. मेलेला संसार ते आवरीत होते...घाबऱ्या घाबऱ्या आलेली मंदाच परत गेली व मावशींना घेऊन आली...मावशींनीं परत तिची शुश्रूषा सुरू केली. अविनाश गेल्यावर धक्का बसून ती आजारी पडली तसंच दुखणं तिला झालं. तेव्हां तिचा नवरा गेला; अन् आतां तिचं सासरही मोडून पडलं. पुन्हां एकदां तिच्या आयुष्याची वेल करपून गेली.

• • •

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



रक्तांतल्या
प्रतिष्ठेपायीं आणि
स्वास्थ्यापायीं
वारंवार आड येतात
तीं

# मिटलेलीं कवाडें

दुपारच्या टळटळीत उन्हांत केव्हां एकदां घर गाठीनसं मला झालं होतं. मोठ्या रस्त्याला फुटलेल्या गल्लींत माझं घर होतं. मी गल्लीच्या तोंडाशीं आलें, तों मोटमोठ्यानें बोलणं ऐकूं येऊं लागलं. रस्त्यावर वर्दळीवर येणाऱ्या अनेक माणसांपैकीं कुणीतरी असेल या विचारानें माझं मन दुर्लक्ष करायला तयार होतं. पण आणखी पुढें गेल्यावर ऐकूं आलेल्या शब्दांनीं आणि दिसलेल्या दृश्यानें मी चकित होऊन पाहूं लागलें. कारण ती नेहमींचीच म्हातारी होती.

तसं म्हटलं तर ती म्हातारी माझ्या नजरेला चांगली परिचयाची झालेली होती पण मी तिच्याशीं कधींच बोललें नव्हतें. बोलणार कशी? बरोबरीच्या माणसा माणसांतही पडदे उभे असतात ना. मग तिच्यांत आणि माझ्यांत पक्की भिंत उभी होती. तिला माझी जाणीव भाकरी मागण्यासाठीं होत असली तरी मला तिची जाणीव व्हावी असं कधींच वाटलं नव्हतं. 'माय भाकर वाढा व' म्हणत ती किती दिवस, महिने नि वर्षंसुद्धां असेल—ओरडत जाई. रोज दुपारीं एक वाजतां ऐकूं येणारा तिचा कांहींसा कर्कश आवाज मला त्रासदायक वाटे. तसं म्हटलं तर भिकाऱ्याच्या कोडगेपणानें ती एका घराशीं घसा फुटेपर्यंत कधींच ओरडत नसे. काठी टेकीत टेकीत जातां जातां 'माय भाकर वाढा वं' हें तिचं ध्रुवपद चालूं असे. कुणी देईल तें घेऊन ती पुढें जाई. पण तिचं घमेलं अन्नानें भरलेलं असे. तिच्याजवळून जाताना तें भरलेलं पाहून माझ्या मनांत असाही विचार येई कीं ही एवढं अन्न गोळा करते ती बहुतेक भिकाऱ्यांची खाणावळ चालवीत असेल. या विचारानें मला त्या हळू हळू जाणाऱ्या म्हातारीची कधीं कींवही आली नाहीं आणि मी तिला कधीं अन्न वाढलेंही नाहीं. आजवर माझ्या नजरेनं तिच्याकडे पाहणंही टाळलं होतं. पण आज भीक न मागतां परमार्थाच्या गोष्टी सांगत असलेल्या त्या म्हातारीचं स्वरूप मला कांहीं निराळंच दिसलं. आणि मी तिच्याकडे पहात राहिलें. तिचे शब्द ऐकत राहिलें. ती गोरी होती. पण तिचं गोरेपण मळलेलं होतं. भिकाऱ्याला न साजेशी जाडजूड ती होती. पांढऱ्या पिंगट केसांची बट डोईवरच्या पदरांतून ती पुनः पुनः आंत सारीत होती. दंड घातलेल्या लुगड्याचे ओचे तिनें गुडघ्यापर्यंत वर बांधले होते. म्हातारपणीं चालून दुखत असलेल्या पोटऱ्या तिनें सुतळीनें बांधल्या होत्या. अंगांत कांहींशी नवी भासणारी मुंग्याच्या खणांची चोळी होती. देवानें आम्हाला सत्तर पंचाहत्तर वर्षं निवासाला दिलेलं घर पुन्या वस्तीनंतर पडायला झडायला आल्याचं अंगावरील खारकेसारख्या पडलेल्या चिरक्या सांगत होत्या. दांतवणानें काळ्या झालेल्या पण न पडलेल्या दांतांतून हंसूं फुटलें कीं तिच्या आयुष्यांत समाधान असल्यासारखं वाटे. आणि तिचं तें बोलणं? त्यानें मी थक्क झालें.

"आन् भाडाळाबाई म्हनली, 'अर कागानुरा (कावळ्या), मी एकली बाई मानूस अन् त्येत्तीस कोटी देवांना ज्येवाया घाल म्हनलंस तर मी आन्न कुठं शिजवूं, धान कुठून आनूं?' आन् भाडाळाबाई असं म्हनली तरी बी त्यो सुवनीचा कागासूर—"

"म्हंजी त्यो त्येत्तीस कोटी देवांनीं धाडला व्हता आन्न शोधाया, त्यो?" दुसऱ्या बाईनें विचारलं.

दी. ७

" हां. त्योच: त्यो सुदनीचा कागासूर द्येवांनीं धाडला व्हता त्यो भाडाळाबाईच इवापडं पघूनशानी माघारा फिरला. त्यनं द्येवांना सांगितलं कीं अमक्या अमक्या ठिकागाला वर्त (व्रत) करीत भाडाळाबाई येकली न्हाती अन् येकली आन्न शिजवून द्येवाचं नांव घ्येती. तिथं चला. मंग त्येत्तीस कोटी द्येव निघाले."

" ब्रिगि ब्रिगि निघालं असत्याल. मेघराजा रसून ग्येला. ना श्येत पिकलं ना आन्न ना पानी." दुसऱ्या बाईनें साथ केली.

" हां. धा धा करीत निघालं सार द्येव अन् हा गराडा घातला तिच्या इवापडीला. अन् म्हणत्यात कस, अग भाडाळाबाई, आमाला ज्येवाया वाढ. अन् मंग ती कशी म्हंती, मी येकली नार. तुमाला त्येत्तीस कोटी द्येवांना ज्येवाया कशी वाढूं ? मंग समद्या द्येवांनीं तिला आन घातली. तवां ती म्हनली, तुमी नदीवर आंघुळ कराया जा. मी सैपाक करत्ये. मग द्येव ग्येलं नदीवर. अन् भाडाळाबाईनं द्येवाम्होरं हात जोडलं, " द्येवा, आतां माझी अब्रू राख. अन् काय सांगूं म्हग्ये, भाडाळाबाईच्या इवापड्यात माईना येवढं आन्न द्येवानं आनून टाकलं! भाज्या म्हनू नगं, कोशिंबिरी म्हनूं नगं, भात, डिळव्या, लाडू ज्ये म्हनाल त्ये. डोंगरा डोंगरायेवढे ढीग—"

" द्येवच परसन्न झालाया मंग काय कमी व्हायचं !"

" मंग ? आन्नाचा घमघमाट सुटला. केशर येलदोड्याचा वास सुटला."

" माई गोट ऐकाया उभ्या हैती."

म्हातारीनें एकदां माझ्याकडे नजर टाकली आणि ती हंसून पुढें सांगूं लागली. माई आपल्या जगांत क्षणभरही रहाणार नाहींत ही तिची खात्री होती. माझं अस्तित्व विसरून ती पुन: रंगांत आली, "सुदर्नाचं कलश, सुवर्नाच्या झाऱ्या द्येवांम्होरं ठिवल्या भाडाळाबाईनं अन् हात जोडून म्हनली, " भाजन करा म्हाराज. गरीबाची भाकर. द्येव परसन्न झाले—"

म्हातारीच्या गोष्टींतले देव भाडळीच्या पंचपक्वान्नांनीं तृप्त झाले आणि अंधाऱ्या रात्रीं ताऱ्यांची लुकलुक प्रसन्न करते तसं त्या ओंगळवाण्या झिपऱ्या पसरलेल्या, काळे दांत पडलेल्या, धुळींत आरामांत निजून गोष्टी सांगणाऱ्या म्हातारीच्या रसवंतीनें माझं मन प्रसन्न झालं.

साऱ्या आज्या अशाच रसाळ गोष्टी सांगतात का ? त्या क्षणापर्यंत मला वाटे कीं दारिद्र्यांत, मालिन्यांत, अमंगलतेंत वाढणाऱ्या जीवांच्या सारा वेळ भुकेच्याच गोष्टी चालतात. इथें निराळंच कांहीं दिसत होतं. सकाळपासून भीक मागून भरलेलं घमेलं जीवनाचं पुरेपूर समाधानसं म्हातारीजवळ पडलं होतं आणि आतां निःशंकपणं धरित्रीच्या अंथरुणावर, हाताच्या उशीवर डोकं टेंकून, आकाशाची चादर पांघरून म्हातारी परमार्थाच्या गोष्टी करीत होती.

मी घरीं गेलें आणि विचार करीत राहिलें. कांहीं वेळानें ती म्हातारी उगींचच 'माय भाकर वाढा' करीत दारावरून चालली तेव्हां मी तिला कंपौंडांत बोलवून आणखी गोष्ट सांगायला लावलं. तिला निराळ्या जगाचा असा स्पर्श पाहिलाच असावा. तिनें गोष्ट सांगितली पण ती रंगली नाहीं. मी तिला दोन आणे दिले. ती माझ्याकडे पहातच राहिली. आज कांहीं तरी नवं नवं घडत आहे असं तिला वाटत असावं.

'भाकर वाढा माय' टणटणीत आवाज ऐकूं आला आणि मी एक पोळी नि भाजी हातांत घेऊन बाहेर गेलें.

• • •

" चंद्रा. आलीस ?"

" आल्ये माय." चंद्रा काठी टेंकीत जवळ आली. मी तिला पोळी वाढली आणि म्हटलं, " अग, आज मला तुझी गोष्ट ऐकायची आहे. आहे का तुला वेळ ?"

" हा माई. येळेला काय. मोप येळ हाये मला."

चंद्रानें भाकरीपोळी नि कालवणानं भरलेलं घमेलं खालीं ठेवून तीही खालीं पायरीजवळ बसली.

" कोणती सांगूं माय गोठ ?"

" कुठली हवी ती सांग."

" बळिराजाची सांगूं ?"

" हो. तीच सांग."

चंद्रा सुरवात करण्याआधीं उगींचच हंसली. " गोठ सांग. गोठ सांग. माईला गोठ लई आवडती."

" अन् गाणीं पण आवडतात. पण तूं तर म्हणत नाहींस."

" बरं का माई, येक रोज तुम्माला लई म्हनून दावीन. तरणी व्हत्ये तवां श्येत कापाया जायाची. भलरी भलरीचं गान म्हनायची. जात्यावरल्या वव्या म्हनत व्हत्ये. आतां येक शब्द बोलत्ये तो आवाज पिचाया लागतोय." एक प्रकारच्या लयींतच चंद्रा बोलत होती. मला हंसूं आलं. ती तर हंसतच होती. अखेरीस तिनें गोष्टीला आरंभ केला. लवकरच ती इतकी तन्मय झाली कीं तिचा टणटणीत आवाज आंवतीभोंवतींचीं चार घरं चिरून जात होता हेंही तिला भान उरलं नाहीं. तो तिचा आवाज निरनिराळ्या भावांची आळवण करीत असतां लवचिकपणें चढउतार करीत होता. ती बोलत होती तीच भाषा पण गोड लागत होती.



अधूनमधून ती असल संस्कृत शब्द वापरी. अधूनमधून अचकट-विचकट शब्द मोकळेपणानें वापरून ती गोष्टींतील दुष्टांचा दुष्टपणा ठसवीत होती. मध्येंच प्रौढ भाषेनें ती चांगल्या माणसांचा चांगुलपणा वठवीत होती. शंकरानें बळिराजाला नंदी दिला. कशाला तर शेत नांगरायला. पण त्या नंदीजवळ बळिराजा जाणार कसा? असला मस्त बैल तो! त्याला पकडायचा धीर बळिराजालाही होईना. शेताच्या मेरेला उभा असलेला मांग पुढें झाला. अन् छाती पुढें काढून म्हणाला, "मी धरतों नंदी पकडून." फूं फूं फुंफाटणाऱ्या त्या बैलाच्या मुसंड्यांना न जुमानतां मांगानें त्याला पकडून वेसण घातली तेव्हां त्याच्या पराक्रमाचं वर्णन करायला चंद्रानें कुठून शब्दांची संपत्ति आणली कोण जाणे! श्रीधर-मुक्तेश्वर तिच्यावर प्रसन्न असल्याचा मला भास झाला. मी स्तिमित होऊन ऐकत होतें. शेवटीं केविलवाण्या सुरांत चंद्रा म्हणाली, "झालं माय. नंदीच्या नाकाला येसण घातली आन् त्यो म्हनला, "अरं चंडाळा, माझं संमदं तूं घ्येतलंस. मला नागराला जुपाया मला × × क्येलंस तरी बी काई नाई. पन् माझ्या नाकामंदी येसण घालून माझं नाक विंधलस तर आतां तूं जलमभर विंधीत ऱ्हा. माझ्या नाकाला बांधलेल्या येसणीबिगर तुला धंदा ऱ्हाई ऱ्हायाचा. जलमभर दोरखंड करीत बस. तुला कंदी बी जय यायाचा न्हाई. तुकडं मोडीत दारोदार भीक मागत हिंडशील." अन् काय सांगू माय, तवांपून आमची जात दोरखांड वळूनशानी जगती. जलमदरिद्री झालों नवं! देवाचा कोप अन् शाप वोढवला तिथं कुनाचं काय चालणार माय?"

चंद्रानें कपाळाला हात लावून जातीचा असहायपणा व्यक्त केला. आपलीं दुःखं हीं आपल्याच करणींतून आहेत असं चंद्रा मानीत होती विचारी. मी कांहींशी हतबुद्ध होऊन तिच्याकडे पाहिलं. या भिकारणीच्या ठिकाणीं हें सामर्थ्य आलं कसं?

बळिराजाची गोष्ट ऐकल्यावर मी चंद्राला एक अधेली दिली. तिचं अंतःकरण कृतज्ञतेनं भरून आलं. चंद्राची नेहमीं मला एक गंमत वाटे. भिकाऱ्यांतलं असमाधान तिच्या शब्दांत कधीं दिसत नसे. एवढंसं दिलं तरी समाधान. पुष्कळ दिलं तर समाधान असेच असे. 'किती दिलं तरी अपुरं' असं तिनें नजरेंत वा शब्दांत कधीं दाखवलं नाहीं. ती एवढंच म्हणाली, "माय, मला लई गोष्ठी ये यातीं. लई सांगन मी."

"सांग. सांग. पण चंद्रा, मला मागें म्हणाची गोष्ट सांगितलीस ना, ती गोष्ट दुसरीकडे सांगायला येशील का?"

"हां. आन् काय झालं न सांगाया."

"बरं मग मी तुला पंधरा दिवसांनीं घेऊन जाईन. तेव्हां तूं गोष्ट सांग तिथें म्हणजे तुला दहा रुपये मिळतील."

"दहा रुपय?" चंद्रा स्वतःशींच म्हणत होती आणि माझ्याकडे पाहून कांहींशा अविश्वासानें हंसत होती.

"अग खरंच देणार आहेत दहा रुपये. एका गोष्टीला. मग येशील ना?"

"हां हां." अजूनही ती माझा चेहरा न्याहाळीतच होती. तिच्या होकारानें मला किती आनंद झाला! विश्वास अविश्वासाच्या हेलकाव्यांतही तिला माझ्याबद्दल आज अधिक जवळीक वाटली असावी.

"अन बाबा शाळंला गेला नवं?"

"हो. गेला."



चंद्रानें माझ्या घरांतल्या माणसांची आपुलकीनें चवकशी केली. भरपूर आशीर्वाद दिले आणि ती उठली.

"चंद्रा, उद्यां जाशील दारावरून तेव्हां मला हांक मार हं." पुढील पंधरा दिवस चंद्राची नि माझी गांठ पडणं हें मला अतिशय गरजेचं होतं.

दुसऱ्या दिवशीं चंद्रा आली, तेव्हां तिचं माझं नेहमींचं बोलणं झालं. पण तिनें आतुरतेनें विचारलं,

"माय, कुणाम्होरं गोठ सांगाया जायाचं ?"

"रेडिओवर, स्टेशनजवळ जायचं."

तिला त्या शब्दाचा अर्थ कळला नाहीं. पण स्टेशनजवळ जायचं, दोन तीन मैल दूर जायचं, एवढं कळलं. तिथें गोष्ट सांगितली म्हणजे दहा रुपये मिळतील एवढं कळलं. पण सारीच गंधर्वनगरी. कल्पनेंतही न कल्पितां येण्याजोगी. तिला तेथें नेण्यासाठीं आमच्यांत उत्पन्न झालेलं बंधन चतकोर नाहींतर नितकोर भाकरीनें मी दृढ करीत होतें.

जेवणं झालीं कीं चंद्राची हांक ऐकूं येईल अशा भरवंशावर मी होतें. काल तिच्या चेहऱ्यावरचं समाधान पाहून ती आज निश्चित येईल असं मला वाटत होतं. पण काय झालं कोण जाणे! चंद्रा आली नाहीं. एक-दोन-पांच-सहा दिवस ती फिरकलीच नाहीं! माझं मन चावळलं. रेडिओच्या लोकांना मी तिला आणतेंच म्हणून सांगितलं होतं. आतां ही आली नाहीं तर? तर विशेष काय होणार होतं म्हणा? कुणी तरी 'आर्टिस्ट' तिचा बनाव करायला तयार होती. पण तें पेलणारं नव्हतं. चंद्रा आल्यानें माझं नाटक जिवंत वठेलसं मला वाटत होतं. चंद्राला दहा रुपये मिळवून द्यायलाही माझं मन अधीर होतं. रोज दुपारचा एक वाजला कीं मी चंद्राचा आवाज ऐकूं येईल म्हणून तीन वाजेपर्यंत वाट पाही. पण छेः. ही गेली कुठें? राहते कुठें? हिला दहा रुपयांचाही मोह नाहीं? मी विचार करीत पडलें, तों चंद्राचा आवाज ऐकूं आला. भास आणि लगेच दूसरा वाटला. टणठणीत उच्चारलेले शब्द ऐकूं आले,

"माईला म्हनावं चंद्रा गांवाला जानार. ती परत यायाची न्हाई. आन् गोठ बी सांगाया येनार न्हाई. त्यान्ला म्हनावं चंद्राची वाट पाहूं नगा."

चंद्रा कुणाला सांगत होती कोण जाणे? बाहेर तर कुणी नव्हतं. आवाजामागोमाग मी चटकन् बाहेर गेलें. पाहिलं तो चंद्रा नुसती माझ्या घराच्या भिंतींना नि बाहेर डोकावणाऱ्या झाडांना निरोप सांगून लगबगीनें जात होती! मला आश्चर्य वाटलं.

"चंद्रा! ए चंद्रा—" मी हांक मारली.

मागें वळूनही न पाहतां ती पुढें जात जात मोठ्यानें म्हणाली, "जात्यें माय. मी येनार न्हाई. गांवाकडं जायाचं हाये."

माझ्या मनांत शंका आली. मी लगेच चपला घालून कांहींशा अंतरावरून तिच्या मागोमाग चाललें. तिला विचारील कल्पनाही नव्हती. आतां तिचा वेगही कमी झाला होता. ती भीकही मागत नव्हती. काठी टेकीत भिकेचं घमेलं घेऊन खालीं मान घालून चालली होती. रस्ता निर्मनुष्य झाला. वस्ती संपली. नदीकडे एक पायरस्ता जात होता. त्या रस्त्याला चंद्रा वळली. तेथून जवळच एक झोंपडी दिसत होती. तेंच तिचं झोपडं. मी माघारीं आलें. अविश्वासाची लोखंडी भिंत उभी राहिल्याची मला शंका आली.

मी घरीं आलें. माझ्या भाच्याजवळ तिचा अविश्वास बोलून दाखवतांना मला वाईट वाटत होतं. "सदा, तूं जातोस का तिच्याकडे? तिची समजूत काढतोस?"

सदा अगदीं एका पायावर तयार होता. तो लगेच गेला आणि कांहीं वेळानें आनंदांतच माघारा आला.

"काय रे?"

"साम दाम सगळे उपाय योजले."

"म्हणजे? केलंस तरी काय?"

"अहो, ती म्हातारी जी तोंड फिरवून 'डोचकं दुखतंय' म्हणून भिंतीजवळ निजली होती, ती बाहेर यायलाच तयार होईना. तिच्या सुनेनं तर सांगितलं, म्हातारी घरांतच नाहीं. अन् मला तर दिसत होती. मग जरा गोडीनें सुनेलाच समजावून सांगितलं. तेव्हां सुनेनंच म्हातारीला सांगितलं. अन् म्हातारी कबूल झाली. मग मात्र मी म्हटलं, हें पहा, खरोखर येणार असला तर 'येईन' म्हणून म्हणा. नाहींतर आतांच 'नाहीं' म्हणून सांगा. तेव्हां म्हातारीनें गळ्याची आण खाऊन 'येते' म्हणून म्हटलं."

आतां हाही बनावच कीं काय एवढा प्रश्न राहिला. दुसऱ्या दिवशीं दहा वाजतांच चंद्रा आली.

"माय, कवां जायाचं?"

"परवां. येशील ना?" मी तिच्या चेहऱ्याचा शोध घेत विचारलं.

"यीन." म्हणून ती जायला निघाली. तेव्हां मी म्हटलं,

"येईन येईन म्हणून माझा खोळंबा करूं नको. तुलाच दहा रुपये

मिळावे म्हणून मुलगा पाठवला तुझ्या दाराशीं."

"न्हाई मोई, यीन मी. गळ्याची आन यीन."

चंद्रांचा चेहरा जणुं फांसावर चावला काढलेल्या माणसाचासा मला दिसला. तिला भीति तरी कसली वाटत होती? मला कल्पना येईना. अखेरीस मी तिला म्हटलं, "चंद्रा, तुला माझ्याबरोबर एकटीला यायचं नसलं तर तुझा नातू आणि नातसूनही आण. मी सगळ्यांचं भाडं भरीन. मग तर झालं?" चंद्रा माझ्याकडे पहातच राहिली. तिच्या चेहऱ्याचा शोध मी घेत होतें. अखेर तिनें मला पुनः विचारलं,

"कवां जायचं?"

"परवां. दुपारीं दोन वाजतां. नंतर पुनः दुसऱ्या दिवशीं तीन वाजतां जायचं. पुनः रात्रीं."

"आन् तिथं कवर बसायचं?"

"दोन तास मोडतील तुझे."

"मी येत्ये उद्यां." माझ्या चेहऱ्याकडे ती अजूनही पहातच होती.

"एकटी येऊं नको. त्या दोघांना आण."

आतां चंद्राला दोन वाजले हें कसं कळणार ही आणखी एक काळजी मला होती. त्या दिवशीं दोन वाजून गेले तरी ती आली नाहींच. शेवटीं चडफडत निराशेनें मी निघालें तों वाटेंतच म्हातारी काठी टेकीत सुनेला पुढें घालून येत होती. मला पहातांच ती सुनेला म्हणाली, "पघ, चांगल्या लक्ष्मीवानी दिसत्याती बाईसाब." तुम्हांला वाटतं तशा 'मामस्या' पैकीं त्या नव्हंत असाच ध्वनि तिच्या शब्दांत होता. सून शंकेनेंच पण निःशब्दपणें माझ्याकडे पहात माझ्यामागें चालली. चंद्राची सून काळी पण नीटनेटकी, वेणीफणी केलेली, कोरं लुगडं–रेडिओवर जायचं म्हणून–नेसली होती. चंद्राही नीटनेटकी वेणीफणी करून अखंड धुवट लुगडं नेसून आली होती. आज सकाळीं महिन्यानंतर हंडाभर पाण्यानें आंघोळही केल्याचं तिनें बोलून दाखवलं. थोड्या वेळानें दोघीही माझी स्तुति करायला लागल्या. लांडग्याची कोंकरानें स्तुति करावी तशी. त्यावरूनच त्यांनीं कसला तरी धसका घेतल्यासारखं मला दिसलं. पण काय तें कळेना. रस्ता ओलांडतांना म्हातारीचा हात धरून मी तिला पलिकडे नेलं. आम्ही बसमध्यें बसलों. तेथें त्या दोघी माझ्याकडे डोळे लावून बसल्या होत्या. पण त्यांच्या चेहऱ्यावर अक्षरशः प्रेतकळा दिसली. मला कसंसंच वाटलं. तिचा विश्वास संपादन करायला माझं मन तळमळत होतं.

बसमधून उतरून आम्ही रेडिओ–स्टेशनवर गेलों. वेटिंगरूममध्यें गड्यानें आम्हांला नेलं. तिथें चंद्राचे कांहीं जातभाई आधींच येऊन बसले होते. त्यांना पाहून मला बरं वाटलं. कारण त्यांचाही आस्यापास्या बरेच दिवस चाललाच होता. चंद्रा, तिची सून एका कोचावर बसल्या. आतां मात्र त्यांच्या चेहऱ्यावरचं चिंतेचं जाळं पार उडालं. चंद्रा त्या कोचाचं स्पर्शसुख अक्षरशः जाणीवेनं भोगीत होती. आतां ती भिकारी नव्हती नि दुसरे मातबर नव्हते. सगळे सारखे.

"का हो, आलीं तुमचीं सगळीं माणसं?" एका अधिकाऱ्यांनीं विचारलं.

"आलीं. आलीं." मी म्हटलं.

"याच आजीबाई वाटतं? चला आजीबाई." त्यांनीं चंद्राच्या पाठीवर हात ठेवून चंद्राला हळू हळू चालवलं. चंद्रा खूष होती. तिच्या म्हातारपणचं असं कौतुक नि असल्या माणसांकडून? तिचे डोळे ओलावले

होते. ती त्या अधिकाऱ्यांशींही मोकळेपणानें 'आजी' सारखी बोलत होती. "माजा नातू तुमच्यायेवढाच हाये."

"असं का ?"

आम्ही तालमीसाठीं एका खोलींत गेलों. तेथेंही सगळीं खुर्च्यांवर बसलीं. सारीं सारखीं. तालमी संपल्या. चंद्राच्या सहज आणि जिवंत गोष्टीवर सारींच खूष झालीं. "आजी, चांगली सांगतां हं गोष्ट." पुनः एक अधिकारी तिच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले. सगळ्यांनीं चहा बरोबरच घेतला. तो कप, ती बशी, ती जागा, तिला न स्पर्श करणाऱ्या जगानें जाणून बुजून, कांहींशा औदार्यानें तिला स्पर्श केला होता. माणसामाणसांना एकमेकांपासून दुरावणाऱ्या लोखंडी भिंती जणुं पार वितळून गेल्या होत्या. आजवर बाहेरूनही धड न पाहिलेल्या मोठ्या इमल्यांत, सुंदर बिछायतीवरून चालत जाऊन आणि इतरांबरोबर खुर्चीवर बसून तिनें गोष्ट सांगितली होती. तें सारं स्वप्नाचं जग साकार होऊन त्यांत ती वावरत होती. आनंदली होती. अखेरीस खुद खुद हंसून सर्वांदेखत भोळ्या भावानें म्हातारी म्हणाली, "माय, माझा नातू कसं म्हनला, जा तूं धा रुपय मिळवाया. म्हंजी बाई तुला ठेसनावर निऊनशानी गाडींत कोंबून पोलिसाबरबर भिकाऱ्यांच्या क्यांपांत टाकतील. मग जल्मभर बस क्यांपाची हवा खात. कोऽऽ नी धा रुपय न्हाई द्याया बसलं. ती बाई का तुझी सगी सोयरी हाये धा रुपय द्याया ?"

सांगतां सांगतां तिला हंसू आवरेना. आम्हांलाही हंसूं आलें. माझ्या डोक्यांत आतां लख्ख प्रकाश पडला. चंद्रानं तें भिंतींनाच निरोप सांगून लगबगीनं जाणं, बनवाबनवी करणं, तिच्या चेहऱ्यावरची ती भेसूरता, सारं कोडं मला उलगडलं. आम्ही घरीं यायला निघालों तेव्हां तिच्याशीं बोलणाऱ्या अधिकाऱ्यांच्या तोंडावरून हात फिरवून म्हातारीनें कानशिलावर बोटं मोडलीं. त्यांनींही तिला बाहेरपर्यंत धरून पोहोंचवलं.

"कसा सोन्यासारखा हायेस रे बाबा. उद्यां यीन बरं." प्रेमळपणें भरल्या आवाजांत चंद्रा म्हणाली. तिनें डोळे पुसले.

बसमधून आम्हीं पुनः माघारीं आलों, तेव्हां वाटेंत म्हातारी माझं कौतुक करीत होती तें किती मनापासून होतं ! जाते वेळच्या तिच्या शब्दांतील कृत्रिमता आठवून तो फरक मला लगेंच जाणवला. तिचा विश्वास संपादन करतां आला हें मला केवढं समाधान वाटत होतं.



चंद्रा बसमधून उतरल्यावर म्हणाली, "माय, कशी लक्षुमी तूं. तुझ्या पायां पडावं वाटतंय. माझं अन् तुझं अन् सुनेचं समद्यांचं पैसं दिलंस. जातांचं दिलंस, येतांचं दिलंस. तरी मी नातवाला म्हनलं, अरं हिरवळ हिरवळ दिसली म्हून संभदीकडं इच्चू डसल्यात असं न्हाई व्हत. तर मला खोडून काढीत व्हता."

आतां आजचा अखेरीचा दिवस होता. दोन वाजतां जायचं होतं तर चंद्राच्या नऊ वाजल्यापासून पांच खेपा माझ्या दाराशीं झाल्या. पंचाहत्तर वर्षांच्या चंद्राचा उत्साह चाळिशीच्या माणसाचा होता. अखेरीस आम्ही रेडिओवर गेलों. आज सून आणण्याचीही तिला गरज वाटली नाहीं याचंच मला समाधान होतं.

पुनः सारं कालच्यासारखंच सगळं. पण आज चंद्राचा आत्मविश्वास वाढला होता. तालमींच्या वेळीं तिच्याइतकी भाषेची नि भावनांची सहजता तिच्या जातभाईंना कांहीं व्यक्त करतां येत नव्हती. अधिकारी त्यांना पुनः पुनः सहजपणें बोला म्हणून म्हणत होते. त्यांच्यासाठीं सहा वेळां तालमी झाल्या. तें मात्र चंद्राला कळेना. काल तिनें एकदांच गोष्ट सांगितली. दुसऱ्याच तालमीला ती चिडल्यासारखी झाली. नाटकांतलं पात्र म्हणालं, "हं, आजीबाई, सांगा पाहूं ती गोष्ट." तेव्हां ती चिडून आपल्या जातभाईला म्हणाली, "अरं असा रं कसा अनाडी तूं. येकदां सांगितली तर समजत न्हाई व्हय ? म्हनं पुना सांग. अरं ल्हान प्वारांनी मजेतं येकदां सांगूनशानी."

मग चंद्राची समजूत घालावी लागली. पुनः पुनः तेंच. ती थकली. तिचा उत्साह मावळायला लागला. गोष्ट सांगतांना विसरायला लागली. भलतंच बोलायला लागली. तिच्या म्हातारपणानें आतां तिचा सर्वस्वीं कबजा घेतला. आमच्या नाटकांतील 'हिरॉइन' ची अशी अवस्था झाल्यावर आमचे हातपाय गळूं लागले. तिला आपले जातभाई फारच अडाणी वाटत होते. ती सारखी म्हणे, "अरं साग जलम ग्येला तुमच्या मायची बोली बोलतांना अन् आतां तुमची बोली बी इसरलाय ? लई शिकल्याल्ये हात जनुं ? म्हना." म्हणून त्यांच्या नकला ती सहजसुंदरपणें म्हणून दाखवूं लागली. आतां विश्रांतीची गरज होती. तासभर विश्रांति. पुनः चहा. चहा घेतांना अधिकाऱ्यांनीं म्हातारीचं खूप कौतुक केलं. "आजीबाई, आतां बोलायचं तें शेवटचं बरं का. आतां पुनः नाहीं बोलायचं मग. पण आतां दुसरं कांहीं बोलायचं नाहीं. तुमच्यासमोर यंत्र ठेवूं. त्यांतून आतां दूर दूर ऐकूं जाईल तुमची गोष्ट. दुसरं कांहीं बोललां तर तेंही ऐकूं जाईल. मग लोक हंसतील. नांवं ठेवतील. तेव्हां गोष्ट तेवढी सांगा हं."

चहानें तरतरी आली. म्हातारीच्या जिवांत जीव आला. आतां होता नव्हता तेवढा उत्साह गोळा करून तिनें आपल्या गोष्टींत जरा जास्तच जीव भरला. काम संपलं. सगळ्यांनीं सुटकेचे निःश्वास टाकले. चंद्राला शाबासकीच नव्हे तर पुनः रेडिओवर गोष्ट सांगण्याचं निमंत्रणही मिळालं. चंद्राला खूपच आनंद झाला. आतां सह्या करून नाहींतर अंगठे उठवून चेक घ्यायचे होते. चंद्राला चेकचं काय कळणार ? मी तिला दहा रुपये काढून दिले व बदली तिचा चेक घेतला. त्या दहाच्या नोटेकडे ती पुनः पुनः पाही. शेवटीं तिनें आपल्या कमरेच्या कश्यांत ती ठेवून दिली.

रात्रीची साडेदहाची वेळ. मोटारींत बसून आम्ही निघालों. म्हातारी मध्येंच विचारी, "ही पेठ कोणती ?"

"ही ×× पेठ."

"आं ? अन् पानाला चुना नाई लावाया फुरसत तर इकल्यामंदी ××

अनुक्रमणिका




प्राचीन भारतीय शिल्पकलेचा
हा एक नमुना.
हजारों वर्षे गेलीं—
वारे, वादळें आणि
इतिहासांतल्या उलथापालथींचे
झंझावत.......
साऱ्यांतून हें सौंदर्य
असें टिकलें आहे.
सर्व प्रकारच्या सौंदर्याच्या
टिकाऊ प्रतिमांसाठीं,
एक आणि अनेकरंगी
उत्कृष्ट ब्लॉक्ससाठीं

# प्रेस प्रोसेस स्टुडिओ

टे. नं. ७६९८०

**व्हिक्टोरीया मिल्स कम्पाउंड, गांवदेवी, मुंबई ७.**

अनुक्रमणिका

पेठ!" ती आपल्या मनाशींच आश्चर्यें मोकळेपणानें बोलत होती. बिचारी बसमध्यें सुद्धां कधीं बसली नव्हती मग मऊ सीटच्या मोटारींत कुठून बसणार? इतरांचीं घरं त्यांच्या वस्तींत होती. ती वस्ती चंद्राच्याही परिचयाची होती. अवघ्या पांचच मिनिटांत गाडी तिथें थांबली. तिचे जातभाई उतरूं लागले. तेव्हांही म्हातारी म्हणाली, "गुर्रर फुर्रर अन् आली वस्ती!"

पांचच मिनिटांत तिचंही घर आलं यावर तर तिचा विश्वासच बसेना.

"माय, चुकली तर न्हाईस? इकत्यामंदी कसं माय घर यील माझं?"

"नाहीं ग चंद्रा, चुकलों नाहीं. मोटारीनं लवकर येतं माणूस. हें आंब्याचं झाड नाहीं का? इथून पायवाट जा[illegible]ाहीं का तुझ्या झोपडीला?"

"आंब्याचं झाड बी आलं?" चंद्रा आश्चर्यानें तुटक तुटक बोलत हंसत उतरली. 'येशा, ए येशा' म्हणून टणटणीत आवाजांत तिनें नातवाला हांक मारली. तोही म्हातारीच्या वाटेकडे डोळे लावून होता. तो तीरासारखा अंधारांतून धांवत आला आणि त्यानें म्हातारीला हात धरून अंधारांतून नेलें. मी अक्षरशः 'सुटलें' म्हणून मागें मान टाकली.

• •

'माय! माय!' दुसऱ्या दिवशीं चंद्राची हांक ऐकूं आली. एका नाटकांत काम करणारांमध्यें तात्पुरता पण खोल रुजलेला घरोबा अ[illegible]ास होतो तसा घरोबा आमच्यांत झाला होता! आज तर चंद्रा 'भाकर [illegible]' सुद्धां म्हणाली नाहीं. ती आली ती खुदखुद हंसत. स्वतःशींच हंसत.

"माय! काय करावं, आज रस्त्या रस्त्याला भाकर मागाया गेल्यें तितं तितं इचारत्याती, "काय ग म्हाताऱ्ये, काल तूंच तर नाई गोठ सांगितलीस?" आतां काय सांगावं माय? मी म्हनल्ये, "हो, मीच. ती पिवळ्या घरांतली माय हाए ना तिनं न्येलं मला. माय, तुजं नांव बी म्हाईत हाए त्यांना. मला न्हाई ठाव."

चंद्राचं आज नेहमींच्या रटाळ जीवनांतल्या त्याच त्या गोष्टीकडे लक्ष नव्हतं. भाकरी मागण्याकडेही लक्ष नव्हतं. आज जणुं भाकरी आपोआप तिच्या घमेलांत पडल्यासारखी तिला वाटत होती. तिला डावलणारं, तिच्याकडे उदासीनपणें पहाणारं, तिच्याशीं शब्दांचंही नातं जोडायला नाखूष असलेलं जग—त्या जगाचा चेहरामोहरा आज पार पालटला होता. त्याचंच तिला नवल वाटत असावं. पंख लावून माणसाचे जमिनीपासून पाय सुटावे तसं सगळं नवलाचं तिला वाटत होतं. ती स्वप्नांत वावरत होती.

"माय, आन् मी किती येडी! मला वाटलं आतां मला ही बाई कुटं नील! काय करंल! माय, आतां वाटतं घरला जाऊंच न्हाई. हितंच बसावं तुज्या दाराम्होरं. कशी माजी माय! माजं सो[illegible]आनं-सुनंचं सा आनं दिलं. मोटारींत बशिवलं. फुर्रदिशीं आलगाद आनलं. सारी रातभर झ्वाप बी नाई येत. खरंच वाटत नाई. डोक्यामंदी इरभळ ह्येच चाललंय."

"बरं पण नातवाला दहा रुपये दाखवलेस का?"

चंद्रा जरा पुढें सरकून मला विश्वासांत घेतल्यासारखं म्हणाली, "माय, मी त्याला म्हनलं, चोक चोक काय म्हनत व्हते त्यो माईकडं हाय. ती मोडील तवा धा रुपय दील."

बोलतां बोलतां तिनं दहा रुपयांची नोट काढून मला दाखवली. "मोडाया गेल्ये तर म्हनतील ही त्वां चोरुनशानी आनलीस. मोडाया बी धीर व्हत नाई."

" नको मा्इं. तुझ्याजवळ ठेव. लुगडं घे आतां. अं ? खग चे. "

चंद्रा हंसली. " लुगडं ? लुगडं कसलं माय. मसणांत जायला निघाल्ये आतां तर या देहाला शाकारनी कशाला. असंच ग्रेतं कुनी बी."

" मग काय करणार त्या नोटेचं ? "

" माय, नातवंडं हैती. प्यारींचीं प्यारं हैती. 'आजी' 'आजी' करींत येत्याल. त्यांना खायाला दीन. नातसुनंला बांगडी भरीन. "

चंद्रांतली 'प्रेमळ आजी' पाहून मला गहिंवरून आलं. पुनः चंद्रा आली तेव्हां ती पांच वर्षांच्या आपल्या नातवाला घेऊन आली. दुरून रस्त्यावरूनच पायरीवर बसलेल्या माझ्याकडे बोट दाखवून ती म्हणाली, " याच वरं माई. " त्या लहानग्या पोरानं चटकन् म्हटलं, " बाई, आजीला धा रुपय दिलं. मला कुडतं नि चड्डी द्या कीं. "

चंद्राला राग आला. ती त्याला दाटून म्हणाली, " ये दोडा, लगीच तोंड वाजवतंय. तुला बी माईनींच द्यायाचं व्हय ? तुला माईला दावाया आनलं तर हात पसरतंय. "

चंद्रा भिकारीण खरी. पण तिच्यांत मोठा मजेचा खानदानीपणा होता. तरुणपणीं स्वतःच्या शेतांत राबणारी, धान्य पिकवणारी, गुरं वळणारी, दूध काढणारी, चार माणसांना संभाळून खेड्यांत राहणारी चंद्रा ही मुळांत भिकारीण नव्हतीच. पण म्हातारपणींही निरुद्योगी म्हणून भीक मागतांना तिचं मनाचं मोठेपण टिकल्यासारखं पदोपदीं दिसे. काठी टेंकीत वमेलंभर भाकरी गोळा करून ती अजून तिच्या वाटेकडे डोळे लावणाऱ्या नातवंडा-पणत्वंडांना देई. सुनालेकांना देई. ती अजून कुणावर अवलंबून नव्हती.

" अग असूं दे. " म्हणून मी फाटके कपडे मुलाला दिले. आणि एक फाटकं गरम अंगातलं चंद्राला दिलं. चंद्राचे ते आठ दिवस नवलाचे गेले. तिची अजून कितीक लोक विचारपूस करीत होते. कारण तिच्या ठणठणीत आवाजाचं साम्य कित्येकांच्या चटकन् लक्षांत आलं होतं. एका म्हाताऱ्यानें तर तिला संध्याकाळीं जेवायला बोलावून एका पत्रावळीवर जेवण दिलं. तिच्याकडून गोष्टी सांगून घेतल्या. तो निराळ्या जगांतील ओळखीचा बुडबुडा अजूनही फुगत होता आणि अजूनही म्हातारी त्या बुडबुड्याच्या जगांत रंगून राहिली होती.

" माय, मी इकत्या मोट्यानं बोलत व्हत्ये ? "

" म्हणजे काय ? "

" अंव आपुन ठेशनाजवळच्या त्या इमल्यांत बोलत व्हतों. आन् हिथं घराघरांत माणसं म्हनत्याती, " हा या म्हातारीचा अवाज. हीच बोलत व्हती. " माय, मी लई वरडत व्हत्ये ? "

" नाहीं. "

" मग हितं कसं ऐकाया आलं ? " गेले आठ दिवस चंद्राला हें गूढ पडलं होतं. इतक्या लोकांना रातोरात कळलं कसं ?

" अग तें यंत्र होतं ना आपल्यापुढें ? त्या यंत्राशीं बोललं कीं तें सगळीकडे सातासमुद्राच्याही पलीकडे नेतं आपला आवाज. "

" अन् मंग हडपसरला ? तिथं बी न्हेला असंल ? "

तिचं हडपसर सातासमुद्रापलीकडे होतं ! जवळच रेडिओवर भाषणें ऐकूं येत होतीं. मी म्हटलं, " हें ऐकते आहेस ना. तीं माणसं आपण काल बोलत होतों तिथेंच बोलताहेत. "

" तिथं बोलत्याती ? अन् संमदं हितं ऐकाया येतंय ! "

तिनें रेडिओ पाहिलाही नव्हता. कुठून आवाज येतो कुणास ठाऊक ! रेडिओची आरडाओरडा भीक मागतांना तिच्या कानावर आली का नव्हती ? पण तिला घरांतच कुणी बोलत असेल असंच वाटत असावं. सुधारलेल्या शहरांत काँक्रीटच्या रस्त्यानें सुधारलेल्या माणसांच्या वस्तींतील इमल्यांजवळून हिंडत असलेल्या चंद्राच्या मनापासून नि अंतःकरणापासून सारी सुधारणा कियेक योजनं दूर होती. तिची पडकी मोडकी झोपडी— दूर, निर्मनुष्य ठिकाणीं, नदीच्या कांठालीं ओल्या चिंब जमिनीची, वांबूपत्र्यापोत्याच्या भिंतीछपरांची, वारा घोंगावत असलेली अशीच होती. जशी पांचशें वर्षांपूर्वी तिच्यासारख्या वेशीवर राहणाऱ्या, ओवाळून टाकलेल्या अडाणी गरिबाची असती तशीच आजही ती होती. चंद्राच्या आश्चर्यानें मला वेदना होत होती. ही सारी स्वप्नसृष्टि खलास होणार, हा फुगून नाना रंगांनीं तिला रंजवीत राहिलेला बुडबुडा फुटणार हें मला दिसत होतं.

एक दिवस डोळ्याला पाणी आणून ती म्हणाली, " माई, त्ये धा रुपय काग्द्यासारखं सलत व्हतं. दे पैसा, दे पैसा, पार संमदं घेतलं तवा धा धा थांबली संमद्याची. तरी नातू म्हनत्यो कसा. अजून दडवलं असशिल. ती धाची नोट आल्यापून भिकेची भाकर बी सुखानं खाऊं देत न्हाईत. "

मला वाईट वाटलं. पण आतां ती भावनाही चुरडून टाकण्याखेरीज








अनुक्रमणिका

गति नव्हती. मैला रोज तिच्याशीं बोलायला वेळही नव्हता. आणि लव-करच, मी घरांत असलें तरी तिच्या हांकेला 'ओ' देत नाहींशी झालें.

बरेच दिवस गेले. 'माय! मी हितच बसते आतां' म्हणून पुढील पायरीवर ती बसल्याची मला जाणीव झाली. पण मी उठलें नाहीं. तिनें दोनतीनदां हांक मारली. मी मागील दारीं असेन या समजुतीनें बिचारी मागील दारीं घराला वळसा घालून गेली आणि मागील दाराची एक पायरी चढली. तिला त्यांत कांहीं गैर वाटलं नाहीं. रेडिओच्या ऑफिसांतील समतेच्या नि कौतुकाच्या स्पर्शाची तिला पुनः भूक लागली होती. आणि केवळ तेवढ्यासाठीं तिनें पुढें पाऊल टाकलं तोंच माझी मोलकरीण तिच्या मागोमाग आली आणि ओरडली, "ए बया, त्यांत कुटं चाललीस? आन् हितं मागल्या दारान ग कशाला आलीस? जा पुढल्या अंगाला. तिथं न्हाई भीक मागतां येत?"

"न्हाई बाई. मी भीक मागाया न्हाई आल्यें—माझ्या माईकडं आल्ये व्हत्ये. लई दिसांत दिसली नाई माझी माय."

"मग? का घरांत शिरतेस का माई माई करुन? वा ग!"

मी सारं ऐकत होतें पण मी बाहेर आलें नाहीं आणि बोललेंही नाहीं. चंद्रानें पुन्हां घराच्या डाव्या कुशीवरून 'माय!' म्हणून हांक मारली. प्रेमळपणें. श्रद्धेनें. विश्वासानें. आणि हें कधीं तरी तुटणारच—तोडावच लागणार म्हणून निर्दयतेनें मी गप्प राहिलें. माझा जीव तुटत होता. तरीहि मी तो बुडबुडा फोडला. निराशेनें चंद्रा हळू हळू बाहेर गेली. रस्त्याला लागलेली मी पाहिली. आणि शून्य मनानें मी बसून राहिलें.

पुनः कितीक दिवस गेले. चंद्रा मुकाट्यानेंच चालली होती. आज मी पुढच्या पायरीवरच बसलें होतें. चंद्राची नजर गेली. तिचा चेहरा बदलला. ती कंपौंडांत येऊन खालच्या पायरीवर बसली.

"माय, मला सजा झाली म्हनत्यात."

"सजा? कां ग?"

तिनें चोळींतून एक कागद काढला आणि माझ्यापुढें करीत म्हणाली, "पंधरा दीस झाले. ह्या सरकारी कागद आला. मी तुज्याकडे आल्यें तर मोलकरीण डाफरली. मग गेल्ये. पुना आल्ये. तूं दिसली न्हाईस. मंग यो कागद आमच्या नातवानं दाखिवला आमच्या लोकांत. तर संमदी म्हनत्यात सजा व्हनार हाय. कोडतांत बोलावलंय म्हातारीला म्हून. माई, मी का चोरी केली का काय केलं म्हून कोडतांत जायाचं?" चंद्रा रडायला लागली.

मी तो कागद उघडून पाहिला. "हा कागद पंधरा दिवसांपूर्वी आला?"

"हां."

हो. पंधराच दिवसांपूर्वी गंगू चंद्राला ती मागील दारीं आली म्हणून रागावत होती.

"तूं मागल्या दारानं आली होतीस तेव्हां हाच का कागद घेऊन आली होतीस?"

"व्हां माई; आतां तुज्याबिगार कुनाला दावाया जाऊं म्हून आल्यें व्हत्यें."

"अग तुला कोर्टांत नव्हतं बोलावलं. रेडिओवर बोलावलं होतं गोष्ट सांगायला. त्या दिवशीं नव्हते का ते साहेब म्हणाले?"

"खरं?" म्हातारीला किती आनंद झाला.

"तूं कुणाला दाखवलास हा कागद?" मी विचारलें.

"रस्ते झाडणारी बायांवरल्या मुकादमाला. त्यो मान हलवी अन् म्हनं, हे कसं? हे कसं? अन् मंग म्हनला कोडतांत जावं लागलं."

मी कपाळाला हात लावला.

"मंग आपुन कवां जायाचं?" पुनः तिनें विचारलं.

"आतां काय उपयोग? तारीख निघून गेली."

"मंग आतांच ग्येलें तर? तूं सांग त्याला. मी जातां येतांचं पैसे दीन."

मला शरम वाटली. मी म्हटलें,

"तिथें लिहिलेल्या तारखेलाच जावं लागतं चंद्रा."

"मंग आतां गोठ न्हाई सांगायची?"

"नाहीं."

"आन् आतां धा रुपय ग्येलं?" तिनें खोल आवाजांत विचारलं. मला अपराध्याहून अपराधी वाटूं लागलं. आलें असतें घराबाहेर त्या दिवशीं, तर काय एवढं घरांत काम खोळंबलं होतं माझं? पण मी बेंडर आवाजांत चंद्राला म्हटलं, "होय."

दहा रुपयांच्या नोटेकडे लक्ष लावून दिवस नि दिवस "माय आतां पुना कधीं जायाचं आपन" म्हणून विचारीत राहिलेल्या चंद्राच्या आतांच्या खोल आवाजानें नि पडलेल्या चेहऱ्यानें माझं अंतःकरण [illegible] झालं. त्या कधीं न पाहिलेल्या दहा रुपयांच्या नोटेच्या विश्वांत येतांच चंद्रानें अविश्वास दाखवला तेव्हां धडपडून मी तिला त्या जगांत ओढून नेलें आणि पुनः तें जग तिला जवळ करीत होतं तेव्हां तिच्या पाठीशीं न राहतां तिला हात न देतां मीच तिला त्याच्यापासून तोडून टाकलं. आतां पुनः तिला उन्मेषानें कोण नेणार होतं? माझ्या प्रतिष्ठेच्या नि स्वास्थ्याच्या विश्वांत चंद्राची मला अडचण भासायला लागली तेव्हां चंद्रानें माझ्या पायाशीं आणलेली विश्वासाची, श्रद्धेची, प्रेमाची घागर मी सहज ठोकरून दिली. माझ्यासारख्या अशा अनेकांनीं आजवर अनेकदां ठोकरलेल्या, भग्नहृदय होऊन वेशीसीमेवर कायम जाऊन पडलेल्या अनंत जीवांच्या मोडक्या तोडक्या झोपड्यांच्या जगांत मी तिला फेंकून दिली. आणि पुनः अविश्वासाचं कवाड उभं केलं.

तें तिचं आणि माझं जग दुरावलेलं मी पाहतें तेव्हां माझ्या अपराधाची जाणीव अजून बुझत नाहीं.

● ● ●





# एक जुनी पुराणी मास्तरीण!

: श्रीपाद महादेव माटे

**सगळें कांहीं होतें परंतु काय आणि कसें तें माहीत नव्हतें त्या काळापासून आजतागायत तिनेंच धडे दिले.**

मानवप्राणी हा सृष्टीचाच शिष्य आहे, पण हें सांगितलें तर, त्याला कदाचित् अवमानसुद्धा वाटेल. तो सृष्टीचा शिष्य आहे, असें म्हटलें म्हणजे सृष्टिदेवी हातांत छडी घेऊन बसली आहे आणि ती त्याला निरनिराळीं ज्ञानें पढवीत आहे, असें समजावयाचें नाहीं. तिनें त्याच्या अंगीं दोन शक्ति ठेविल्या आहेत. संस्कारक्षमता आणि अनुकरणशीलता. या शक्तींच्या बळावर आपलें शिक्षणाचें काम सृष्टि उरकते. यांच्या द्वाराच संवयी, नीति, वाणी, संगीत, सौम्यपणा, प्रखरपणा, मनाचें उड्डाण, संघटन, आवेश, असें कितीतरी प्रकार माणसानें सृष्टीपासून उचललेले आहेत. या शक्ति जर त्याच्या ठिकाणीं नसत्या तर माणसानें केलेला आजवरचा संस्कृतीच्या वाटेवरचा प्रवास त्याच्या हातून खचित झाला नसता. माणसाच्या गळ्यांत आवाज होता पण त्याला शब्दरूप द्यावें हे तो पशुपक्षांचे शब्द, वस्तुजातांतून उठणारे ध्वनि यांच्या अनुकरणानें शिकला. त्याला गायनाची खुबी बहुधा साळुंकीकडून लाभलेली असावी. डोंगराचें जबरदस्त शिखर पाहून त्याच्या बुद्धींत स्थैर्यानें प्रवेश केला असावा. अश्वत्थवृक्षाच्या बुंध्याकडे पाहून त्याला शाश्वतीची कल्पना आली असावी. वेली आणि वेलांट्या यांनीं त्याला विनय शिकविला असावा. सूर्याचें तेज, सिंहाची गर्जना आणि वाघाच्या डरकाळ्या याकडे पाहून प्रखरपणा, गांभीर्य आणि क्रूरपणा हे गुण त्याच्या ठिकाणीं उद्भवले असावे. ऋतुचक्र पुन्हा पुन्हा फिरतांना पाहून आवर्तनाची कल्पना त्याला आली असावी. शशिसूर्यांचीं आगमनें, आणि दिवस रात्रींची उघडझांप पाहून त्याला कालाची आणि वक्तशीरपणाची कल्पना आली असावी. ही त्याच्या शिक्षणाची तरतूद, त्याचें आगमन पृथ्वीवर होण्याच्या आधींच होऊन राहिलेली होती. त्यानें आपल्याबरोबर फक्त संस्कारक्षमता आणि अनुकरणशीलता या दोनच शक्ति आणलेल्या होत्या. त्यानें उत्तरध्रुवाच्या आकाशांत नाना प्रकारचे रंग पाहिले आणि त्याच्या भावना-कोशांत कांहींशी जागृति झाली. पृथ्वीवर भ्रमन्ति करतांना, क्षितिजाची रेषा हस्तगत होत नाहींसें पाहून विशालत्व त्याच्या मनांत भरलें. दऱ्याखोऱ्यांतून वहात येणाऱ्या व कड्यांवरून कोसळणाऱ्या प्रचंड नद्यांच्या झोतांनीं अस्थिरता आणि अशाश्वती यांचाहि झोका त्याच्या मनाला दिला. पावसाच्या धारा आणि जमिनींतून भराभर वर येणारे अंकूर यांनीं त्याला उत्पादनाची कल्पना आणून दिली. असें हें शिक्षणाचें काम चालू झालें असावें. सृष्टिदेवी आपल्या ठिकाणीं गप्प बसून होती; संस्कार व अनुकरण यांचें चक्र तिनें त्याच्या ठिकाणीं चालू करून दिलें होतें. आणि तें अत्यंत मंदपणानें गरगरत राहिलेलें होतें.

शास्त्रज्ञ सांगतात कीं, माणूस जन्माला येऊन लाखों वर्षें झालीं. त्याच्या संस्कृतीचा इतिहास पहावा, तर पांच हजार वर्षांच्या मागें जातां येत नाहीं. मग त्याच्या आधींचीं इतकीं वर्षें तो काय करीत होता? अत्यंत गंभीर असें मन आणि अत्यंत चपळ अशी बुद्धी त्याच्या ठिकाणीं पूर्णपणें विकसित होण्यांत हा एवढा दीर्घ काळ खर्ची पडला असावा काय? मनाला आणि बुद्धीला सहस्र पाकळ्या आणि शलाका आहेत; आणि त्या प्रत्येक पाकळीला आणि शलाकेला तितकेच फाटे पुन्हां फुटलेले आहेत. ही वाढ करून घेण्याला माणसाला इतकीं वर्षें लागलीं असावीं, पण ही वाढ चालू असतांना, त्याचा शिक्षक कोण म्हणून विचारलें तर सृष्टि हें एकच उत्तर द्यावें लागेल. त्याला शिकवायला दुसरा कोण आलेला होता? त्याच्या मनावर दुसऱ्या कोणी संस्कार केले? त्याला स्वादिष्ट फळें कोणी खाऊं घातलीं? आणि निर्मळ जलें कोणी पाजलीं? ऊष्ण काळीं आम्रवृक्षाची शीतल छाया त्याच्यावर कोणी धरली? आणि शीतकालीं 'तूं होळीच्या आश्रयाला जा' असें त्याला कोणी सांगितलें? हें सर्व काम सृष्टीनें केलें; आणि हें काम अगदीं संथपणानें चाललेलें होतें. जणूं कांहीं मनाची रचनाच होत होती; त्याच्या शक्तीच वाढीस लागत होत्या; त्याला नवीन चेतना प्राप्त होत होती; आणि आपल्याच ठिकाणीं होणाऱ्या बुद्धि-स्फुरणांनीं तो भांबावून किंवा आनंदून जात होता.

पण हा चेतनेचा उबारा आणि ही स्फुरणांची उभारी कणाकणांनीं आणि अंशाअंशांनीं त्याच्या ठिकाणीं वाढत चालली होती; कणाकणांनीं आणि अंशाअंशांनीं अशासाठीं कीं, त्याच्या मनाची संस्कारक्षमतासुद्धां आतांच्यासारखी तल्लख बनलेली नव्हती. कुंभाराच्या चाकांतून एकादा घडा हळूं हळूं कसा बनत जातो हें तुम्हीं पाहिलें आहे काय? बरोबर तसाच प्रकार हा मनाचा घडा बनतांना चाललेला होता. कुंभाराचा घडा कदाचित् एकाद्या प्रहरांत होत असेल. पण हा माणसाचा घडा बनायला लाखों वर्षें लागलीं असावींत. जशी इतर वस्तुजाताची, तशी त्याची वाढ क्रमशः आणि अक्षरशः होत होती.



अनुक्रमणिका

शास्त्रज्ञ आपल्याला सांगतात कीं, हा हिमालय पर्वत सारखा झिजत चालला आहे. पण दुसरीकडे याच्या अंगाची झीज सांठत चालली आहे. लाखों वर्षें गेलीं म्हणजे हिमालय सपाट होईल आणि त्याच्या झिजेचे लगदे एकावर एक सांठून दुसरीकडे त्यांचा एक उत्तुंग पर्वत होईल. जियें पर्वत तियें सपाटी आणि जियें सागर तिथें डोंगर असा सृष्टीचा बनाव चाललेला असतो. तोच अवधि माणसाच्या बनावाला लागला असला पाहिजे. मानवप्राणी ही जर सृष्टीची सर्वोत्तम निर्मिति असेल तर त्याच्या बनावाला इतका काळ लागणारच लागणार. एकादें वाळूक बनायला दोन चार महिने पुरत असतील पण माणसाचा पिंड बनवायला सृष्टीला फार युगें लागलीं असतील. त्याचा देह नऊ महिन्यांत तयार होतो; पण त्याचें मूळ बीज तयार होण्याला लक्षावधि वर्षें लागलीं असतील. वटवृक्षांच्या बीजांतून बुंधा, शाखा, पालवी, फुलें, फळें एवढीं उत्पन्न होतात; पण माणसाच्या बीजांतून एक सुंदर आणि सावयव देह तयार होतो. एवढेंच नव्हे, तर त्याच्या देहांतलें मन तयार होतें; आणि त्याच्या मस्तकांतील बुद्धि तयार होते; हें मन आणि बुद्धि तयार करायला सृष्टीनें कित्येक युगें खालीं असलीं पाहिजेत. या अणूमात्र मनाच्या पोटांत नानाप्रकारच्या भावभावना, संकल्प-विकल्प यांची गर्दी उसळलेली असते. गर्दी अवघ्या विश्वाला व्यापून रहाते. पण ती अणुरूप मनाच्या पोटांत सामावून रहाते ? त्याची बुद्धि सूर्यमंडलाच्या पलीकडे धावत गेलेली आहे. तिनें अणुरेणूंचीं कपाटें खोलून पाहिलीं आहेत. कोठें तरी गूढांत झोपीं गेलेल्या विजलीला तिनें चुचकारून आपल्या मंदिरांत आणलेलें आहे. तिनें दूर दिगंतांत असलेल्या सृष्टिसामर्थ्यांच्या पेशी उघडून पाहिलेल्या आहेत. असली ही बुद्धि तयार करायला सृष्टीला कित्येक युगेंपर्यंत श्रम करावे लागले असतील. म्हणून, पांच सहा हजार वर्षांपूर्वीं पर्यंत, लक्षावधि वर्षांचा जुना मानवप्राणी काय करीत होता असें कोणी विचारूं नये !



हें त्याचें मन आणि ही त्याची बुद्धि त्याच्या त्रिलोरी डोळ्यांतून बाहेर बघत असते. इतर पशुपक्षी पहातात पण माणसाचें पहाणें समुद्रतळाइतकें खोल आणि सूर्यमंडळाइतकें उंच असतें. ही दृष्टीची शक्ति अपुरी पडतेशी पाहून त्यानें पल्लेदार दुर्बिणी तयार केल्या आणि मग चंद्राचें भूपृष्ठ जणूं कांहीं त्याला हातानेंच चापचून पाहतां येऊं लागलें. त्याला दूरचें ऐकूं येत होतें पण तें अपुरें पडूं लागलें. मग त्यानें आकाशाच्या पोकळींत एक यंत्र बसविलें; आणि जगाच्या त्या टोकापाशीं निघालेला ध्वनी त्याला एका क्षणांत ऐकूं येऊं लागला. अशा रीतीनें, मन, बुद्धि आणि इंद्रियें हीं मथून काम करूं लागलीं. सृष्टीच्या इतर कोणच्याही रचनेनें ही वर्धनशीलता दाखवलेली नाहीं. डोंगर डोंगरच राहिलेले आहेत, नद्या नद्याच राहिलेल्या आहेत. सत्ययुगांत वारा वहात होता तसाच तो कलियुगांत वहात आहे. मानवप्राणी मात्र आपलीं सामर्थ्यें भराभर वाढवीत चाललेला आहे. म्हणून असें वाटतें कीं, ही त्याची तयारी करून घ्यायला सृष्टीला कित्येक युगें लागलीं असलीं पाहिजेत. पण ही त्याची तयारी करवून घ्यायला त्याच्या ठिकाणीं संस्कारक्षमता आणि अनुकरणाची आवड हीं सामर्थ्यें नसतीं तर यांतलें कांहींही घडून आलें नसतें.

संस्कारक्षमता आणि अनुकरणशीलता हें माण-

साचें मूळ पांडवल होतें. त्यानें आपल्या मनावर सहस्र संस्कार कोरवून घेतले. त्याच्या मनाची ओली कांच, इंद्रियांच्या द्वारां येत असलेलीं आवरणें आपल्या प्रकृतीशीं झटवून घेत राहिली. आणि स्वतःच्या प्रकृतीशीं एकजीव झालेल्या या आवरणांना किंवा संस्कारांना इंद्रियांच्या द्वारा पुन्हां प्रकट करीत राहिली. पर्वत, अश्वत्थ वृक्ष, वेलवेलांट्या, घोष करीत जाणारे नद्यांचे प्रवाह, सोसाट्याचा वारा, आकाशांतून कोसळणाऱ्या जलधारा, पहांटेच्या वेळीं रंगीरंगी झालेली पूर्व दिशा, मागून झळकत येणारें तें सूर्यबिंब, हीं सारीं त्याच्या शिक्षणाचीं साधनेंच बनलीं. गुरूनें जसा एकादा चेला तयार करावा, तसा सृष्टीनें या मानवाला आपला चेला बनविलें. शाळेंतला गुरू विद्या देतो तेव्हां त्याचीं विद्यादानाचीं साधनें म्हणजे काळा फळा, पांढऱ्या खडूचा तुकडा, एकादी शाईची रेघोटी, एकादी दगडाची पाटी, फारतर रंगीबेरंगी गोटी; पण सृष्टीची मात्र सूर्य, चंद्र, तारका, वृक्ष, पाषाण, वेली, ऋतूंचीं आवर्तनें, आकाशाचा विस्तार, त्यावरील इंद्रधनुष्याची कमान, विजांचा गडगडाट, हीं आपलीं साधनें बनविलीं. अशा शिक्षणानें मानवाचें मन तयार होत गेलें, मानवाची बुद्धि विकसित होत गेली. मानवाच्या इंद्रियांच्या शक्ती सहस्रपट वाढल्या !

त्याला वैखरी प्राप्त झाली. त्याला गायनाची लयकारी सुचली. त्याला फुलांचा सुगंध निवडतां येऊं लागला. त्याला उद्भिज्याच्या बीजांचें ज्ञान होऊं लागलें. त्याला पशूंच्या सामर्थ्याच्या मर्यादा कळूं लागल्या. पशू हस्तगत करतां येतात, हें त्याच्या ध्यानांत आलें. त्याला विस्तव पेटवतां आला. होलगड कच्चा खाण्याऐवजीं भाजून खाल्ला तर बरा लागतो, हें त्याच्या ध्यानांत आलें; याबरोबरच आकाशाची गंभीर कमान, पर्वताचीं निमुळतीं होत गेलेलीं शिखरें, लाटा उसळणारे गोल जलाशय, उन्हानें पावसानें पोकळी उत्पन्न होऊन मोठमोठ्या पाषाणांच्या अंगांत पडलेल्या विस्तीर्ण कमानी या त्याच्या मनःफलकावर चित्रासारख्या उमटल्या. कोकिळेचा शब्द पुन्हां पुन्हां ऐकावा असें त्याला वाटूं लागलें. गाईच्या हंबरण्यांत गोडी आहे, असें त्याला दिसूं लागलें. आणि डोंगरडोंगरांतील प्रतिध्वनींच्या रूपानें नादावत जाणारी सिंहाची मंद्र गर्जना किंचित् भयप्रद वाटली तरी तिच्यांतही गंभीर माधुर्य आहे, असा प्रत्यय त्याला येऊं लागला. शंभर शंभर पाकळ्यांचीं फुलें त्यानें पाहिलीं; आणि त्या पाकळ्यांचे एकावर एक बसलेले थर पाहून तर तो अगदीं वेडावून गेला. आकाशांतून पडणारे दंवाचे बिंदु षट्कोनी, चौकोनी, अष्टकोनी आकृति करून पडतात, हें पाहून तर तो आनंदून गेला. डोंगरांतून जसा प्रतिध्वनी तशी नद्यांच्या पाण्यांत पडलेली झाडांची पडछाया ही त्याला मूळ झाडापेक्षांसुद्धां जास्त मौजेची वाटूं लागली. साळुंकीचें अनुकरण करून त्यानें आपल्याही आवाजाची किनारी पुष्कळ वेळ ओढत ठेवली. नदीच्या वाळवंटांत सांपडलेल्या मऊ दगडानें शेजारच्या काळ्या शिळेवर इंद्रधनुष्यासारखी कमान त्यानें काढली. इतकेंच काय, खड्ड्यांत सांपडलेली पिवळी तांबडी माती सुद्धां त्यानें त्या कमानीवर हंथरली. वारा सुटला असतां, वृक्षांची आणि वेलींची पालवी ठेक्याठेक्यांवर डोलत असलेली पाहून तो आपले पायही तसेच आपटूं लागला; आणि त्याच्या अनेक कलांचा जन्म झाला. त्याला बोलतां येऊं लागलें, गातां येऊं लागलें; त्याला आकृती काढतां येऊं लागली; त्याला रंगांचें सौंदर्य कळलें; त्याला

नाचतां येऊं लागलें. एखाद्या शिळेच्या पृष्ठावर पडत चाललेल्या बारिक बारिक रेषांनीं माणसाचा सुंदर चेहरा उमटलेला आहे, असेंही त्याला आढळून आलें; आणि मग हातांतल्या अणकुचीदार दगडानें आपण तसेंच कांहीं खोदावें, असें त्याला वाटूं लागलें. आणि यांतून त्याच्या खोदकलेचा जन्म झाला.

आपण समजतों कीं, कला आधुनिक काळांत जन्माला आलेली आहे. पण तें खरें नाहीं. कला फार फार जुन्या काळीं, म्हणजे माणूस जेव्हां केवळ अनगडच होता. तेव्हां अनुकरण बुद्धीनें त्यानें ती जन्मास घातली आणि त्याच्यापुढें अनुकरणासाठीं सृष्टीनें आपला आदर्श धरला होता. विवंचून पहावें म्हणजे दिसून येईल कीं, कलेचे आश्चर्यकारक नमुने अत्यंत प्राचीन काळीं माणसानें उत्पन्न केले. तितक्या प्राचीन काळीं त्याचें ज्ञान मात्र इवलेंसेंच होतें. त्याच्या बुद्धीचा पल्ला कोंबडीच्या उड्डाणापेक्षां जास्त नव्हता. पण त्यानें त्यावेळीं प्रगट केलेली कला मात्र आपल्याला अजूनही स्तिमित करून सोडते. सध्यांच्या कलावंतांना साध्य असलेलीं जीं उपकरणें आहेत, तीं त्याच्यापाशीं बिल्कूलच नव्हतीं. आपण सध्यां जास्त कलावान् आहों असें आपल्याला वाटतें; पण तो आपला गर्व फुकट आहे. शास्त्रशोधांनीं प्राप्त करून दिलेल्या साधनांमुळें आपल्या कलेला वैविध्य प्राप्त झालेलें आहे आणि ती घरींदारीं खेळूं लागली आहे. पण शुद्ध कला म्हणून पहायला गेलें तर तिचीं सर्वोत्कृष्ट दर्शनें मानवाच्या अत्यंत प्राचीन काळच्या कृतींतच होतात; आणि याचें कारण तरी इतकेंच कीं, अनुकरणाची विद्या तेवढ्या प्राचीन काळीं माणसाला साध्य झाली होती. आपण आतां वाटेल तितके नवे नवे शब्द बनवीत आहों; पण सर्व शब्दांच्या आदिस्थानीं असलेले जे मूळ ध्वनी ते अत्यंत प्राचीन काळीं मनुष्यप्राण्यानें अनुकरणानें सिद्ध केले. आपल्या मूळाक्षरांत अथवा Alphabets मध्यें आपल्याला फारशी दुरुस्ती करतां आलेली नाहीं. भाषाशास्त्रज्ञ किंवा वैयाकरण यांनीं, तोंडांतून निघणाऱ्या शेकडों शब्दांत मूळध्वनी कोणचे आहेत ते चाचपून चाचपून निराळे काढले असतील आणि त्यांची वर्णमाला बनविली असेल; पण चाचपत असतांना त्यांच्या हाताला मूळध्वनी लागले ते त्या प्राचीन मानवांनीं अनुकरणानें आपल्या मुखांतून काढलेले होते. गायनशास्त्र्यांनीं गळ्यांतून निघणाऱ्या निरनिराळ्या तारस्वरांचीं उगमस्थानें शोधून काढलीं असतील; पण हे तारस्वर माणसानें आपल्या गळ्यांतून अनुकरण-बुद्धीनें पूर्वीं काढलेले होते. रंगांचीं निरनिराळीं मिश्रणें, गडद हात देणें किंवा साफ नाजूक हात देणें, रंग टिकाऊ करणें, ही किमया माणसानें आतां साध्य केली आहे; पण त्या प्राचीन मानवानें आकाशाचें पृष्ठ, इंद्रधनुष्य, हिरवळीवर पसरलेले सूर्याचे किरण यांच्या रंगाचें अनुकरण मुळांत काळ्यानिळ्या मातीनें केलेलेंच होतें. तबला, मृदंग इत्यादिकांचा ठेका धरावा, पायांत चाळ आणि घुंगुर बांधावे, कमरेला किंकिणी बांधाव्या, आणि पायांचे तळवे भूमीवर सफाईनें टाकावे हें कदाचित् आतां माणसानीं अधिक मादक व अर्थवाहक बनविलें असेल, पण त्यांतून उत्पन्न होणारा आनंद त्या प्राचीन मानवानें नाचणाऱ्या वृक्षवेलींचें अनुकरण करून संपादिलाच होता. म्हणजे कलांच्या खऱ्या खऱ्या उगमस्थानांचा शोध, इतकेंच काय पण त्यांचा मोहक आणि अर्थवाहक विकास प्राचीनांनींच केलेला होता. कलांचे सर्वोत्कृष्ट नमुने अत्यंत प्राचीन काळच्या अस्पष्ट सावल्यांतही आपल्याला सांपडतात. या कलांच्या बळावर माणसानें आपलीं जीवितें सुखी करून घेतलीं.

त्याला ज्ञान फारसें नव्हतें. उद्भिज्जरूपाचें आणि खनिज रूपाचें धन पृथ्वीच्या पोटांत कुठें आहे हें त्याला नीटसें कळेना. तारांगणें कोणच्या नियमानें चालतात याचे फक्त ढोबळ नियम त्याला कळले, बाकी 'आश्चर्यवत् पश्यति' याच भूमिकेवर तो परवांपर्यंत उभा होता. जनावरें धरून आणून तीं रथ नांव पावलेल्या गाड्याला जुंपावीं, आणि त्यांतून प्रवास करावा एवढेंच त्यानें परवां परवांपर्यंत केलें. मांजरें, कुत्रीं, नाना प्रकारचे पाले खाऊन आपल्या रोगाचा परिहार करतात, तीच पद्धति या माणसानें अगदीं अलीकडेपर्यंत चालूं ठेवली होती. आतां त्याला हवेंतून उड्डाणें करतां येतात; आणि वस्तूंचे गुणधर्म ओळखल्यानें त्याला औषधांचे जणू कांहीं मंत्र साध्य झाले आहेत. तो संतापला, भांडला म्हणजे परवां परवां पर्यंत लांब सुरीनेंच म्हणजे तलवारीनें तो आपल्या शत्रूची मान कापीत राहिला होता. आतां मात्र त्याला अस्त्रविद्या प्राप्त झाली आहे. पण हीं दोन अडीचशें वर्षे सोडलीं तर ज्ञानाच्या बाबतींत मात्र, त्याचें जीवित माणसलेलेंच होतें. पण कलेच्या बाबतींत मात्र, त्याची प्रगति कोणीकडल्या कोणीकडे झाली होती; आणि ती कित्येक सहस्र वर्षापूर्वीं झाली होती.

हा अज्ञानाचा, आपत्तींचा आणि मानसिक आलस्याचा काळ त्यांतल्या त्यांत सुखी करायला फक्त कला त्याच्या उपयोगीं पडत राहिली. तो गात राहिला, नाचत राहिला, हातांत बारक्या बारक्या छिन्नी घेऊन पर्वतांचीं विशाल पठारें त्यानें खोदखोदून मोठमोठालीं मंदिरें कोरून काढलीं. अतिशय सुंदर मूर्ति घडवल्या आणि जें शृंगाराचें सुख कदाचित् थोड्याच लोकांना प्रत्यक्ष इतकें चांगलें मिळत असे तें त्यानें या मंदिरांत चितारून ठेवलें. तो जर कसबी गायक असला, तर हजारों नागरिकांना तो पहांटेपर्यंत झुलवीत राही आणि जर तो रानट असला तर ढोलग्याच्या ठेक्यांवर सारी रात्र आपल्या वस्तींतल्या नायका-पुरुषांना मद्याच्या नशेंत नाचत ठेवी. जीवित सुखाचें करायला, शास्त्रयुगाचा आरंभ होईतां-पर्यंत कलेइतके उपकार मानवावर कोणीही केलेले नाहींत. अगदीं गरीब बायका काळ्या लुगड्यावर शुभ्र सुताच्या चांदण्या काढीत. जमलें तर बारिकबारिक कांचा त्यांत बसवीत. कुठल्याही रानटी वस्तींत जा; ढोलकी तुणतुणें आणि चाळ यांचा विलास तुम्हांला सांपडेलच सांपडेल. कारण माणसलेल्या जीवितांतील कठीणपणाचा परिहार या कलेनेंच होत जातो. असा हा कलेचा महिमा आहे.

श्रीमंत लोक कलेचे पोशिंदे बनतात. त्यांच्या नित्याच्या जीविताला कलेच्या सहाय्याची आवश्यकता नसते; पण पोशिंदेपणाचें सुख त्यांना हवें असतें. सामान्य लोकांच्या प्रपंचांत मात्र जर जीवित सुखाचें व्हावयास हवें असेल तर कलेची आवश्यकता फार आहे. आणि म्हणूनच असें दिसून येईल कीं, चव्हाट्याच्या ठिकाणीं, स्वस्त दराच्या नाटकगृहांत लोकांची गर्दी अतोनात होते; आणि हें अगदीं स्वाभाविक आहे. मनाच्या विरंगुळ्याला त्यांच्यापाशीं दुसरें कोणचेंही साधन नसतें. ही कला जर त्यांच्या सहाय्याला गेली नाहीं तर ते व्यसनी बनतात. रंजन झालें नाहीं तर ते मादक वस्तूंची कांस धरतात आणि विस्मरणाचा पेला पिऊन दुःखाचा परिहार करवून घेतात.

म्हणूनि सुख आणि समृद्धी यांचा अवतार जरी देशांत होत असला तरी माणसांच्या मनाला झोंबणारीं दुःखें आणि त्यांना पोखरणारी काळजी हीं शिल्लकच रहातात. यावर जर उतारा हवा असला तर तो कला हा आहे. जीवन आणि कला यांचें परस्परांशीं अनेक तऱ्हेचें नातें आहे. त्यांतील एक नातें येथें थोडें शोधून पाहिलें आहे. इतकेंच !

●●●




रात्र चढूं लागली, चंद्र वर आला आणि चांदण्याचा शुभ्रपणा अधिकाधिक उजळत चालला. आकाश गडद निळें झालें. रस्ते संथ वाटूं लागले–जणूं एखाद्या आठवणींत विसरल्यासारखे. पानांनीं गजबजलेल्या पिंपळांत एक हळवी सळसळ उमटली. वाऱ्याचीं पावलेंहि संकोचानें अवघडल्यासारखीं अलगद पडूं लागलीं. सगळीकडे निवांतपणा पसरला. पण त्यांतहि कांहीं आवेग मिसळला होता–तळाशीं विसावलेल्या स्मृतींना उमाळा आणणारा आवेग. असें वाटत होतें कीं सगळें जग अर्ध्यामिटल्या डोळ्यांनीं एखादें सुंदर स्वप्न पाहात आहे. त्या स्वप्नाची कांति चांदण्याची आहे, त्यांत सळसळीचें गीत आहे. आकाशाची वृत्ति आहे...

शरद आपल्या खोलींत वाचत बसला होता–मंद, पिवळ्या प्रकाशांत. तो हातांतील पुस्तकांत रंगला होता; पण कांहीं वेळानें त्याचे डोळे जडावले, मिटूं लागले. त्यानें पुस्तक खालीं ठेवलें व खिडकीजवळ गेला...

चांदणें पडलें होतें !

तो फुलून निघाला. झोंपेच्या आधीन होऊं लागलेलें त्याचें शरीर एकदम जागें झालें. मन खुललें—जणूं कांहीं तरी घडत होतें...नुकतेंच घडून गेलें होतें...आणि त्याच्या खुणा चांदण्यांत रेंगाळल्या होत्या...

त्यानें दिवा मालवला. खोलींत चांदणें दाटलें खुर्ची लाजली, टेबलाशीं कांहींतरी कुजबुजली आणि टेबल शहारलें. मच्छरदाणीची जाळी अधिकच रेखीव भासूं लागली. तिच्यांतून दिसणाऱ्या मऊ, दुलदुलीत उशा, स्वच्छ गाद्या...

त्या खोलीची समृद्धि चांदण्यांत ओसंडत होती—केवळ खोलीचीच नव्हे, अवघ्या संसाराचीच ! शरदला वाटलें, आसुसलेल्या डोळ्यांनीं हें सगळें साठवून घ्यावें. नव्या उमेदीनें मांडलेला, हळू हळू उमलत गेलेला हा संसार...त्याला बिलगलेल्या अनेक धुंद आठवणी...

आणि त्याला एकदम मीराची आठवण झाली. केवळ तिच्यामुळें हा संसार उभा राहिला होता, बहरला होता.

मीरा...गोऱ्यापान रंगाची, टपोऱ्या डोळ्यांची, दाट कुरळ्या केसांची... कांहींशी अबोल, पण अत्यंत प्रेमळ.

शरदला वाटलें, या गोड पोरीचें किती कौतुक करूं आणि किती नको !

"मीरा..." त्या आवेगांतच त्यानें हाक मारली.

"आलें हं." आंतून स्वर किणकिणले.

मीरा खोलींत आली. तिचा चेहरा थकल्यासारखा दिसत होता, पण ओठ हास्यानें फुलले होते; तिच्या अंगावर शुभ्र पांढरें पातळ होतें. त्यावर चांदण्याचे किरण पडले व तें चमकलें.

शरद वेडा झाला !

"घड्याळ पाहिलंस ?" तो म्हणाला.

"हो, पाहिलं ना..."

"किती वाजले बरं आतां ?"

"साडेदहा..."

अनुक्रमणिका

# चिंचेच्या अर्ध्या पानावर....



— विंदा करंदीकर

विमान आलें डुंबत डुंबत
अंधारांतुन
आणि उतरले तीन प्रवासी
चिंचेच्या अर्ध्या पानावर !...

एक म्हणाला,
"आज विसरलों नाक घरीं मी."
नंतर दुसरा,
"परवा माझें असेंच झालें;
स्वस्थ झोपलों डोळे उघडुन
आणि भावली पळून गेली."
तिसरा वदला,
"अतां दुधाचा प्रश्न न उरला;
एक काळजी संपुन गेली;
—काल नवी मधमाशी व्याली."

इतक्यामध्यें
अंधारांच्या नाकावरती
एक काजवा येउन बसला......
त्याला पाहुन ते म्हातारे
परस्परांच्या धरुनी शेंड्या
हंसतां हंसतां इतके चळले,
उरलेल्या अर्ध्या पानांतिल
दंवबिंदूतच ते विरघळले !

• • •

"इतका वेळ वाट पाहायला लावायची वाटतं आम्हाला ?" तो तिला जवळ घेत कुजबुजला.

ती कांहीं बोलली नाहीं.

"काय करत होतीस इतका वेळ ? अं ?"

"असंच कांहींतरी..."

"म्हणे असंच कांहीं तरी ! कितीदां सांगितलं आहे कीं नसतीं कामं काढून जीव दमवून घ्यायचा नाहीं...पण ऐकणार कोण आमचं ? हुं..."

"हेंच ऐकविण्यासाठीं बोलावलंत वाटतं ?" ती त्याला बिलगून म्हणाली.

तो तिच्या लाडिक बोलण्यानें थरारला आणि हळुवार स्वरांत म्हणाला "वेडी मुलगी !"

मीरा तशीच त्याला बिलगून बसून राहिली. कांहीं वेळानें ती म्हणाली, "दिवा नाहीं लावायचा ?"

"छट्. या वेळीं कोणी दिवा लावतं ? बाहेर पाहिलंस ? किती छान चांदणं आहे...."

ती उठून खिडकीजवळ गेली. आकाशांत चंद्र हंसत होता. तिला पूर्वीच्या कितीतरी चांदण्या रात्री आठवल्या...गांवाबाहेरील टेकडीवरच्या, तलावाकांठच्या...कोणीतरी तिच्या कानांत गुणगुणलं, "आज जगांतील दोन्ही सुंदर वस्तु माझ्याजवळ आहेत—चांदणं आणि तूं...."

तिच्या डोळ्यांसमोर दोन आकृति तरळून गेल्या. ती तशीच खिळल्या-सारखी उभी राहिली. इतक्यांत शरद् जवळ आला. तिनें भानावर येऊन उदासपणा झटकण्याचा प्रयत्न चालू केला....

शरदच्या तोंडांतील सिगारेटचा धूर भोंवती पसरला. ती आकसली. एवढ्या सुंदर चांदण्यांत सिगारेट...

"चालेल ना ओढली तर ? नाहींतर म्हणशील..."

"इश्श्य, त्याला काय झालं ?" तिच्या उत्तरांत संवयीची सफाई होती.

"किती स्वच्छ चांदणं पडलं आहे नाहीं ?" तो तिच्या गळ्याभोंवतीं हात टाकून म्हणाला.

"खरंच..." तिच्या नकळत तिची वृत्ति प्रसन्न झाली.

"चल, फिरायला जाऊं या. येतेस ?"

"आतां ? या वेळीं ?"

"वा वा ! जणूं कांहीं संवयच नाहीं असल्या गोष्टींची ! आपलं नुकतं लग्न झालं तेव्हां...आठवतं ना ? कीं विसरलीस एवढ्यांत ?"

छे: ! ती कांहींच विसरली नव्हती. एकटीच असली कीं ती अनेक वेळां त्या आठवणींशीं चाळा करीत बसे. कांहीं कडू आठवणी, ज्या तिनें एकटीनें सहन केल्या होत्या; आणि कांहीं गोड. तिला व शरदला एकत्र खेचणारे ते जणूं धागे होते.

"मीरा, तें सगळं आतां दूरदूरचं वाटतं, नाहीं ? पण तरीहि किती स्पष्ट...नितळ..."

ती मिटल्या ओठांनीं ऐकत होती.

"अशा एखाद्या सुंदर क्षणीं मागं वळून पाहिलं कीं वाटतं, ही वाट आपण चालून आलों—कांहींशी अवघड, काट्याकुट्यांची: पण आपण धीम्या मनानं ती ओलांडली. केवळ तुझा हात हातांत होता म्हणूनच..."

"मला असं बोललेलं आवडत नाहीं हं."

"हो, पण नेहमीं बोलतों का मी ? आज राहवतच नाहीं ग. जीव वेडावला आहे... मीरा, तुला अनिलांच्या ओळी आठवतात ? वाहत्या,

अनुक्रमणिका

धावत्या, सळसळत्या जीवन प्रवाहीं आपण दोघें कितीतरी दूर वाहून आलों..."

त्यानें ओढीनें भरलेल्या डोळ्यांनीं तिच्याकडे पाहिलें. ती स्वस्थपणें त्याच्या मांडीवर पडली होती.

तो म्हणाला, "मीरा, गप्प कां तूं? झोंप आली?"

"नाहीं."

"मग बोल ना कांहींतरी...नेहमीं नेहमीं आम्ही बोलायचं आणि तूं नुसतं ऐकायचं..."

"मला आवडतं तुमचं बोलणं ऐकायला. फार फार आवडतं."

"पण आज तरी तूं मोकळेपणानं बोल ना—"

"म्हणजे नेहमीं मी..."

"होयच मुळीं. अगदीं आंतल्या गांठीची आहेस तूं..."

"बघा हं पुन्हा असं म्हटलंत तर. रागावेन मी."

"बरं, नाहीं —" तो तिला थोपटत म्हणाला.

आणि तुडुंब भरून बोलत राहिला...

"आपण एकत्र आलों ना, तेव्हां प्रथम मला वाटायचं, कोण जाणे आतां आयुष्याला कोणतं वळण मिळणार आहे! फार विचित्र मनःस्थितींत होतों मी. एकदां हार पदरीं घेऊन बसलेला...वाटायचं, तुला या झळा लागणार आणि तूं करपणार. त्याप्रमाणें त्या लागल्याहि. पण तरीहि तुझा जिव्हाळा कायम राहिला. आणि म्हणूनच कदाचित् आपलीं आयुष्यें सांभलीं गेलीं...नाहींतर..."

नाहींतर काय? हें सगळं उध्वस्त होऊन गेलं असतं...तिचं मन उसळून म्हणालें.

"आतां मात्र त्या शंका दूर झाल्या आहेत. आणि उरली आहे ती फक्त अथांग ओढ. संसारांतल्या अडचणी ओलांडून पलिकडे गेल्यावर पतिपत्नींना काय वाटत असेल, हें आज मला कळतं आहे—एकप्रकारचा अभिमान — भविष्यांतील तृप्तीबद्दलचा विश्वास..."

तो बेभान होऊन बोलत होता. जणूं चांदण्याचा प्रत्येक कण त्याच्या वाणींत शिरला होता....

"आणि मीरा, नाटकी बोलूं नये. पण याचं सारं श्रेय तुला आहे... तुझ्या जागीं दुसरी एखादी असती तर..."

तर...कदाचित् हें तुटलं असतं, ओघळलं असतं...तिच्या मनांत शब्द तरंगले.

आणि तें खरं होतं!

त्यांचा विवाह झाला तेव्हां तीहि त्याच्यासारखीच अस्वस्थ होती—एखादा जबरदस्त घाव बसल्यासारखी. त्या सुन्नपणानेंच तिनें त्याच्या संसारांत आपलें पाऊल टाकलें होतें. आणि पहिल्या आठच दिवसांत तिला कळून चुकलें होतें कीं आपण दोघांनीं एकत्र येण्यांत फार मोठी चूक केली आहे—कीं जिच्यासाठीं कदाचित् दोघांचींहि आयुष्यें वांया जातील. मग तिनें निश्चय केला, हें सावरायचें—आटोकाट प्रयत्न करून. तिला न आवडणाऱ्या अनेक गोष्टी त्याच्या स्वभावांत होत्या. त्यांच्याशीं जमवून घेणं तिला असह्य होई. पण तिनें संयम केली. लहानसान प्रसंगांतून उद्भवणारे तंटे टाळले...आणि ते टाळतांना होणाऱ्या वेदनांतूनच आज त्यांचा संसार फुलला होता!

या वेदना दडपल्या नसत्या तर...तर हें सगळें तुटलें असतें, उध्वस्त होऊन गेलें असतें...



तो म्हणत होता, "पण मला अजूनहि आश्चर्य वाटतं, मीरा, एका गोष्टीबद्दल. तुला जेव्हां मी माझ्या पहिल्या प्रेमाची कहाणी सांगितली तेव्हां मला वाटलं, मी चूक केली. कारण तो केवढ्या जरी दुराव्याचा उगम होता. मला वाटलं होतं तूं आतां मनांत कुरशील, कधीं कधीं त्यावरून मला टोंचून बोलशील, आपलीं नेहमीं भांडणं होतील...तुझ्या जागीं दुसरं कोणी असतं तर तेंच झालं असतं. पण तूं होतीस म्हणून सगळं सावरूं शकलं—नाहींतर कोठें भडकत गेलं असतं कोण जाणे... खरं सांग, मीरा, मी पहिल्या प्रेमाबद्दल तुला सांगितलं तेव्हां तुला काय वाटलं?"

"मला नाहीं बाई आतां आठवत..."

"तें कांहीं नाहीं—आज तुला मोकळेपणानें बोललं पाहिजे..."

ती म्हणाली, "खरं सांगूं का? मला दुःख झालं पण मत्सर मात्र वाटला नाहीं. म्हणूनच मी सगळं सहजपणें सहन करूं शकलें. मला तें समजूं शकलं. त्यांत जगावेगळं कांहीं नसतं. प्रत्येकजणच...ती एक उत्कट स्थिति असते. कधीं न विसरतां येण्याजोगी. त्या स्मृतीच्या आधारानें वाटेल तें सहन करण्याचं सामर्थ्य अंगीं येतं..."

तिच्या शब्दावरचें कसलें तरी आवरण आज प्रथमच बाजूला झालें होतें. शरद कौतुकानें ऐकत होता. केवढी अंतर्मुख, समंजस मुलगी!

तो स्वच्छ मनानें म्हणाला, "तूं एवढी समज दाखविलीस म्हणून तर या क्षणीं आपण इतक्या सुखांत आहों! खरंच, किती जवळ आलों आहोंत आपण! आपल्याला आतां एकमेकांना न सांगण्यासारखं कांहींच नाहीं..."

आजच्या चांदण्यानें त्याला हें समाधान दिलें होतें.

पण तेंच चांदणें तिला म्हणत होतें, '-मला तुझ्या वेदना माहीत आहेत. मी तुझे अश्रु पाहिले आहेत...आणखीहि कांहीं...तूं हें त्याला सांगणार नाहींस? निदान आतां...'...

ती उरी फुटत होती आणि फक्त म्हणत होती, हें असंच चालणार. कशालाच माझा इलाज नाहीं. आतांपर्यंतचा प्रवास तर संपला...एका निष्ठेमुळें, एका विश्वासामुळें......

इतक्यांत शरदचे शब्द ऐकूं आले, "या क्षणीं मात्र मला वाटूं लागलं आहे कीं माझं तें प्रेम खरं नव्हतं. तें केवळ एक आकर्षण होतं. तिनं मला आपल्या जाळ्यांत......"

मीरा एकदम दुभंगली आणि त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली, "नका, नका बोलूं असं..."

चांदण्यानें तिचे अश्रु पाहिले...पुन्हा एकदां......

● ● ●




अनुक्रमणिका



# त्यांनीं निसर्ग चोरला

: ना. वा. कोगेकर

परंतु त्यांच्यावर फिर्याद झाली नाहीं. कारण अखेर शास्त्रज्ञ झाले तरी निसर्गाचींच लेकरें.

'**गू**ळ तेथें माशी ' किंवा ' धूर तेथें अग्नि ' असें आपण म्हणतों. आमच्या दासबाबूंकडे पाहिल्यावर ' हुषारी तेथें विक्षिप्तपणा ' हें देखील खरें असावें. असें वाटूं लागतें. अतिशय हुषार यंत्रज्ञ म्हणून बाबूजींची ख्याति. यांत्रिक ज्ञान व कसब यी दोहोंत दासबाबूंची बरोबरी करण्याची गोष्टच बोलूं नका मुळीं ! मात्र त्यांच्या अंगच्या या गुणाला गालबोट जर कशाचें लागलें असेल, तर तें म्हणजे त्यांचा विक्षिप्तपणा. तो जसा कांहीं त्यांच्या पांचवीलाच पुजलेला. कोणताही विषय घ्या. एकदां का बाबूजींना त्याची गोडी लागली कीं मग कांहीं विचारूं नका. लागलेच ते त्याच्या पाठीमागें हात धुवून ! त्यावरील सगळे ग्रंथ त्यांनीं पालथे घातलेच म्हणून समजा ! अखंड वाचन व गाढ मनन यांच्या भट्टींतून त्या विषयाचें संपूर्ण ज्ञान बाबूजींनीं तावून सुलाखून काढलें कीं, मग काय विचारतां ? बावनकशी सोन्याप्रमाणें बाबूजींच्या विद्वत्तेची प्रभा पसरूं लागे. तिचे पैलू हिऱ्याप्रमाणें चमकूं लागत. अभ्यासिलेल्या विषयाच्या मर्मावर नेमकें बोट ठेवण्याची बाबूजींची हातोटी, रोगाचें अचूक निदान करणाऱ्या धन्वंतऱ्याच्या हातोटीलाही मागें सारणारी होती. नवा दृष्टिकोन, विचाराची नवीन दिशा हें एक त्यांचें वैशिष्ट्य ! हो, पण हातच्या कांकणाला आरसा कशाला ?

कशावरून गोष्टी निघाल्या कोणाला माहिती ? भौतिक शास्त्रांत, गेल्या शेंपन्नास वर्षांत, महत्वाचे असे जे शोध लागलेले आहेत त्याविषयीं आमचें बोलणें चाललें होतें. आजचें युग म्हणजे विज्ञानाचें युग ! निसर्गावर आपलें स्वामित्व प्रस्थापित करावें म्हणून तर शास्त्रज्ञांचे सगळे प्रयत्न ! त्यांत त्यांनीं भरपूर यशहि मिळविलें आहे अशी विचारसरणी मोठ्या हिरीरीनें मी बाबूजींपुढें मांडीत होतों. मला मध्येंच थांबवून दासबाबू म्हणाले, " निसर्गावर स्वामित्व गाजवायला म्हणून तुमचे शास्त्रज्ञ निघाले खरे, पण माझ्या मतें, ते तर निसर्गाचे दासानुदास होऊन बसलेत ! अगदीं अस्सल अस्सल म्हणून, मोठ्या दिमाखानें, ज्या शोधांबद्दल तुमचे हे शास्त्रज्ञ शेखी मिरवतात ते शोध म्हणजे निसर्गाची निव्वळ नक्कल होय हें माहिती आहे का तुम्हांला ? " बाबूजींच्या बोलण्याचा रोख माझ्या ध्यानांत आला. मी चटकन् म्हणालों, " म्हणजे निसर्गांत प्रत्यहीं आढळून येणारे रंग किंवा फळाफुलांचे वास, त्यांची चव, यांची नक्कल करून शास्त्रज्ञांनीं तयार केलेले कृत्रिम रंग, अत्तरें, तेलें, अर्क, खाद्यपदार्थ यांविषयींच तुमचें म्हणणें आहे ना ? तर मग या बाबतींत, तुम्ही केलेला आरोप एक वेळ मी मान्य करीन ! या बाबतींत निसर्गाला आमच्या शास्त्रज्ञांनीं गुरु केला आहे असें समजा हवें तर. मग तर झालें ? "

" छे, छे, रंग, गंध, चव यासंबंधीं मी नाहीं म्हणत ! गेल्या शेंपन्नास वर्षांतील अतिशय महत्वाचे म्हणून दाखविले जाणारे भौतिक शास्त्रांतले शोध हे देखील, मनुष्यानें निसर्गाची वठवलेली नक्कल होय हें तुम्हाला माहित आहे काय ? "

मी जरा बुचकळ्यांत पडलों. कोणाच्याही सहजासहजीं ध्यानांत न येणाऱ्या गोष्टी व त्यांचें मर्म बाबूजींच्या तीक्ष्ण पण चिकित्सक दृष्टीतून अचूक टिपलें जावयाचें हें जसें कांहीं ठरून गेलेलें. अशा गोष्टी आडपडदा न ठेवता, रोखठोकपणें सर्वांसमोर मांडावयाच्या या त्यांच्या स्वभावामुळें, विक्षिप्तपणाचा आरोप, लोकांकडून आमच्या दासबाबूंवर केला जाई. ऐका तर खरं, बाबूजी आणखी काय म्हणतात तें ! मग करा हवा तर तुम्हीदेखील विक्षिप्तपणाचा आरोप त्यांच्यावर ! बाबूजी म्हणाले, " दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीच्या आग पाखडणाऱ्या बॉम्ब-हल्ल्यांपासून, इंग्लंडचा बचाव कोणी केला बरें ? अर्थात् रेडारनें. सहा वर्षेंपर्यंत रेंगाळलेलें दुसरें महायुद्ध केवळ एक आठवड्यांतच बंद कशामुळें पाडता आलें ? अर्थात् ' अणुबॉम्बमुळें '. ' आज इथें तर उद्यां तिथें ' अशा नोकझोकांत हवेंत भराऱ्या मारणाऱ्यांचें पृथ्वीप्रदक्षिणेचें फार दिवसांचें स्वप्न कशामुळें साकार होऊं शकलें ? अर्थात् विमानामुळें. किमयाकारांचे ' परीसाचा शोध ' लावण्याचे पुरातन काळापासून चालू असणारे प्रयत्न आज यशस्वी होण्याच्या टप्प्यांत आलेले आहेत. जगाच्या कानाकोपऱ्यांतून उठणारे पडसाद अगदीं घरांत बसल्या बसल्या तुमच्या आमच्या कानांत आणून सोडल्यानंतर, कानांप्रमाणें डोळ्यांचे चोचले पुरविणें कशामुळें शक्य होत आहे ? अर्थात दूरचित्रवाणीमुळें (Television)."

दासबाबूंनीं सुरू केलेला हा प्रश्नोत्तरांचा कार्यक्रम कशासाठीं आहे हें, कांहीं केल्या मला उमजेना. अखेर तेच पुढें म्हणाले, " रेडार-यांच-सारख्या आणखी कांहीं विस्मयकारक म्हणून मानल्या जाणाऱ्या आधुनिक काळांतील शोधांच्या मुळाशीं जीं तत्वें दडून बसलीं आहेत त्यांची माहिती मी तुम्हांला जरा खुलासेवार सांगून,



अनुक्रमणिका

मग त्यावरून 'कवी म्हणजे निसर्गाचे भाट' या समीकरणाप्रमाणें 'शास्त्रज्ञ म्हणजे निसर्गाचे नकलाकार' हें समीकरण सिद्ध करणार आहे."

मग काय, आतां तरी आली ना आमच्या बाबूजींच्या विक्षिप्तपणाची पुसट कल्पना? पण थांबा! या शोधासंबंधीं त्यांचें काय म्हणणें आहे तें त्यांच्याच तोंडून अगदीं खुलासेवार ऐकूं या तर खरे आधीं!

"बिचारें वटवाघूळ! खालीं डोकें वर पाय अशा स्थितींत जन्म काढायचा! दिवसभर झोंप काढायची. रात्रभर भटकावयाचें. खरा निशाचर पण याच निशाचराला आमच्या शास्त्रज्ञांनीं गुरु केला. समोरचें कांहींही दिसत नसतांना, काळ्याकुट्ट अंधारांत हा प्राणी आकाशांत भरधांव भराऱ्या मारतो तरी कसा? 'देवाची करणी आणि नारळांत पाणी' असाच प्रकार वाटला शास्त्रज्ञांना प्रथम. पण संशोधक थोडेच गप्प बसणार? त्यांनीं या गोष्टीचा छडा लावायचें ठरविलें. अखेर त्यांना असें दिसून आलें कीं, हवेंत उडत असतांना वटवाघूळ तोंडावाटें अगर पंखावाटें एकसारखा आवाज बाहेर सोडतें. मात्र हा ध्वनि मनुष्याला ऐकूं येऊं शकत नाहीं. कारण त्याची कंपसंख्या (frequency) सेकंदाला ५० हजार इतकी असते. ज्या ध्वनीची कंपसंख्या सेकंदाला २० हजार कंप यापेक्षां जास्ती असते तो ध्वनी मनुष्याला ऐकूं येऊं शकत नाहीं. हवेंत संचार करतेवेळीं, वटवाघळानें सोडलेल्या ध्वनिलहरी, त्याच्या पुढील मार्गांतील अडथळ्यावर (उदाहरणार्थ, भिंत, तार, टेकडी इत्यादि) आदळतात व त्यांचें परावर्तन होऊन, प्रतिध्वनींच्या रूपानें वटवाघळाचे कानावर येऊन पोंहोचतात. या प्रतिध्वनीवरून आपल्या पुढील मार्गांतील अडथळ्याची आगाऊ माहिती वटवाघळांना झाल्यामुळें त्यांना अंधारांतील आपला मार्ग, बिनधोकपणें व अडथळ्यांना टाळून आक्रमिता येतो. 'रेडार' या साधनाची योजना करतांना, शास्त्रज्ञांनीं, वर सांगितलेल्या निसर्गांतील घटनेची हुबेहूब नक्कल केली आहे. रेडारमध्यें, यंत्राचे सहाय्यानें आकाशांत नभोवाणीतरंग फेकले जातात. या तरंगांचा वेग, प्रकाशतरंगांच्या वेगाइतका म्हणजे, दर सेकंदाला १,८६००० मैल इतका असतो. आकाशांत भराऱ्या मारणाऱ्या विमानावर अगर दुसऱ्या एखाद्या अडथळ्यावर रेडारमधून सोडलेले नभोवाणी तरंग ज्या वेळेस आपटतात, त्यावेळेस त्यांचेकडून हे तरंग जमिनीकडे परत फिरवले जातात. परत आलेल्या या तरंगांची नोंद रेडार यंत्रांतील पडद्यावर केली जाते. त्यावरून हवेंत संचार करीत असलेल्या विमानाचें जमीनीपासूनचें अंतर, दिशा, वेग इत्यादींची नक्की माहिती मिळूं शकते. दुसऱ्या महायुद्धांतील इंग्लंडला जीवदान देणारें अमोल साधन म्हणजे रेडार; आणि हें रेडार म्हणजे, एकप्रकारें कृत्रिम वटवाघूळच.

दुसरें महायुद्ध म्हटलें कीं लागलींच आपल्या डोळ्यांसमोर अणूबॉम्ब हा शब्द नाचूं लागतो. अणूबॉम्बच्या पुढची पायरी म्हणजे हायड्रोजन बॉम्ब. मनुष्यानें निर्माण केलेल्या या हायड्रोजन बॉम्बचा स्फोट होतांच हजारों लाखों जीवांचा नाश हा जणूं ठरलेलाच. परंतु निसर्गांत दर क्षणाला अशाच हायड्रोजन बॉम्बचे स्फोट होत असून, त्यामुळेंच हजारों लाखों जीवांना जीवदान मिळत असतें हें तुम्हाला माहिती आहे काय? एकाचें कार्य विध्वंसक तर दुसऱ्याचें विधायक! एक मानवजातीचा शाप, तर दुसरा वर! सूर्य घ्या नाहींतर आकाशांतील निरनिराळे तारे घ्या. हे सर्व वर्षानुवर्षे कसे तळपत असतात! आज लाखों वर्षे सूर्याकडून आपल्याला ऊष्णता व प्रकाश मिळत आहेत; हें कसें काय या प्रश्नाचें उत्तर मिळविण्यासाठीं [illegible] १०० वर्षे शास्त्रज्ञांकडून खूप प्रयत्न सुरू होते. सूर्य किंवा तारे यांच्या गाभ्यांत कोळशासारखें एखादें इंधन जळून उष्णता व प्रकाश बाहेर पडत असावेत अशी कांहीं शास्त्रज्ञांची प्रथम समजूत होती. ज्वलन ही एक रासायनिक क्रिया होय जर अशा क्रियेमुळें सूर्यामधून ऊष्णता व प्रकाश बाहेर पडत असेल तर ही क्रिया सुरू होऊन फार तर कहीं शतकेंच लोटलीं असतील. म्हणजे सूर्याचें वय कांहीं शतकेंच असावें असें अनुमान निघतें. परंतु हें अनुमान अजिबात चूक असल्याचें शास्त्रज्ञांना दिसून आलें. तेव्हां सूर्यामधून येणाऱ्या ऊष्णतेचें मूळ त्याच्या गाभ्यांतील ज्वलनक्रियेंत नाहीं हें स्पष्टच होतें. ब्रिटिश शास्त्रज्ञ एटकिन्सन व जर्मनशास्त्रज्ञ हाऊटरमान यांनीं या प्रश्नाचें उत्तर देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. सूर्याच्या गाभ्यांत मूलद्रव्याचें केंद्र (Nucleus) अतिशय वेगानें एकमेकांवर येऊन आदळतात, आणि असें होतांच त्यांच्या एकीकरणामुळें, नवे नवे अणूकेंद्र तयार होतात. या क्रियेंत प्रचंड प्रमाणावर शक्ति बाहेर पडते. सूर्य व तारे यांमध्यें हायड्रोजन या मूलद्रव्याचा भरणा खूपच आहे. हान्स येथें या जर्मन शास्त्रज्ञानें गणित मांडून असें दाखवून दिलें कीं, सूर्य व तारे यांच्या गाभ्यांत ४ हायड्रोजन केंद्रें (Protons) एकत्र येऊन त्यांपासून हेलिअम हें द्रव्य तयार होतें. या क्रियेंत प्रचंड प्रमाणावर शक्ती बाहेर पडते. मात्र या चार हायड्रोजन केंद्रांना एकत्र आणण्यासाठीं, गाभ्यांत लाखों अंश सेंटिग्रेड ऊष्णतामान असलें पाहिजे. आज लाखों वर्षे निसर्गांत चालू असलेल्या या क्रियेची नक्कल शास्त्रज्ञांनीं हायड्रोजन बॉम्बमध्यें केली आहे. लाखों अंशाचें ऊष्णतामान निर्माण करण्यासाठीं, प्रथम अणूबॉम्बचा स्फोट घडवून आणावयाचा असतो आणि मग हायड्रोजन मूलद्रव्याचीं केंद्रें एकत्र आणून त्यांच्या संयोगापासून हेलिअम

मूलद्रव्य तयार करावयाचें. या क्रियेंत कांहीं वस्तूंचें रूपांतर शक्तीमध्यें घडून येत असल्यामुळें, फारच मोठ्या व स्फोटक स्वरूपांत शक्ती बाहेर पडते. सूर्याच्या गाभ्यांत वर्षानुवर्षे सुरू असलेल्या या क्रियेची नक्कल मनुष्यानें हायड्रोजनबॉम्बमध्यें केली आहे हें आतां तरी समजलें कीं नाहीं तुम्हाला? फक्त, सूर्यांतील हायड्रोजनबॉम्बच्या स्फोटामुळें मनुष्याला जीवदान मिळतें तर मनुष्यनिर्मित हायड्रोजन बॉम्बच्या स्फोटामुळें जीवनाश होतो.

आकाशांत स्वैरपणें विहार करणाऱ्या पक्षाकडे पाहूनच विमानाची कल्पना शास्त्रज्ञांना सुचली. विमानाचा एकंदर आकार जलपक्षाच्या (Seagull) शरीररचनेवरून व पंखांचे आकारावरून ठरला गेला आहे. पंधराव्या शतकांत लिओनार्डो व्हिन्सी या विख्यात इटालियन शास्त्रज्ञ कलावंतानें पक्षाप्रमाणें हवेंत तरंगण्याचा पहिला प्रयत्न केला. पक्षाच्या पंखासारखे कृत्रिम पंख तयार करून ते अंगाला जोडून हवेंत उतरण्याची कल्पना त्यानें काढली. परंतु त्याचा हा प्रयत्न अयशस्वी झाला. क्लेमंट ॲडलर या फ्रेंच संशोधकाला अगदीं बालवयांत, म्हणजे चौदा वर्षांचा असताना, असें वाटलें कीं, फुलपाखरांकडून हवेंत उडण्याची कला आपण समजून घ्यावी. आकारानें मोठ्या व सदान्कदा गुणगुणत राहणाऱ्या कॉकचेफर या पाकोळीला त्यानें पकडलें. तिचे नैसर्गिक पंख तोडून, स्वतः तयार केलेले कृत्रिम पंख त्यानें तिला जोडले व तिला हवेंत सोडून दिलें. परंतु ती तरंगू किंवा उडू शकली नाहीं.

ज्या राईट बंधूंना आधुनिक विमानाचे जनक म्हणून आपण मानतों त्यांचे या क्षेत्रांतले प्रयोग म्हणजे निसर्गकृतीची नक्कलच होय. विनयंत्राच्या ग्लायडरसंबंधीचे त्यांचे हे प्रयोग म्हणजे विमानाच्या शोधाचा 'श्रीगणेशा' होय. उंच डोंगरावर जाऊन तेथून मोठमोठ्या पतंगाचे सहाय्यानें पक्षाप्रमाणें हवेंतून खालीं उतरत येण्याचे प्रयत्न या राईटबंधूंनीं सुरवातीला केले.

'परिसाचा शोध' हेंही किमयाकारांचें फार दिवसांचें स्वप्न. फार पुरातन कालापासून देशोदेशींचे राजेमहाराजे, साधूसंन्यासी, शास्त्रज्ञ, जादूगार, शिशासारख्या हीन धातूचें रूपांतर सोन्यासारख्या मौल्यवान् धातूंत कसें करता येईल हा विकट प्रश्न सोडविण्याच्या उद्योगांत होते, हें शास्त्रांच्या इतिहासाकडे नजर टाकल्यास चटकन समजेल. एका मूलद्रव्याचें रूपांतर दुसऱ्या मूलद्रव्यांत कसें करता येईल हाच विकट प्रश्न 'परिसाच्या शोधा'च्या बुडाशीं दडून राहिला आहे हें सांगावयास नको. मात्र या प्रश्नाचें उत्तर मिळविण्यासाठीं १९ व्या शतकापर्यंत शास्त्रज्ञांना थांबावें लागलें. कारण हें काम, जरी आज हजारों वर्षें निसर्गांत चालू असलें तरी त्याचा थांगपत्ता १८९८ सालीं अगदीं प्रथमच शास्त्रज्ञांना लागला. फ्रान्समध्यें, सोरबोने विद्यापीठांत संशोधनकार्य करीत असलेल्या क्यूरी पतिपत्नींना १८९८ सालीं रेडिअम या किरणोत्सर्गी मूलद्रव्याचा शोध लागला. रेडिअम, युरेनिअम, थोरिअम, पोलोनिअम इत्यादि किरणोत्सर्गी द्रव्यांचें वैशिष्ट्य असें कीं, या द्रव्यांचे अणू अस्थिर असून त्यांचेमधून अगदीं आपोआप, हळू हळू पण सतत किरण व कण बाहेर पडत असतात. आणि याचा परिणाम म्हणजे या द्रव्यांचें रूपांतर दुसऱ्या मूलद्रव्यांत होत राहणें हा होय. असें रूपांतर होत होत अखेर त्यांचें शिसें बनतें व तेथेंच ही क्रिया थांबते. निसर्गांत सुरू असणाऱ्या या क्रियेची माहिती होण्याचा अवकाश! लागलेच



अनुक्रमणिका

आमचे शास्त्रज्ञ त्याची नक्कल करावयाला! नायट्रोजनच्या अणूवर, बंदुकींतून गोळ्या मारतात त्याप्रमाणें, अतिशय वेगवान् असे 'आल्फा' नांवाचे कण सोडल्यास, त्या अणूचें रूपांतर ऑक्सिजनच्या अणूंत होतें. पाऱ्याच्या अणूवर अशाच पद्धतीनें गोळ्यांचा मारा करून त्याचें सोन्याच्या अणूंत रूपांतर घडवून आणण्यांत अमेरिकन शास्त्रज्ञांनीं यश मिळविलें आहे. हातीं कथलाचा वाळा असलेल्या सोनूबाईला आतां लाज वाटायची जरूरी नाहीं. कथलाच्या वाळ्याचें रूपांतर सोन्याच्या वाळ्यांत करवून नामधारी सोनूबाई आतां खरीखुरी सोनूबाई व्हावयाला कांहींच हरकत नाहीं. या विश्वांतल्या सर्व मूलद्रव्यांची संख्या आतांपर्यंत ९२ म्हणून समजली जात होती. परंतु कृत्रिम पद्धतीनें मूलद्रव्यें तयार करावयाची कला, शास्त्रज्ञानीं निसर्गापासून आत्मसात्, केल्यामुळें, आतां एकूण मूलद्रव्यांची ही संख्या १०१ पर्यंत गेली आहे. मग काय? वठवली कीं नाहीं निसर्गांतील क्रियांची अगदीं हुबेहूब नक्कल आमच्या या शास्त्रज्ञांनीं? कल्पना निसर्गाची, कसब शास्त्रज्ञांचें!

या नकलाकार शास्त्रज्ञांच्या, एका अगदीं अलिकडच्या निर्गनकलेची माहिती, आतां मी तुम्हाला सांगतों. तिचें नांव दूरचित्रवाणी (Television). रेडिओच्या शोधानें सातासमुद्रापलिकडचा आवाज तुमच्या कानांत आणून सोडला. त्यामुळें मनुष्याचे कान अगदीं बेहद्द खूष होऊन गेले. पण तिकडे त्याचे डोळे फुगून बसले त्याची काय वाट? या डोळ्यांना खूष करण्यासाठीं, त्याच डोळ्यांची नक्कल शास्त्रज्ञानीं वठवून 'टेलिव्हिजन' जन्माला आणला. डोळ्याला प्रतिडोळा आणून दिला. कांट्यानेंच कांटा काढला असें म्हणा हवें तर! कसें तें पहा. आपल्या डोळ्यांत अगदीं पुढच्या भागांत एक फुगट कांच (Lens) असते. तिच्यापासून थोड्याशा अंतरावर एक पडदा (Retina) असतो. पडद्याचा पृष्ठभाग म्हणजे अतिसूक्ष्म असे लाखों ठिपकेच. प्रत्येक ठिपका सूक्ष्म अशा मज्जातंतूनें मेंदूला जोडलेला असतो. डोळ्यासमोर एकादी वस्तू अगर दृश्य येतांच त्या वस्तूवरील निरनिराळ्या भागांमधून कमी अधिक प्रमाणांत बाहेर पडणारा प्रकाश डोळ्यांतील फुगट कांचेंतून आरपार जाऊन, ठिपक्यांनीं युक्त असलेल्या पडद्यावर पडतो असें होतांच संबंधित ठिपक्याला जोडलेल्या मज्जातंतूकडून त्या प्रकाशाची खबर मेंदूला मिळते. निरनिराळ्या मज्जातंतूकडून आलेल्या बातम्यांवरून अखेर डोळ्यांपुढील वस्तूचा पूर्ण स्वरूपांत त्याला बोध होतो. ज्याप्रमाणें एकाद्या कापडाचा तुकडा म्हणजे अगदीं सूक्ष्म अशा आडव्याउभ्या धाग्यांचें पद्धतशीरपणें विणलेलें जाळें असें आपण म्हणतों त्याप्रमाणे मेंदूला डोळ्यासमोरील वस्तूचा जो बोध होतो तो आडव्याउभ्या, काळ्यापांढऱ्या अशा सूक्ष्म ठिपक्यांच्या जाळ्याच्या स्वरूपांत होतो असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. दूरचित्रवाणीच्या कल्पनेची सुरवात वरीलप्रमाणेंच आहे. १८८० सालीं या शोधाचा पाया प्रथम घातला गेला. त्या वेळेस कशा तऱ्हेची व्यवस्था आंखली जात असे तें पहा. ज्या वस्तूचें दूरचित्रण करावयाचें असेल तिचें प्रतिबिंब एका पडद्यावर पाडण्यांत येई. हा पडदा नेहमींसारखा साधासुधा नसे. प्रकाशाला संवेदनशील (Sensetive) असणाऱ्या विद्युत्घटांचा (Photocell) तो बनलेला असे. या प्रत्येक घटाला एक विद्युत्-वाहक तार जोडून तिचेवर एक 'विद्युत् दिवा' लावला जाण्याची व्यवस्था केली जाई. दूरच्या ज्या जागीं हें चित्र पहावयाचें असेल त्या जागीं एक पडदा बसविला जाई. पडद्यावर लहान लहान दिवे बसविलेले असत. या दिव्यांची आंखणी, मांडणी, थेट पहिल्या ठिकाणच्या पडद्यावरील घटांच्या मांडणीबरहुकूम केलेली असे. चित्रित करावयाच्या वस्तूमधून विवक्षित घटावर ज्या प्रमाणांत कमीअधिक प्रकाश पडे त्या प्रमाणांत घटामधून विद्युत्प्रवाह निर्माण होई आणि त्यामुळें या विद्युत्प्रवाहावर पेटणारा दिवा तितक्याच प्रमाणांत मंद किंवा प्रखर प्रकाश बाहेर टाकी. अशा तऱ्हेनें मूळ वस्तूचें चित्र या दिव्यांकडून बाहेर पडणाऱ्या प्रकाशाच्या प्रमाणावरून म्हणजे काळ्या पांढऱ्या ठिपक्यांचे स्वरूपांत ओळखता येई. आहे कीं नाहीं डोळ्याच्या कार्याची नक्कल या कृतींत स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेली?"

मलाही एक नवेंच उदाहरण आठवलें. मी म्हणालों, "का हो दासबाबू, आपला फोटो काढण्याचा कॅमेरा हा देखील डोळ्यांची नक्कलच म्हणता येईल कीं नाहीं? फक्त डोळ्यांतील फुगट कांचेचा बांकदारपणा जसा दृश्याच्या अंतराबरहुकूम कमी जास्त करता येतो, तसा तो कॅमेऱ्यांत करता येत नाहीं एवढाच काय तो या दोहोंत मुख्य फरक!"

"बरोबर, अगदीं बरोबर! एकूण तुम्हाला देखील शास्त्रज्ञांच्या निरनिराळ्या शोधांत निसर्गाच्या नक्कलांचा उमटलेला ठसा दिसूं लागला म्हणायचा! नैसर्गिकपणें पडणाऱ्या पावसाची नक्कल, कृत्रिमपणें पाऊस पाडून करणें, सूर्यप्रकाशांतील नैसर्गिक अल्ट्राव्हायोलेट व इन्फ्रा रेड किरणांची नक्कल, कृत्रिमपणें हे किरण देणाऱ्या दिव्याकरवीं करणें, इत्यादि अनेक प्रकार तर शास्त्रज्ञ राजरोसपणें आज करीत आहेत. अशीं आणखी बरींच उदाहरणें, शास्त्रज्ञांकडून होणाऱ्या निसर्गाच्या नकलासंबंधीं देता येतील."

बाबूचें बोलणें संपलें. त्यांनीं आपलें म्हणणें सोदाहरण सिद्ध केलें होतें. मला तें पटलें. निरनिराळ्या शास्त्रीय शोधांमागील बैठकी, एका अगदीं निराळ्याच दृष्टिकोनांतून त्यांनीं मला समजावून सांगितल्या होत्या. माझ्यानें गप्प बसवेना. मी त्यांना म्हणालों, "खरंच दासबाबू, तुम्ही आतांपर्यंत वर्णिलेले व क्रांतिकारक म्हणून समजले जाणारे हे सर्व शोध म्हणजे निसर्गांत आज वर्षानुवर्षें चालू असणाऱ्या घटनांची मनुष्यानें केलेली हुबेहूब नक्कलच नाहीं तर काय? मात्र ही नक्कल हुबेहूब वठवून, ती जणू अस्सल असल्याचा भास उत्पन्न केल्याबद्दल शास्त्रज्ञांचें कौतुक करावयाला नको का? लहान मुलें अनुकरणप्रिय असतात, खरें कीं नाहीं? आपल्या आईबापांचें व भोंवतालच्या माणसांचें अनुकरण, किंवा नक्कल म्हणा हवी तर, लहान मुलें करीत असतात. माणसें हीं तर निसर्गाचीं लेकरेंच. आणि शास्त्रज्ञ हे कांहीं झालें तरी माणसेंच. मग त्यानीं जर आपल्या शोधांमध्यें, निसर्गाची नक्कल केली तर त्यांत एवढें बिघडलें कुठें?"

• • •



तें आठवलं कीं
तो अंग अंग जळतो.
परंतु

# विडा न रंगे काताविण!

इंद्रायणीचें पत्र आलें आणि मी हरखून गेलों. कृष्णमेघांच्या दर्शनानें मोराचा पिसारा फुलावा तसें तिचें पत्र वाचून माझें मन मोहरून आलें. तक्रार करीत का होईना पण शेवटीं माझ्या म्हणण्याला ती कबूल झाली होती. मी सांगितलेल्या गाडीनें, मी घेऊन दिलेली साडी नेसून आणि मला आवडते तशी केशरचना करून ती आज मला भेटावयास येणार होती. आजच्या ह्या संकेतांतून काय निष्पन्न होईल ह्याची तिला चांगली कल्पना होती. आणि म्हणूनच मी वर्षभर पाठीमागें लागूनहि तिनें टोलवाटोलवी केली होती. कधीं लटक्या रुसव्यानें तर कधीं दटावून मला गप्प केलें होतें. आणि प्रत्येक वेळीं माघार घेऊन माझा हिरमोड होत होता. सीमेवर येऊनहि स्त्रीसुलभ सावधपणानें ती माघारी फिरत होती. तिच्या ह्या सावधपणाचा मला राग येत होता. पण मी कांहीं करूं शकत नव्हतों. धड तोडूनहि टाकतां येत नव्हतें आणि लाडीगोडीनें चिकटताहि येत नव्हतें. झोंपाळ्यावर असावें, झोंका घेण्यासाठीं पाय जमिनीवर टेंकावे पण तोल जाण्याच्या भीतीनें आयत्या वेळीं जमिनीवरचे पाय सुटूं नयेत तसें तिचें झालें होतें. सुखाची गोडी चाखायची असेल तर जमिनीवरून पाय सुटावे लागतात, थोडा तोल जावा लागतो आणि बेफिकिरपणें वागावें लागतें. सावधपणाला थोडा वेळ विसरावें लागतें आणि धोका पत्करावा लागतो. वयाच्या विसाव्या वर्षीं कळलेल्या ह्या गोष्टींची मी आजतागायत जपणूक केली. ट्रॅपीझवर काम करणाऱ्या माणसाच्या बेधडकपणानें मी आयुष्याकडे पाहिलें. आणि आतां माझी होऊं पाहणाऱ्या इंद्रायणीनेंहि तसेंच आयुष्य जगावें असें मी तिला सांगत होतों. माझ्या बोलण्यांत तिला स्वार्थाचा वास येत होता आणि ती मला एकसारखी नकार देत होती. जसें कांहीं ज्या गोष्टीचा मी आग्रह करीत होतों त्यानें ती खड्ड्यांत पडणार होती; तिला एकटीला दुःख होणार होतें आणि मला तेवढें सुख मिळणार होतें!

मी पुन्हा एकदां तिचें पत्र वाचून पाहिलें आणि स्वतःशींच समाधानानें हंसलों. नाखुषीनें का होईना पण तिनें आपला रुकार कळवला होता. पत्रांत तिनें फक्त चारच ओळी लिहिल्या होत्या. त्याहि तुटकपणें. आणि नेहमींप्रमाणें नोटपेपरला सेंटचा वास येत नव्हता. पण ह्या गोष्टी मामुली होत्या. सुखाच्या क्षणीं नसत्या शंकाकुशंका काढीत बसण्याचा माझा स्वभाव नव्हता. ही वेडी मुलगी साध्यासुध्या गोष्टींचा उगाच बाऊ करीत होती. मी तिची हरतऱ्हेनें समजूत घालायचा प्रयत्न केला होता. थोडासा रागावलों होतो, चिडलोंहि होतों. अनेक वेळां तिला खुर्दीत आणून योग्य वेळेला माझ्या मनांतला हेतू तिला सांगितला होता. पण माझ्याबरोबर एका मर्यादेपर्यंतच जावयास ती तयार होती. कुलीन घराण्यांत वाढलेल्या ह्या शालीन मुलीला माझे विचार फार पुढें गेलेले वाटत. आईवडलांच्या धाकांत आणि मोठ्या भावांच्या पहाऱ्यांत वाढलेल्या या मुलीला माझी मागणी अवास्तव वाटे. इतक्या जवळ येऊनहि तिनें मला

दोन हातावर ठेवलें होतें. टाळाटाळी करून माझा हिरमोड केला होता. नाना सबबी सांगितल्या होत्या आणि नेहमींच माझ्यापासून ती दूर राहिली होती. अगदीं एकांतांत खुषींत असतांहि ती सावधपणें वागली होती. एकदां ती विशेष खुषींत होती तेव्हां मी तिच्याशीं लगट करायचा प्रयत्न केला होता. सहज म्हणून तिचे हात हातांत धरले होते. आणि गोंडा पुरा झाल्यावर तो फुलविण्यासाठीं पटवेकरी टिचकी मारतो तशी ती खुषींत असतांना तिला जास्त खुलविण्यासाठीं तिच्या गोबऱ्या गालावर चापटी मारली होती. पण त्यामुळें तिच्या वृत्ति फुलण्याऐवजीं एकदम कोमेजून गेल्या. तिनें माझे हात सोडून दिले आणि मला दटावण्यासाठीं तक्रारीच्या सुरांत म्हटलें, "हें रे काय मोहन! —" तिचा नापसंतीचा स्वर माझ्या पुरता लक्षांत आला होता. पण जमलें तर पहावें म्हणून मी, "त्यांत काय झालं?" असं हंसत हंसत विचारून पुन्हा एकदां तिच्या गालावर टिचकी मारली होती. पण माझ्या ह्या धिटाईनें एकदम बेरंग झाला. ती रुसली आणि म्हणाली, "असें कांहीं मला चालावयाचें नाहीं—"

"असें कांहीं म्हणजे?"

"उगाच खट्याळपणा करूं नको. चहाटळपणा किती करशील?"

"अग पण तुझ्याजवळच करतों आहे ना?"

"होय—पण त्यालाहि अजून वेळ आहे—"

"वेळ आहे म्हणे! किती दिवस थांबायचं मी—"

"इतके दिवस थांबलास तसाच आणखी थोडे दिवस...मी तुझीच आहे ना!" आणखी बोलतां बोलतां, मी रागावलों आहे असं वाटून ती जवळ आली. नशीब माझं कीं ती माझ्या इतकी जवळ तरी आली होती.

यौवनानें मुसमुसलेल्या एखाद्या मुलीजवळ उभं राहण्यांतहि कांहीं कमी सुख नसतं. फुलांनीं बहरलेल्या एखाद्या लतामंडपांत बसलं तरीहि सुगंध येतो. पण फूल नाकाजवळ नेऊन त्याचा सुगंध लुटण्यांत और मजा असते. आणि जें आपलें आहे त्याला आपण हात लावायचा नाही तर मग कुणी! ती जवळ उभी असल्यामुळें तिच्या मखमली देहाचा चुटपुटता स्पर्श माझ्या शरीराला होत होता. तिचा श्वासोच्छ्वास मला जाणवत होता. आणि वरखालीं होणारें वक्षःस्थळ मला दिसत होतें. मी तिच्याकडे पाहूं लागलों तेव्हां ती एकदम दूर सरकली आणि म्हणाली, "असा पाहूं नको. मला तुझी भीति वाटते—" तरीहि मी तिच्याकडे पहात राहिलों तेव्हां विनवणीच्या स्वरांत ती म्हणाली, "नको ना—"

वेडी कुठली! तिला वाटलं कीं नुसत्या जवळ उभं राहण्यानेंच मी बावचळलों. आणि अशा बावचळण्यानें तिला न आवडणारं वेडंवांकडं मी कांहींतरी करून बसेन. ही माझी इंद्रायणी फार भोळी होती, फार भोळी! तिला काय ठाऊक कीं माणसाला नशा चढते ती दारू पिऊन; नुसती हुंगून नव्हे!

पण तिची आणि माझी प्रथम दृष्टभेट झाली तेव्हां तिला नुसती पाहूनच मी झिंगलों होतों ही गोष्ट नाकबूल करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मामेभावाच्या लग्नांत ही मुलगी माझ्या दृष्टीस पडली होती माझें लक्ष वारंवार तिच्यावर जात होतें. सौंदर्याची मला विशेष आवड आहे आणि चोखंदळपणा तर माझ्या रक्तांत आहे. त्यामुळें अनेक मुलींना मी पाहिलें होतें आणि नाकारलें होतें. लग्नाच्या बाजारांत मला चांगला भाव होता. वडलांची पुण्याई पाठीशीं होती, स्टीम नॅव्हिगेशन कंपनींत चांगल्यापैकीं नोकरी होती आणि उमदेपणाबरोबर

माझा स्वभावहि लाघवी होता. असें स्थळ आपल्या मुलीला लाभावें असें मुलीच्या बापाला वाटलें तर त्यांत कांहीं वावगें नव्हतें. मी रोज नव्या नव्या मुली पहात होतों आणि पाटोपाठ नकार देत होतों. पण इंद्रायणी दृष्टीस पडली आणि जें मी इतके दिवस शोधीत होतों तें मिळाल्याचा आनंद झाला. जणू कांहीं कांहींतरी हरवलें होतें आणि अचानक गवसलें होतें! जणू कांहीं पूर्वसंकेतानुसारच आमची दृष्टभेट होत होती. ही टेंगणी टुसकी मुलगी माझ्या मनांत एकदम भरली होती. फुलांच्या झेल्याप्रमाणें ती गुबगुबीत होती. तिचे डोळे मोठे आणि काळेभोर होते. हंसताना ओंठांबरोबर तिच्या डोळ्यांचीहि मजेदार हालचाल होई. तें हास्य इतकें गोड आणि लाघवी होतें कीं वाटे वरच्यावर टिपून घ्यावें. तिला पाहतांच क्षणीं तिचे गोबरे गाल मनसोक्त कुस्करावेत अशी इच्छा होई. तिचें रूप तिच्या चालण्याबोलण्यांतूनहि प्रत्ययास येत होतें. शारदीय पौर्णिमेसारखी ती शांत आणि मनोहारी होती. लग्नाला आलेले लोक पांगले तेव्हां तीहि निघून गेली. ती दृष्टीआड झाली तरीहि माझ्या मनांत ठाण देऊन राहिली. शब्द संपले तरी सूर रहावे तशी ती गेली तरी तिची आठवण राहिली. संगीताची लकेर कानांत घुमत रहावी किंवा पदार्थाच्या रुचीची मिठी जिभेला पडावी तशी ती डोळ्यासमोर फिरत राहिली. ही कुटची, कोण, कुणाची ह्या व्यवहारी चौकशा मी सावधपणें केल्या. हिरकणी नुसतीच चांगली असून चालत नाहीं. तिला उठाव देणारें कोंदणही तितकेंच उठावदार असावें लागतें. टाण्याच्या अजिंक्य धाकुलांची ही मुलगी कुलशीलाची होती. चांगल्या घराण्यांतले सगळे संस्कार तिच्यावर झाले होते. चार माणसांत ती वावरलेली होती. तिच्याविषयींच्या ह्या गोष्टी कळल्या तेव्हां ती मला सांगून येईल अशी मी तजवीज केली. आणि नेहमींप्रमाणें तिला पाहण्याचा फार्सही केला. तावडतोब रुकार कळवला. देण्याघेण्यासंबंधीं रुक्ष घासाघीस न करण्याबद्दल वडलांजवळ सूचक बोललों. वडलांनींहि माझा नूर ओळखला आणि आषाढांतला पहिला मुहूर्त नक्की केला. सगळें मनासारखें झालें होतें. इतक्या मुली नापसंत केल्या त्याचें शेवटीं चीज झालें होतें. माझ्या मनांत शिरलेली आणि ठाण देऊन बसलेली ही मुलगी आतां कायमची माझी होती. सुगंधाच्या लहरीप्रमाणें ती माझ्याकडे येणार होती आणि फुलणाऱ्या फुलाप्रमाणें माझा संसार विकसित करणार होती. सगळें कसें व्यवस्थित होणार होतें!

आणि सगळें ठरावाप्रमाणें झालें असतें तर कुणी सांगावें, जें मला हक्कानें मिळणार होतें तें मिळविण्यासाटीं ह्या मर्यादशील मुलीची मी एवढी खुशामतहि केली नसती. त्याचा मुहूर्त बदलू आला आणि ध्यानींमनीं नसतांना तिची आजी मधेंच अडमडली. लाडक्या नातीची आजी वारली आणि लग्न लांबणीवर पडलें. मुलीच्या आईवडिलांनीं मला बरोबर ओळखला होता, इंद्रायणीवर मी लट्टू आहे हें त्यांनीं बरोबर ओळखलें होतें. त्यामुळें लग्न लांबणीवर टाकल्यानें त्यांना कांहीं विशेष धोका वाटत नव्हता. आषाढींतला सरता मुहूर्त निश्चित साधता आला असता; पण दोन्हींकडच्या वडीलधाऱ्या मंडळींनीं मला विचारांत न घेतां वैशाखांतल्या पहिल्या मुहूर्तावर लग्न व्हावें असें ठरवून टाकलें. आणि मी हात चोळीत स्वस्थ बसून राहिलों.

माझे भावी श्वशुर आणि मेहुणे मोठे धोरणी होते. पण त्यांचा हा धोरणीपणाच माझ्या फायद्यावर पडला होता. माझें लग्न ठरलें आहे आणि आतां मी बांधला गेलों आहे ह्याचा मला विसर पडूं नये म्हणून ते मधून मधून मला टाण्याला आपल्या घरीं बोलवीत. जांवयाच्या इतमामानें वागवीत. माझें कोडकौतुक करीत. नोकरीधंद्याविषयीं कांहीं खुबीदार प्रश्न विचारीत. आणि मी कंटाळलों आहे असें वाटलें म्हणजे मुलीला हांक मारून, "जा बेटा, तुम्हाला फिरून यायचं असलं तर फिरून या—" असं माझ्याकडे पाहून मिस्किलपणें म्हणत.

त्यांची ही भावडी मुलगी माझ्याबरोबर फिरायला बाहेर पडली तरी कांहीं विशेष बोलत नसे. बोलण्याचें काम मीच करीत असें. मी कांहीं नवलाची गोष्ट सांगितली म्हणजे, "खरं का!" असं म्हणून ती आपले टपोरे डोळे माझ्यावर स्थिर करी. माझ्याकडे कौतुकानें पाहून गालांतल्या गालांत हंसल्यासारखं करी. पण आपणहून कांहीं बोलत नसे. माझ्या







अनुक्रमणिका

बरोबर असली तरी फार संकोचानें वागे. मोजकंच बोले आणि मोजकंच हंसे. तिचा हा मर्यादशील स्वभाव माझ्या दृष्टीनें एका मर्यादेपर्यंतच चांगला होता. अनेक वेळां गांठीभेटी होऊनहि माझी कांहींच प्रगति होत नव्हती. पाण्यांत पडलेल्या कागदाच्या कपट्यानें प्रवाहाबरोबर वहात न जातां जागच्या जागीं घोंटाळत रहावें तसें तिच्या बाबतींत माझें झालें होतें. तिचा हात हातांत घ्यायचा झाला किंवा तिच्या शरीराला कांहीं कारणानें स्पर्श करायचा झाला तरी मला एक तऱ्हेचा धाक वाटे. बळेंबळेंच मी तिचा हात हातांत घेतला तरी ती आपलें शरीर संकोचून घेई आणि पाहता पाहता तिचा हात थंड पडे. माझ्याबरोबर ती कधीं सिनेमाला आली तरी शेंगदाणे सोलून देण्यापलीकडे किंवा नुसता हात हातात राहूं देण्यापलिकडे कांहीं करीत नसे. प्रेमाचा डाव रंगवायचा असेल तर दोघंहि भिडू हुशार असावे लागतात. साथीला प्रतिसाथ मिळाली तरच हा डाव रंगतो; नाहींतर विरजतो. तिच्याकडून साथ मिळत नसल्यामुळें मी अजून तिच्या बोटांतच रेंगाळत होतों. तिचे कपाळावर आलेले केंस सहज म्हणून मागें सारण्यापलिकडे किंवा हातांत धरलेल्या हाताचा तळवा भीत भीत दाबण्यापलिकडे माझी मजल जाऊं शकत नव्हती. औत्सुक्याच्या उसळीसरशीं एखादे वेळेला ती मला साथ देई पण लगेच सावध होई. एखादें पाऊल पुढें टाकून माझी मर्जी संपादन करावी असें कधीं कधीं तिलाहि वाटे पण लहानपणापासून मनावर झालेल्या संस्कारांमुळें ती जागच्या जागेवर थबकून राही. मी अपेक्षेनें तिच्याकडे पाही पण माझा विरस होई. एखादे वेळेला मी तिला नवी साडी किंवा कांहीं घेऊन दिलें म्हणजे कृतज्ञतेच्या दृष्टीनें ती माझ्याकडे पाही. ही मुलगी फार भोळी आणि निरागस होती. जें हक्काचें आहे तें घेताना एवढी कृतज्ञता कशाला! मी तिला म्हणे, "मी तुला साडी नाहींतर बटवा घेऊन दिला तर त्याचें तुला एवढें काय वाटतें?"

"म्हणजे!"

"वेडे, मी तुझाच नाहीं का! तुला लागेल ती वस्तू घेऊन देणें हें माझेंच काम नाहीं का?—"

"तें खरें! पण तुम्ही असें कांहीं प्रेमानें घेऊन दिलेंत म्हणजे त्याचें मला फार वाटतें—"

"खरें ना! मग तूंहि असें कांहीं दिलेंस तर त्याचें मला फार वाटेल–"

"मी बापडी तुम्हांला काय देणार!"

"भोळी!" मी हंसलों आणि मला जें बोलावयाचें होतें तें मी डोळ्यांनीं सुचवलें.

"चला--कांहींतरी बोलूं नका." आणि बोलतां बोलतां ती एकदम लाजली. मी तिच्या हनुवटीला स्पर्श केला तेव्हां तिनें म्हटलें, "तुम्हांला दुसरं कांहींच सुचत नाहीं—"

"असं? खरं-पण फक्त तूं भेटल्यावर." आणि बोलतां बोलतां माझा आवाज घोगरा होऊं लागला म्हणजे ती म्हणे, "चला, आपण फिरायला जाऊं. उघड्यावर फिरलें म्हणजे तुम्हाला बरें वाटेल–"

म्हणजे मी समजत होतों इतकी ही मुलगी खास भोळी नव्हती. तिच्या कलाकलानें घेतलें म्हणजे सगळें कांहीं जमण्यासारखें होतें. प्रेयसीला वश करण्याकरतां जेवढे उपचार करावे लागतात तेवढे सारे माझी बायको होऊं पाहणाऱ्या त्या मुलीच्या बाबतींत मला करावे लागणार होते. प्रियाराधन करताना बिचकत बिचकत, सांभाळून वागावें लागतें. कारण अशा वेळेतींत संबंध नक्की झालेले नसतात. सरशी होण्याची जेवढी खात्री असते तेवढीच डाव उलटण्याचीहि भीति असते. जेव्हां संबंध नक्की झालेले नसतात तेव्हां असें वागणें ठीक असतें. त्याचें कांहीं विशेष वाटतहि नाहीं. पण ह्या मुलीचें आणि माझें नातें नक्की ठरलेलें असतांना असें वागण्याचा काय अर्थ होता? बाटलींत भरून ठेवलेली चांफेकळी आपली आहे हें ठाऊक असावें पण ती बंदिस्त असल्यामुळें तिचा सुगंध मात्र घेतां येऊं नये तसें इंद्रायणीच्या बाबतींत माझें होत होतें. तिच्याकडून ज्या अपेक्षा मी करीत होतों त्यांत माझ्या दृष्टीनें वावगें असें कांहींच नव्हतें. ठरल्याप्रमाणें आमचें लग्न वेळच्या वेळीं झालें असतें तर जें मी इच्छित होतों तें मला केव्हांच मिळालें नसतें काय? त्याच्यासाठीं संकोच आणि रुसवा-फुगवा कशाला? ह्याविषयीं मी तिला एकदां स्पष्टपणें विचारलें तेव्हां ती एकदम रागावली. पाहतां पाहतां ती लाल झाली, डोळ्यांची उघडझांप भराभर होऊं लागली आणि तिच्या नाकपुड्या थरथरूं लागल्या. मी असें कांहीं बोलावें ह्याचा तिला संताप आला होता–पण केवळ माझ्यावरील प्रेमानें ती तो शब्दानें व्यक्त करीत नव्हती. मी तिच्याकडे पहात राहिलों तेव्हां रडवेली होऊन तिनें विचारलें,

"पण मी तुझीच नाहीं का!—"

"होय, पण लग्नानंतर–आधीं नाहीं–" उत्तरांतली खोंच तिला समजली असावी. ती जवळ आली आणि म्हणाली, "असं काय बरं!–" जवळ येऊन ती असं कांहीं बोलूं लागली म्हणजे मी विरघळतों. तिचें मन दुखावणें माझ्या जिवावर येतें. पण मी तिला आज अशीच सोडणार नव्हतों. मी थोडेसें रुसल्यासारखें केलें आणि म्हटलें, "मला ठाऊक आहे; मी तुला आवडत नाहीं—"

"कुणी सांगितलं?—"

"कुणी सांगायला कशाला हवं! मला काय कळत नाहीं? तूं कधीं आपणहून माझ्याकडे येत नाहींस; हात हातांत घेऊं देत नाहींस."

ती थोडा वेळ थांबली आणि माझ्याकडे तशीच पहात राहिली. मी केलेल्या आरोपावर देण्यासारखें उत्तर तिच्यापाशीं नव्हतें. माझ्याकडे पाहता पाहता तिच्या मनांत काय आलें कुणास ठाऊक, पण तिनें माझा हात एकदम हातांत घेतला आणि म्हणाली, "माझ्यावर रागावलास का!–" मी तिचा हात सोडून दिला आणि तिच्याकडे रोखून पहात म्हटलें, "इंद्रायणी, हें माझ्या प्रश्नाचें उत्तर नव्हे–" तिनें माझी नजर

# गोरी मोरी



—वसंत बापट

[ चाल : काळे काळे केस तुझे...... —बा. भ. बोरकर ]

गोरे गोरे गाल तुझे गोरेमोरे झाले
गोरा गोरा चन्द्र तुझ्या भाळावरी डोले

गोरा गोरा कण्ठ तुझा, गोरा गोरा खांदा
अंबालाही दीठ फुटे असा गोरा बांधा

गोऱ्या गोऱ्या पाठीवरी कंचुकिच्या गांठी
गोऱ्या पोटावरी रुते चोळी जरीकांठी

गोऱ्या गोऱ्या केळिचा ग गोरा गोरा गाभा
गोऱ्या गोऱ्या पावलांची लाल-लाल गाभा

गोऱ्या शुभ्र चांदण्यांत गोरी तुझी काया
माझ्या काळ्या मनीं पोरी, तिची गोरी छाया !

• • •



टाकून हलक्या आवाजांत म्हटलें, "असें कांहीं करायला मला आवडत नाहीं—लग्नापूर्वी असें कांहीं व्हावें हें मला पटत नाहीं."

"पटत नाहीं म्हणजे! ह्या गोष्टी तुला आवडत नाहींत—"

"आवडतात—पण योग्य वेळीं घडल्या तर."

"म्हणजे लग्नानंतर—"

"होय—लग्नाआधीं असें कांहीं घडावें असें मला वाटत नाहीं—पटतहि नाहीं—आणि घडलें तरी मानवणारहि नाहीं—" ती फारच तुटकपणें बोलत होती. ह्या वेड्या मुलीची कशी समजूत घालावी तें मला कळत नव्हतें. ही मुलगी माझी बायको होणार होती. लौकिकदृष्ट्या तसें जाहीरहि झालें होतें. मग असें असताना ह्या मुलीनें मला आडकाठी कां करावी ?—मी कितीहि युक्तिवाद केला तरी ती ऐकणारी नव्हती. ती लग्नाआधीं माझ्यापासून दूर राहूं इच्छित होती तें स्त्रीसुलभ संकोचानें, सावधपणानें कीं लहानपणापासून मनावर झालेल्या संस्कारांमुळें ? माझ्याविषयीं मन तून साशंक असल्यामुळें, भीतीनें कीं लग्नाचें मोल दिल्याविना लग्नानंतरचें सुख भोगून मी मोकळा होईन म्हणून ? एकदां सोक्षमोक्ष लावून टाकावा म्हणून गेल्या खेपेला ती मला भेटली तेव्हां मी म्हटलें होतें, "माझ्याविषयीं तुला अजून विश्वास वाटत नाहीं—माझ्याविषयीं तुझ्या मनांत अजून अंदेशा आहे—"

"कुणी सांगितलं? विश्वास वाटत नसता तर तुम्ही बोलावल्याबरोबर तुमच्याकडे आले नसते. नाटकसिनेमाला तुमच्याबरोबर फिरले नसते. घटकान्घटका एकांतांत बोलत बसले नसते—"

"त्यांत विशेष असें तूं काय केलेंस ! ह्या गोष्टी माझ्यासाठीं दुसऱ्य कुणाहि मुलीनें केल्या असत्या—"

"दुसऱ्या कुणी तुमच्यासाठीं आणखीहि कांहीं केलें असतें—" ती मिस्किलपणें बोलत होती कीं रागावून, निग्रहानें बोलत होती तें मला कळत नव्हतें. पण तिला डिंवचायची असेल तर हीच वेळ चांगली आहे असें पाहून मी म्हटलें, "खरें ना ? पण तूं मात्र माझी होणार असून माझ्यासाटीं कांहीं करीत नाहींस—कांहीं करावें असें तुला वाटत नाहीं—" पण ती कांहीं बोलली नाही. गप्प राहिली. तोंड फिरवून दुसरीकडे पाहूं लागली. मी तिचे पाठीमागून खांदे धरले आणि म्हटलें, "इंद्रायणी, एकांतांत येऊन तुला माझ्याविषयीं कांहींच कसें वाटत नाहीं ?"

"म्हणजे—"

"म्हणजे काय तेंहि मीच तुला सांगायला हवें काय ? पुरुषाचा नुसता स्पर्श झाला तरी मुली पेटून निघतात. सहवासांत येऊन त्यांच्या भावना अनावर होतात—पण तूं मात्र नेहमींच थंड राहतेस—मी तुझा हात हातांत घेतला तरी तूं कांहींच झालें नाहीं अशी वागतेस. इंद्रायणी, मला वाटतें—" माझ्या शब्दांचा योग्य उपयोग होत होता. तिचें रक्त सळसळूं लागलें होतें. कानाच्या पाळ्या लाल होऊं लागल्या होत्या. कांहीं मिळणार असेल तर तें आतांच मिळेल म्हणून मी म्हटलें, "तूं अशी नेहमीं थंड राहतेस—तूं माझी बायको होणार आहेस पण तुझ्याविषयीं मला शंका येते."
शेपटीवर पाय पडलेली नागीण ज्या आवेशांत उलटी फिरते त्या झटक्यांत ती एकदम मागें वळली आणि, "काय म्हणालांत ! पुन्हा एकदां बोला—" असें म्हणत माझ्याकडे रोखून पाहूं लागली. तिच्या मनात उठत असलेले नाना तरंग तिच्या टपोऱ्या डोळ्यांकडे पाहून मला कळत होते. आधींच टपोरे असलेले तिचे डोळे आतां अधिकच विस्फारले होते. अधिकच गडद

झाले होते. आणि असहाय्यता व माझ्याविषयींच्या चिडीनें पापण्यांची उघडझांप आतां भराभर होऊं लागली होती. असहाय्य चिमणीनें फडफडत रहावें तशा तिच्या पापण्या थरथरत होत्या. पहाता पहाता तिच्या डोळ्यांत पाणी जमा होऊं लागलें तेव्हां मी तिचा हात हातांत घेतला आणि म्हटलें, "इंद्रायणी–" माझा हात तिनें तसाच हातांत राहूं दिला. तिचा हात गरम होत होता आणि एकीकडे घामानें ओला होत होता. तिनें आपल्या ओल्या तळव्यानें माझा हात दाबल्यासारखा केला आणि म्हटलें, "रघुनंदन, तूं सांगशील तशी मी वागणार आहे–" ती असें बोलत होती तरी बोलतांना तिला कष्ट पडत होते. पण माझें तापलेलें रक्त या गोष्टीकडे लक्ष द्यायला आतां तयार नव्हतें. मी तिला एकदम जवळ घेतली आणि विचारलें, "खरंच !"

"अगदीं खरं !" आणि माझ्या छातीवर डोकें टेकून ती तशीच पडून राहिली. माझ्या हाताची हालचाल होऊं लागली तेव्हां तिनें माझ्या गालाला हात लावला आणि म्हटलें, "पण नंतर, आज नाहीं बरं का ! पुन्हां येईन तेव्हां––" आणि मला विश्वास वाटावा म्हणून तिनें मान हलवली आणि 'अगदीं खरं–' असं म्हणून मला थोपटल्यासारखं केलं.

आणि आज पुन्हां तिनें आपला रुकार कळवला होता. आमचें बोलणें झाल्याप्रमाणें मी सांगितलेल्या गाडीनें आणि मी घेऊन दिलेली साडी नेसून ती आज मला भेटावयास येणार होती. इतके दिवस तिनें टोलवाटोलवी केली होती पण आतां माझ्या म्हणण्याला ती कबूल झाली होती. खऱ्याखुऱ्या अर्थानें इंद्रायणी माझी होणार होती. गेल्या भेटींत मी तिला चिडवली होती, थोडीफार डिवचली होती. त्याचा योग्य तो उपयोग झाला होता. हुलकावण्या न देतां माझ्या बेताला तिनें संमति दिली होती. इतके दिवस मनांत बाळगलेल्या इच्छेची आज परिपूर्ति होणार होती. बोरीबंदरला ती मला बरोबर तीन वाजून पंधरा मिनिटांनीं भेटणार होती. आणि त्यानंतर मी नेईन त्या ठिकाणीं माझ्याबरोबर येणार होती. जुहूला एखाद्या हटमध्यें किंवा फोर्ट विभागांतल्या एखाद्या आलेशान् हॉटेलमध्यें !

तीन वाजल्यापासून तिची वाट पहात मी लोकल गाड्यांच्या प्लॅटफॉर्मवर उभा आहे. तिला घेऊन येणारी गाडी यायला अजून थोडा वेळ आहे. स्टेशनवरच्या मोठ्या घड्याळाकडे पहात मी माझा चेहरा रुमालानेंच पुन्हा पुन्हा साफ करीत आहे. मधूनच पुढें वाकून गाडी येण्याच्या दिशेकडे पहात आहे. पुन्हा घड्याळाकडे पहात आहे. आणि गाडी यायला अजून दोनचार मिनिटें आहेत हें पाहून खट्टू होत आहे. अंगावरच्या ग्रे सूटवरुन मधूनच हात फिरवीत आहे. हा सूट इंद्रायणीच्या खास आवडीचा आहे. ह्या पोषाखांत मी फार छान दिसतों असें तिनें अनेक वेळां सूचित केलें होतें. तिला आवडतो म्हणून उकडत असूनही आज हा सूट मी मुद्दाम घातला आहे. तिच्या आवडीचें पोमेड केसांना लावलें आहे आणि तिच्या आवडीच्या सेंटचे मुक्त हस्तानें सूटवर फवारे उडवले आहेत. ती प्रसन्न व्हावी म्हणून सगळें कांहीं तिच्या मनासारखें केलें आहे.

तिला घेऊन येणारी गाडी स्टेशनमध्यें शिरत आहे आणि मी जरा मागें होऊन ती कुठें दिसते का तें उत्सुकतेनें पहात आहे. ठरलेल्या गाडीनें, ठरलेल्या वेळीं ती यावी असें मला एकीकडे वाटत आहे आणि मधूनच, ह्या गाडीनें ती आली नाहीं, जरा उशीरां आली तरी चालेल असेंहि वाटत आहे. सुख आटोक्यांत आलें म्हणजे तें जसें जरा उशीरां निघालें तरी चाललें असतें असें वाटूं लागतें तसें आतां मला वाटूं लागलें आहे. तरीहि माझ्या पुढच्यांतून सरकणाऱ्या डब्यांकडे मी शोधक दृष्टीनें पहात आहे. पुढें सरकणाऱ्या डब्यांत इंद्रायणी दिसली तेव्हां मी एकदम हात वरती केला आणि नकळत 'इंद्रायणी' अशी हांक मारली.

आज तिनें माझ्या आवडीचा खास पोषाख केला होता. पांढऱ्या जॉर्जेटवर तिनें घातलेला मखमलीचा लाल ब्लाऊझ तिच्या नाजूक देहांत चपखल रुतून बसला होता. तिच्या गळ्यांतल्या मोत्यांच्या शुभ्र माळेची प्रभा ब्लाऊझच्या रंगामुळें अधिकच फांकली होती. चापून चोपून नेसलेल्या पातळानें आणि ब्लाऊझच्या कांटेकोर बेतणीनें मला आवडणारे तिचे सुडौल अवयव अधिकच उठून दिसत होते. ती गर्दीतून जरा बाजूला झाली तेव्हां मी एकदम तिच्या देहाला स्पर्श केला आणि म्हटलें, "इंद्रायणी,

तूं आज किती छान दिसतेस..." माझ्या ह्या बोलण्यावर तिनें हंसल्यासारखें केलें तेव्हां अचानक तिच्या गोबऱ्या गालावर तिच्या ब्लाउझचा रंग चमकून गेला.

आम्ही बाहेर आलों आणि आमच्या समोर टॅक्सी उभी राहिली तेव्हां मी दार उघडलें आणि कमरेंत झुकून तिला म्हटलें, "बैस–" तिच्या पाठोपाठ मी आंत चढलों तेव्हां टॅक्सी सुरू झाली. पुढें वांकून मी ड्रायव्हरला ठिकाणाचें नांव सांगितलें तेव्हां तिनें चमकून विचारलें, "कुठें?—" मी मागें रेललों आणि हंसत हंसत म्हटलें, "ड्रीमलँड हॉटेलचें नांव तूं ऐकलें आहेस ना?—"

"नाहीं बाई!—" आणि छातीवर हात घेऊन मी काय सांगतों तें ऐकण्याकरतां ती माझ्याकडे पहात राहिली. मी तिच्याजवळ सरकलों आणि हलचेंच तिचे हात हातांत घेतले. मला भीति वाटत होती कीं तिच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें दूर सरकून ती माझ्या हातांतून हात सोडवून घेते कीं काय! पण नेहमीं एकांतांतहि दूर सरणारी ही मुलगी आज टॅक्सीमधेंहि मला खेटून बसली होती. तिच्या आंखूड पण मांसल बोटांशीं मी खेळत होतों आणि मधूनच बोटांचीं टोकें दाबून तिला सांगत होतों, "इंद्रायणी, तुला आवडत नाहीं म्हणून मी आज सिगारेट ओढली नाहीं—" मला वाटलें होतें, 'खरं का!' असं म्हणून ती एकदम आश्चर्यानें डोळे विस्फारील. माझें थोडें फार कौतुक करील. पण ती नुसतीच बसून राहिली. तिच्या शेजारीं बसून आणि तिचे हात हातांत खेळवून मी आतां पेटत चाललो होतों. माझें रक्त सळसळूं लागलें होतें. आणि कानशिलें गरम होऊं लागलीं होतीं. पण ह्या मुलीवर मात्र त्याचा कांहींच परिणाम होत नव्हता. ह्या एवढ्या वेळांत तिनें चुकूनहि माझा हात दाबला नाहीं कीं हलक्या आवाजांत ती कांहीं बोलली नाहीं. अजूनहि तिचे हात नेहमींसारखेच थंड होते. मी तिचे हात जोरानें दाबले आणि म्हटलें, "इंद्रायणी–" पण मला पुढें बोलवेंच लागलें नाहीं. तिनें माझ्या मनांतले विचार ओळखले असावे. तिनें माझ्या हातांतून हात सोडवून घेतले आणि म्हटलें, "अशा उघड्यावर माझ्या वृत्ती फुलत नाहींत–"

मी हंसलों आणि तिचे हात थोपटल्यासारखे करून म्हटलें, "कांहीं हरकत नाहीं. आपल्याला घाई थोडीच आहे!" आणि मी मागें रेलून तिच्याकडे पहात राहिलों. पण एवढ्यांत ड्रीमलँड हॉटेलसमोर टॅक्सी उभी राहिली. टॅक्सीचे पैसे चुकते करून आम्ही दोघे खालीं उतरलों. समोरच्या भव्य इमारतीकडे बोट दाखवून मी म्हटलं, "ह्या हॉटेलच्या खोल्या मात्र तुला फार आवडतील–" आणि पाश्चिमात्य पद्धतीप्रमाणें तिचा दंड धरून हळू हळू मी तिला आंत नेली.

मी राखून ठेवलेल्या खोलींत आम्ही आलों तेव्हां मी विचारलें, "कशी आहे खोली? तुला पसंत आहे ना?" पण ती बोलली नाहीं. थोडी भयाकुल झाल्यासारखी वाटली. तिला धीर यावा म्हणून मी आमच्या पाठोपाठ आलेल्या बॉयला कॉफी पाठवून देण्यास सांगितलें आणि तिला घेऊन मी छोट्या गॅलरींत गेलों. तिच्या कमरेभोंवती हात टाकून मी तिला जवळ घेतली आणि कठड्याला रेलून आम्ही उभे राहिलों. मी खालीं वांकून रस्त्याकडे बोट दाखवलें आणि म्हटलें, "तीं रस्त्यावरचीं माणसें पाहिलींस

का किती छोटीं दिसतात! आपण किती उंचावर आहों नाहीं?—" आणि उत्तराच्या अपेक्षेनें मी तिच्याकडे झुकलों, पण ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून म्हटलें, "ह्या ठिकाणीं आपल्याला कुणीसुद्धां पाहणार नाहीं. आपण अगदीं दोघंच आहों खरं ना?" तिनें मान हलवली आणि मला बिलगल्यासारखें केलें. पण एवढ्यांत कॉफी आली तेव्हां आम्ही आंत आलों. कॉफीचा ट्रे टीपॉयवर ठेवून बॉय निघून गेला तेव्हां मी दरवाजा लावला आणि कोचावर तिच्या शेजारीं येऊन बसलों. माझ्यासाठीं ती कॉफी करूं लागली तेव्हां मी तिला सांगूं लागलों, "इंद्रायणी, आपलें लग्न झालें कीं मी तुला घेऊन काश्मीरला जाणार आहे. काश्मीरला यायला तुला आवडेल ना?"

"फार लहानपणीं पपांबरोबर मी काश्मीरला गेले होते—"

"लहानपणीं पपांबरोबर आणि आतां माझ्याबरोबर! खरं ना?" असें म्हणत मी तिच्याजवळ सरकलों आणि सहज म्हणून तिच्या पाठीवर हात ठेवला. ती पुढें सरकली आणि कॉफीचा कप उचलून माझ्या हातांत देत म्हणाली, "घ्या--"

"आणि तुला?-"

"हा आहे कीं—" असें म्हणत तिनें टीपॉयवरचा दुसरा कप उचलला तेव्हां मी लटकेंच हंसल्यासारखें केलें आणि म्हटलें, "दुसरा कशाला! हा आहे कीं—" आणि माझ्या कपांतून मी तिला कॉफी पाजूं लागलों. माझ्या हातून कॉफी पितांना ती फार खुशींत आली. आणि बोलतां बोलतां मधेंच म्हणाली, "आपण आतां लवकर लग्न करायचं, गडे!" मी तिचा गालगुचा घेतला आणि म्हटलें, "माझी काय, एका पायावर तयारी आहे. बोल, तूं म्हणत असलीस तर आपण उद्यांच्या उद्यां रजिस्टर लग्न करूं--"

"नको नको-इतके दिवस पपांचं ऐकलं तसं आणखी थोडे दिवस ऐकूं. पण वैशाखांतल्या पहिल्या मुहूर्तावर लग्न करायचं बरं का!" आणि लाजून ती मला बिलगली. मी तिच्या केशभारावरून आणि मधूनच तिच्या गालांवरून हात फिरवूं लागलों. मी जें जें करीत होतों तें तें सारें ती आज करून घेत होती. पण स्वतः म्हणून कांहीं करीत नव्हती. तिचा श्वासोच्छ्वास हळूं हळूं उष्ण होऊं लागला होता. आणि तिचें वक्षःस्थळ जोरजोरांत खालीं वर होऊं लागलें होतें तरीहि ती मला प्रोत्साहन देत नव्हती. संकोचामुळें असें होत असेल असें वाटलें तेव्हां मी उठलों आणि उत्तरेकडच्या मोठ्या खिडकीवरचा पडदा खालीं ओढूं लागलों. पडदा खालीं करतां करतां माझ्या लक्षांत आलें कीं पूर्वेकडचा पडदा ती आपणहून खालीं करीत आहे. मला एकदम आनंद झाला. म्हणजे इतका वेळ तिनें मला प्रोत्साहन दिलें नव्हतें तें केवळ संकोचानें! आतां मात्र तिच्या वृत्ती खास फुलणार होत्या. ज्या सुखावांचून प्रीति पूर्ण झाली असें वाटत नाहीं तें सुख आज मला मिळणार होतें. अर्ध्या क्षणभरांत ती माझी होणार होती. ज्या सुखासाठीं मी तळमळत होतों तें सुख आतां अगदीं तोंडाशीं आलें होतें. मी भराभर पडदा खालीं घेतला आणि स्विच् दाबून दिवा लावला. सौम्य निळसर प्रकाशानें खोली उजळून निघाली. मी तिच्याजवळ जायला आणि आणि तिचा पडदा सोडून व्हायला एक गांठ पडली. माझ्याकडे पहायला ती वळली तेव्हां, 'इंद्रायणी–इंद्रायणी' असें पुटपुटत मी तिला एकदम जवळ घेतली. बेहोश अवस्थेंत माझी मिठी सैल झाली तेव्हां ती एकदम माझ्या मिठींतून सुटली आणि बावरून पलंगावर जाऊन बसली.

शिकाऱ्याची चाहूल लागल्यामुळें श्वापदानें गुहा सोडावी आणि धांवत नेमकें शिकाऱ्यासमोर येऊन उभें रहावें, अगदीं तसें झालें होतें. मला तरी आणखी काय हवें होतें? मी तिच्याजवळ गेलों आणि तिचे हात हातांत घेतले. तिचे हात कुरवाळल्यासारखे करून म्हटलें, "इंद्रायणी, हे तुझे हात किती चांगले आहेत...." आणि तिच्या हातांतल्या बांगड्यांशीं खेळल्यासारखें करून हलकेंच तिला विचारलें, "ह्या बांगड्या काढून ठेवतेस ना!" मला वाटलें होतें कीं माझ्या त्या सूचनेवर ती खूप लाजेल. आणि हात पुढें करून, 'असं काय! तुम्हीच काढा ना—' असें म्हणेल. पण एखाद्या आज्ञाधारक मुलीप्रमाणें ती बांगड्या काढूं लागली. ह्या अशा वेळीं हा कसला आज्ञाधारकपणा! तिच्या बांगड्या काढून झाल्या तेव्हां मी न सांगतांच ती डाव्या हातावरचें मनगटी घड्याळ काढूं लागली. न बोलतांच आत्मार्पण करायचा तिचा बेत होता काय? मी कांहींसें चिडूनच तिला म्हटलें, "ही गळ्यांतली माळ काढतेस ना!" आणि तावडतोब फांसा सैल करून ती माळ काढूं लागली. मी जें जें सांगेन तें तें निमूटपणें ऐकायचें तिनें ठरवलें होतें काय? पण अशा गोष्टी कधीं कुणाला सांगाव्या लागतात काय? हें आत्मार्पण तिला आत्मबलिदानासारखें तर वाटत नव्हतें? तिच्या ह्या वृत्तीनें मी आतां खरोखरच चिडूं लागलों होतों. जें सुख मला मिळणार होतें तेंच सुख तिलाहि मिळणार नव्हतें काय? असें असतां मीच तेवढें हिरहिरीनें पुढें सरसावावें आणि तिनें मला साधें प्रोत्साहनहि देऊं नये ह्याचा अर्थ काय? गळ्यांतली माळ काढून तिनें माझ्या हातांत दिली तेव्हां ती मी रागारागांतच बाजूच्या कोचावर फेंकून दिली. माझ्या या कृतीनें तरी ती भानावर येईल असें मला वाटत होतें पण कोचावर अर्धवट लोंबकळत राहणाऱ्या माळेकडेच ती पहात राहिली. मी एवढा तिच्या पुढ्यांत उभा होतों, एकांतांत तिला एवढी जवळ घेतली होती तरी तिचें लक्ष माळेकडेच होतें. मी एकदम चिडून तिच्या पदराला हात घातला तेव्हां मी पुढें काय करणार हें लक्षांत येऊन कीं काय, तिनें पदर दांतांत धरला आणि ती ब्लाउझचीं बटनें सोडूं लागली. आतां मात्र माझी बायको होऊं पाहणाऱ्या या मुलीची मला पुरती चीड आली. कांहीं आडकाठी नाहीं; कांहीं प्रोत्साहन नाहीं म्हणजे काय? ही प्रेमाची उत्कटता खास नव्हती. उत्कटतेचें हें विडंबन होतें. मी ज्यांच्यासाठीं आसुसलों होतों त्या गोष्टी माझ्यासमोर उघड्या होत होत्या आणि तरीहि माझें पेटलेलें शरीर आतां थंड पडूं लागलें होतें. फुललेल्या वृत्ति आतां कोमेजूं लागल्या होत्या. तिच्यावरची पकड आतां सैल होऊं लागली होती. पाहता पाहता ती ब्लाउझ काढूं लागली तेव्हां मी एकदम भिसाळलों. तिनें दातांत धरलेला पदर एकदम् खळकन् ओढला आणि 'जा मर–' म्हणून तिला दूर ढकलून दिली. मला शृंगार करावयाचा होता तो भावना असलेल्या सजीव स्त्रीशीं! एकांतांतला डाव आडकाठीनें रंगतो हें जिला कळतें तिच्याशीं!! रागारागांत मी पडद्याजवळ गेलों आणि भराभर पडदा वर खेंचूं लागलों. आणि पडदा वर खेंचतां खेंचतां माझ्या लक्षांत आलें कीं गालांतल्या गालांत हंसत ती दुसरा पडदा वर खेंचीत होती...

मी थक्क होऊन तिच्याकडे पहात राहिलों. माझी पत्नी होऊं पाहणारी ही इंद्रायणी थंड नव्हती, भोळी नव्हती, पण लुच्ची-मात्र खास होती!

• • •


मीहनाइट फौन्ड्री
दी प्रीमियर ऑटोमोबाइल लि.
कूपर इंजीनियरिंग लि.
दी रावळगांव शुगर फार्म लि.,
दी इंडियन ह्यूम पाइप कं. लि.
हिंदुस्तान कन्स्ट्रक्शन कं. लि.,
दी ॲक्मे मॅन्युफॅक्चरिंग कं. लि.,
SUGAR
वालचंदनगर इंडस्ट्रीज लि.
गेल्या २५ वर्षांपासून विशाल राष्ट्रीय योजना वालचंद समूहाच्या संचालकत्वा-खालीं चालणाऱ्या उद्योगधंद्यांवरच विश्वासपूर्वक सोंपविल्या जात आहेत. योजनांच्या प्रारंभापासून प्रत्यक्ष पूर्ततेपर्यंत वालचंद समूहानें राष्ट्राच्या आकांक्षा सदैव परिपूर्ण केल्या आहेत...वालचंद समूहाची कार्यक्षमता, साधनसामुग्री व त्यांचा बहुमोल दीर्घ अनुभव यामुळेंच त्यांना हातीं घेतलेलें कोणतेहीं कार्य यशस्वीपणें पार पाडतां येतें. त्यांच्या सल्लामसलतीमुळें आपला फायदाच होईल.
वालचंद समूह उद्योग
प्रीमियर कन्स्ट्रक्शन कं. लि.



शोधायला जावं एक
आणि हातीं यावं भलतंच
तसा गोंधळवून टाकणारा
हा
विचित्र अनुभव

# उकल

तीं दिसते सतरा वर्षांची. पण आहे मात्र जवळ जवळ तिशीची असं तिचं म्हणणं आहे. तें खरं कीं खोटं, तिचं नक्की वय किती, तें अद्यापही मला सांगतां येणार नाहीं. ओळख झाल्यानंतर तिनंच मला म्हटलं, "मराठे, माझं वय काय असेल सांगा."

"कां? तें लोकांच्याकडून पुन्हा पुन्हा ऐकण्यांत गंमत वाटते तुम्हांला?" मी विचारलं.

"तसं नव्हे. पण सांगा." माझ्या डोळ्याला डोळा देत ती म्हणाली.

"सोळा. फार तर सतरा." एकीकडे तिला नीट न्याहाळीत मी थंड अंदाज केला.

"चूक—साफ चूक." जरा घाईनंच तिनं मला खोडून काढलं. 'कसं फसलं एक माणूस' असा चेहरा केला. आणि ओंठ मुरडून, डोळे विस्फारून ती मला खाजगी सुरांत म्हणाली, "तुम्हांला म्हणून सांगतें, मराठे. माझं वय आहे एकोणतीस."

माझ्या जाल्या निर्विकार मुद्रेवरही थोडंफार आश्चर्य उमटून गेलं असावं. कारण लागलीच, जणूं माझी खात्री पटवण्यासाठीं तिनं पुढं म्हटलं, "सांगून खरं नाहीं वाटत कुणाला. पण खरंच तें आहे. येत्या सतरा मार्चला एकोणतीस पुरीं होणार मला."

यावरही मी कांहींच म्हणालों नाहीं तेव्हां तिचा जरा विरस झाला असावा. ती म्हणाली, "तुमचाही विश्वास नाहीं ना बसत, मराठे?"

'बसतो." मी म्हटलं. "बसत नाहीं असं कां वाटतं तुम्हांला?"

"इतरांच्या अविश्वासामुळें." तिनं उत्तर केलं. "सगळीं कीं नाहीं, मला सोळा वर्षांचीच समजतात. मी सांगतें माझं वय बावीस. पण तुम्हांला म्हणून खरं वय सांगितलं. एकोणतीस. तिसावं लागणार आतां."

आपल्यांतल्या या वेगळेपणाचा, आपल्या प्रौढ वयाचा, कीं आपल्याला गवसलेल्या स्वतःसंबंधीच्याच एका आश्चर्यजनक सत्याचा न कुणास ठाऊक, पण अभिमान तिच्या विस्फारलेल्या डोळ्यांत लुकलुकत होता. मुरडलेल्या ओंठांवर, कुणाला तरी बनवीत असल्याचं खट्याळ स्मित फुटत होतं. आणि तरीही ती सांगत होती तें खोटं होतं असं न वाटावं, इतका साधा सरळपणा तिच्या शब्दांत आणि आविर्भावांत होता.

"लोकांना बऱ्याच वेळा कांहीं कळत नाहीं." खडसावीत सुरांत मी तिला म्हणालों. "तसं म्हटलं तर बारकाईनं पाहिल्यावर तुम्ही तिशीच्याच दिसतां. तुमचं वय मुळींच लपत नाहीं."

माझ्या या शब्दांनीं एकाच वेळीं तिला बरं वाटलं आणि यातनाही झाल्या. समाधानाच्या सुखाबरोबर कुठं तरी असह्य कळ उठली. तिच्या चेहऱ्यावर संमिश्र हालचाली झाल्या. परंतु उरलं समाधान. हर्ष. विश्वा-



अनुक्रमणिका

साऱ्या नजरेनं तिनं माझ्याकडे एक स्निग्ध कटाक्ष टाकला आणि ती हंसली. तिसरं कुणी अस्तित्वांत नसल्यासारखी.

• •

एका गोवेकर कळावंतिणीची ती सर्वांत वडील मुलगी. हौशी नाटक-क्लबांच्या नाटकांतून 'नाइट' वर कामं करणं हा तिचा व्यवसाय होता. कृश आणि ठुसकंच पण रेखीव रूप आणि प्रगल्भ अनुकरणशक्ति, या अंगभूत गुणांच्या जोरावर हा तिचा व्यवसाय बरा चालला होता. या गुणांना आकार नव्हता. घाट नव्हता. कुणी तो देण्याचा प्रयत्न केला नव्हता. आणि तिलाही त्याची आवश्यकता भासली नव्हती. नाटकांतली आपली भूमिका ती ठरीव पद्धतीनें टाकठीक वजावी. इतर अननुभवी, हौशी आणि उत्साही मंडळीच्या मानानं तिची भूमिका नेहमींच उठून दिसे. शिवाय तसा वेळप्रसंग पडल्यास उडत्या चालीवरचीं दोन पदं म्हणण्याइतका सुमार आवाजही तिला असल्यामुळें संगीत आणि गद्य, अशा दोन्ही प्रकारच्या हौशी नाट्यप्रयोगांत तिला वारंवार मागणी असायची.

आमच्या मंडळाच्या नाटकासाठीं मी तिला प्रथम भेटलों. तिच्या आईपाशीं कांहीं रक्कम आगाऊ दिली आणि ती आमच्या तालमींना येऊं लागली. सुरवातीला मीच तिला प्रथम तालमीच्या जागेंत आणली. नंतर ती एकटी येत असे. परत जाईपर्यंत रात्र होई. नऊ, दहा वाजत. आणि तिला सोबत लागे. मंडळाचा चिटणीस या नात्यानें हें काम माझ्याकडे होतं. दर दिवशीं आम्ही दोघं ट्रॅमनं किंवा बसनं तिच्या घरापर्यंत जात असूं. ती मग घरीं जाई आणि मी परत येई.

पहिल्याच दिवशींच्या, तिच्या वयासंबंधीच्या संभाषणानं तिच्याविषयीं माझ्या मनांत कुतुहल निर्माण झालं, वाढलं. तिच्या दुहेरी व्यक्तिमत्वाचा ठाव घेण्याची ईर्ष्या उद्भवली. तिचं मन समजावून घेण्याची महत्त्वाकांक्षा बळावली. माझ्यांतला 'लेखक' चाळवला ती सांगते तेवढं तिचं वय नसेल आणि ती खोटं बोलत असेल तर तसं कां? आपलं वय ती वाढवून कां सांगते? कां खोटं बोलते? आणि ती सांगते तेंच तिचं वय असेल तर ती दिसायला, वागायला एवढी कोवळी कशी? वर वर तरी–निष्पाप कशी? या प्रश्नांनीं मनाचा पुरता ताबा घेतला.

पहिल्या दिवशीं तिला घरीं पोंचवतांना ट्रॅममध्यें ती माझ्या शेजारीं होती. ट्रॅमला धक्के बसत तसतशी ती अंग चोरून बसे आणि मी अंतर राखून बसलों कीं मुद्दाम काहींतरी मिषानं मला ओझरता स्पर्श करी. किंचित् दचकून, विस्फारलेल्या नजरेनं माझ्याकडे पाही. मीही पहात असलों तर उगीच थोडी हंसून नजर बाजूला करी. मी बोलावं अशी तिची अपेक्षा होती आणि तिनंच बोलून स्वतःच्या अंतरंगांत मला रिघाव द्यावा अशी माझी अपेक्षा होती.

"नाटक बरं लिहिलंय; नाहीं तें?" कांहीं वेळ जाऊं देऊन अखेर तिनंच विचारलं.

"हो." मी म्हटलं. "आपण बसवतों आहोंत तेंच ना? प्रल्हाद केशव अत्रे तसा बरा लेखक आहे."

"तसं नव्हे हो." ती मान वांकडी करून मला समजावीत म्हणाली. "अत्र्यांबद्दल नाहीं म्हटलं मी. नाटकाबद्दल. अत्रे म्हणजे ते 'श्यामची आई' चे डायरेक्टरच कीं नाहीं? उंच, जाडे, चष्मेवाले—"

"हं." मी म्हणालों.

"पाह्यलंय् मी त्यांना." ती पोक्त मुद्रेनं म्हणाली. आणि गप्प बसली. "कुठं?" असं मी विचारावं अशी तिची अपेक्षा होती. वाटल्यास तें तिनंच आपण होऊन सांगावं अशी माझी अपेक्षा होती.

पुन्हा आम्ही दोघं बराच वेळ गप्प होतों.

"तुम्ही कां नाहीं हो नाटकांत काम करीत?" तिनं मला विचारलं.

"मग तुम्हाला घरीं कोण पोंचवील?" मी विचारलं.

"पण तुम्हाला फिगर चांगली आहे." ती सराईत डायरेक्टरच्या तज्ज्ञ गांभीर्यानं म्हणाली.

"तुम्हांला ती नसूनसुद्धां तुमचं चांगलं चाललंय ना!" मी म्हटलं. "फिगर चांगली असली म्हणजे काम करावं असं कुठं आहे?"

"नाहीं, पण तुम्हांला खरंच फिगर आहे." तिनं पुन्हा ठाम विधान केलं.

"आणखी काय काय आहे मला?" असं कांहींतरी मी विचारावं अशी आतां तिची नवीन अपेक्षा असावी. तिच्या मुद्रेवर ती दिसत होती. तिनं तें सांगितलं तर उत्तम, पण तें आपखुषीनं; ही माझी भूमिका होती.

परत कांहीं वेळ स्तब्धतेंत गेला.

"तो पाहिलात?" ती मला अस्वस्थ चेहऱ्यानं [illegible] लागली. मेजर "तो त्या तिकडच्या खिडकीदळचा इसम दिसतो [illegible], तो माझ्याकडे पुन्हा पुन्हा पाहून हंसतो."

"बरं." मी तिकडे पाहिलं न पाहिल्यासारखं केलं.

"तुम्हांला चीड नाहीं येत?" तिनं भिवया उंचावून विचारलं.

"तुम्हांला येते!" मी विचारलं.

"येते. पण संवय झालीय आम्हांला." ती म्हणाली. "जग हल्कट बनलं म्हणून आपण थोडंच हल्कट बनायचं?"

यावरही 'हो' 'नाहीं' असं कांहीं ना कांहीं मी म्हटलं पाहिजे अशा आग्रहानं तिनं माझ्यावर नजर रोखली. आणि मी तितक्याच आग्रहानं थंड आणि गप्प राहिलों.

घरापाशीं आल्यावर आंत जातांना ती दिलासा देण्याच्या सुरांत म्हणाली, "आतां उद्यांपासून येत जाईन मी एकटी."

"वावंच लागल तुम्हांला." मी म्हटलं, "दर दिवशीं कोण येणार आणायला?"

"पण पोंचवायला आलं पाहिजे!" तिनं 'कॉंट्रॅक्ट'मधल्या कलमाची आठवण, तशा सुरांत दिली.

"येईन." मी म्हणालों. "पण खरं म्हणजे आतां कांहीं लहान नाहींत तुम्ही."

"नाहींच." ती फुलून उद्गारली. "पण काय आहे कीं, हे हलकट लोक एकटी दुकटी पाहून त्रास देतात."

मी तिच्या अपेक्षेप्रमाणें 'अरेरे' किंवा 'चक्‌चक्' केलं नाहीं. हलकट लोकांविषयीं संतापही दाखवला नाहीं.

थोडा वेळ समोरासमोर आम्हीं उभे राहिलों. विरसलेल्या मुद्रेनं ती मग वळून निघून गेली. मी परतीची बस पकडली.

दुसऱ्या दिवशीं तालीम चालू असता माझ्या बाजूला कोपऱ्यांत येऊन तिनं मला विचारलं, "मराठे, खरं सांगा, जमतं का हो मला?"

"काय?" मी मुद्रा अनभिज्ञ करून विचारलं.

"हं—काम." ती म्हणाली. "नयनाचं. नयना दिसते का मी?"

"छट्." मी केलं. "मला नाहीं वाटत. तुम्ही त्या मानानं प्रौढ वाटतां, जून वाटतां-पण फिगर लहान आहे तुमची. हाडकुळी. त्यामुळें रंगल्यावर दिसाल नयना. लांबून लक्षांत नाहीं येणार लोकांच्या."

"मग सगळे कां म्हणतात कीं मी हुबेहूब नयना दिसते म्हणून?" तिनं जरा उतरलेल्या मुद्रेनं विचारलं.

"निदान मला तरी नाहीं तसं वाटत." मी माझ्यापुरता मार्ग काढला. "तुमचं वय तुमच्या चेहऱ्यावर आणि वागण्यांत जाणवतंच. एकोणतीस."

आणि तिला बरं वाटलं. वाईटही वाटलं. ती सुखावली तशी दुखावलीही. पुन्हा चेहऱ्यावर संमिश्र छटा उमटल्या. नंतर समाधान. स्मित. "तुम्हांला माहित नाहीं मराठे," ती मला अत्यंत गंभीरपणें म्हणाली, "मला छातीचा विकार आहे. त्यामुळें मी ही अशी."

"काय झालंय तुमच्या छातीला?" तिला जाणवेल असं तिच्या छातीकडे पहात मी तिला सवाल केला.

"असं कसं समजणार तें तुम्हांला?" तिनं जरा बावरल्यासारखं करून पदर सावरीत विचारलं. "आंत झालंय कांहींतरी. डॉक्टर सांगतात. लहानपणापासूनच आहे मला."

आणि माझ्या चेहऱ्यावर काळजी, सहानुभूति, कणव असं कांहीं दिसावं या तिच्या अपेक्षेचा वेध घेऊन मी मुद्रा शक्य तितकी बेफिकीर, मख्ख आणि निष्काळजी केली. तो विषय थांबवून समोरच्या तालमींत मन गुंतल्यासारखं दाखवलं. आणि तिच्या चेहऱ्यावरची धडपड, चुळबूळ, हिरमुसलेपणा सगळं नजरेनं टिपून घेतलं.

त्या दिवशीं रात्रीं घरीं पोंचवतांना ट्रॅममध्यें तो विषय तिनं पुन्हा आठवणीनं काढला.

"मी जरा अंगानं चांगली असतें, मराठे, तर कसं झालं असतं असं वाटतं तुम्हांला?" तिनं विचारलं.

"आहांत त्या ठीक आहांत कीं." मी तिच्यावर नजर रोखत, फिरवत निर्विकारपणें म्हणालों.

"तसं नव्हे. पण समजा मी जरा उंच असतें. अंगानं भरलेली असतें—" ती सांगूं लागली. "फार नाहीं, पण पुरेशी. तर? सिनेमांत नसता मिळाला मला चान्स?"

"तें आतां सांगणं कठीण आहे." मी पुटपुटलों. "आणि आतां उपयोग तरी काय त्याचा."

डोळ्यांची जड उघडझांप करून तिनं एक मोठा उसासा सोडलेला मी पाहिला. तिची मुद्रा अधिकच व्यग्र झाली. झांकळली. "या छातींतल्य दुखण्यामुळं गेलं वथा सगळं." ती खिडकीबाहेर पहात म्हणाली.

तरीही तें दुखणं कसलं हें मी विचारलं नाहींच—मी गप्प राहिलों.

माझ्या या वरवरच्या बेफिकिरीनं, गेंड्याच्या वृत्तीनं ती अधिक बोलेल असा माझा कयास होता. मला तेंच हवं होतं, पण पहिले तीन चार दिवस तरी माझ्या दृष्टीनं, महत्त्वाचं असं कांहीं ती बोलत नव्हती. तिच्या बोलण्याचा विषय नेहमीं तोच असे. क्वचित् तो मी असे. पण या बोलण्याचं स्वरूपही उथळ आणि उडतं असे. माझ्या तुटकपणामुळें, अलिप्तपणामुळें तें अधिक उथळ आणि उडतं होई. महत्त्वाचं असं कांहींच हातीं लागत नव्हतं. अशा पद्धतीनं कांहीं हातीं लागेलसं दिसतही नव्हतं.

नंतर एक दिवशीं तालमीला यायला तिला बराच उशीर झाला. जवळ जवळ तालीम संपण्याच्याच वेळेला ती घाईघाईनं, धांप घालीत दरवाजाशीं आली. सर्वजण किंचित् चिडलेल्या अवस्थेंत होते. ती येतांच सर्वांच्या

नाराज, नाखूप नजरा तिच्याकडे वळल्या. पैसे देऊनही हा बेदरकारपणा अं! — हा सर्वांच्या कटाक्षांचा एकसारखा आशय होता. तिला हें जाणवलं असावं. दाराशींच ती थबकली. परिस्थिति नजरेंत घेऊन खालच्या मानेनं सावकाश माझ्यापर्यंत आली.

"फार उशीर झाले ना मला?" जरा घुटमळून, खालच्या मानेनंच तिनं अपराधी सुरांत विचारलं.

"छे." मी म्हणालों.

"खोटं बोलतां." वर, माझ्याकडे पहाण्याची धडपड करीत तिनं तिच्या नकळत आरोप केला.

"तर मग विचारतां कशाला?" दुखावल्याचं दाखवीत मी विचारलं.

"वेळेवर आले असतें पहा मी," ती अस्वस्थ होत म्हणाली. "पण जमलंच नाहीं —"

"तें दिसतंच आहे." मी गुरगुरलों.

"नाहीं हो, जरा काम निघालं." ती स्पष्टीकरणादाखल म्हणाली.

"आणि इथं खेळत होतीं हीं सगळीं जणं." मी तालमींतल्या माणसांकडे दृष्टिक्षेप करून म्हटलं.

"तसं नव्हे." तिचा सूर पडला होता. "पण खरं म्हणजे एकजण आले बघा माझ्याकडे."

"असं." मी घुमसलों.

"जा कसं म्हणावं त्यांना?"

"आणि या एवढ्या माणसांना वाट बघायला लावलीत ती?"

तिनं पुन्हा मान खालीं घातली. किंचित्काळ ती तशी राहिली. तशींच माझ्याकडे पहाण्याचा प्रयत्न करीत दीन हळूवारपणें म्हणाली, "खरंच; पुन्हा नाहीं मी उशीर करणार."

आणि तो विषय संपला.

त्या दिवशीं तिला घरीं पोंचवतांना ट्रॅम किंवा बस लौकर मिळाली नाहीं म्हणून टॅक्सी करावी लागली.

"आज उगींच रागावलांत माझ्यावर." टॅक्सी सुरू झाल्यावर, माझ्याकडे न पहाता तिनं केव्हां तरी म्हटलं.

"तुमचंच बरोबर होतं." तिच्याकडे वळत मी म्हणालों.

"तसं नव्हे. पण एकादं माणूस घरीं आलं अचानक, म्हणजे त्याला नाहीं तरी कसं म्हणावं?"

"कशाला 'नाहीं' म्हणावं लागणार होतं तुम्हांला?" मी खोचून विचारलं.

तिनं पदराशीं चाळा केला. ओंठ मुरडले. माझ्याकडे आणि हातांतल्या पदराकडे अस्थिर कटाक्ष टाकीत मला म्हणाली, "फिरायला."

मी यावर प्रश्नार्थक मुद्रा केली आणि तिनं पुढें म्हटलं, "श्रीधर कर्वे तुम्हांला माहीत आहेत ना?"

"नाहींत. माहीत करून घेण्याची इच्छाही नाहीं." तो विषय मला अप्रिय आहे असा देखावा करीत मी म्हणालों.

"असिस्टंट डायरेक्टर आहेत ते अण्णांकडे". तिनं माहिती दिली. आणि कांहीं तरी चुकल्याचं लक्षांत येऊन ती लागलींच म्हणाली, "अण्णा म्हणजे आपले शांतारामबापू. माहीत आहेत ना तुम्हांला? श्री त्यांना अण्णा म्हणतात."

"त्यांच्याबरोबर फिरायला गेला होतां." मी म्हटलं.

"हो." ती निर्मळ सुरांत म्हणाली. "श्रींबरोबर. ते आले अचानक आणि म्हणाले, 'जुहूला जाऊं या.' नाहीं तरी कसं म्हणणार मी? मी नाहीं म्हटलं कीं भारी रागावतात ते. येतच नाहींत मग दिवसचे दिवस. म्हणून मला जावं लागलं. तरी बरं जुहूवरचं चौपाटीवर भागवलं मी आणि तशी पळत तालमीला आलें. रस्ता ओलांडायलासुद्धां थांबलें नाहीं. दोनदां मरणार होतें."

माझ्यावर, आमच्या मंडळावर, नाटकावर, सर्व्यांवर, सर्वांवर उपकार





अनुक्रमणिका

केल्याचा तिचा सूर होता. श्रीविषयींचा दरारा, लाडिकपणा आणि अभिमानही त्या सुरांत होता.

"जुहूला मोठं छान आहे, नाहीं?" तिनं चेहरा फुलवून माझ्याकडे पहात विचारलं. "गेला आहांत का तुम्ही कधीं? एकदां आम्ही तिथं राहलों सुद्धां होतों. हॉटेलांत. रात्रीं!"

"कोण, श्री आणि तुम्ही?" तिखट सुरांत मी विचारलं.

"नाहीं. मी आणि करमन." ती सरळपणें म्हणाली. आणि माझ्या नकळत माझ्या चेहऱ्यावर जें झालं, त्यानं मनस्वी गोंधळली. थोडीशी बावरलीसुद्धां. घाबरली. पण मग हळू हळू तिची मुद्रा निवळली. नितळ झाली. तिची अंगभूत धिटाई पुन्हा तिच्यापाशीं आली. निडरपणें ती माझ्याकडे पहात गप्प बसून राहिली. त्या नजरेंत निर्मळपणा होता. सरळपणाही होता. तो खरा कीं कृत्रिम तें मला समजलं नाहीं.

या भेटीनंतर आणि या संभाषणानंतर तिच्या व्यक्तिमत्वाविषयींची माझी ओढ अधिकच वाढली. तिच्याविषयींचा वरवरचा तिरस्कार, द्वेषही वाढला. तो तिच्याशीं बोलतांना वारंवार उमटेल अशी दक्षता मी कटाक्षानं घेऊं लागलों. माझं हें असं वागणं तिला लागत असावं; आणि तें लागावं हाच माझा हेतु होता. हें वागणं मी चालू ठेवलं. आणि तेवढा तिचा निडर सरळपणाही वाढत गेला. आपण होऊन ती माझ्याशीं बोलायला येई. अनेक नांवं तिच्या बोलण्यांत ती मुद्दाम आणी किंवा येत. त्यांतल्या त्यांत श्री आणि करमन हीं दोन नांवं अधिक वेळा ऐकायला मिळत. मी न विचारतां आणि वारंवार तोडून, निरुत्साही करुनही, आपण या दोघांबरोबर कुठं कुठं गेलो होतों, जात असतां, हें तिनं मला सांगून टाकलं. कोण कोण आपल्याला काय काय घेऊन देतं हें ती डोळे विस्फारुन, फुलून फुलून सांगे. त्यांतलं कांहीं ती मुद्दाम मला दाखवायलाही आणी. पदर ढळवीत दंड माझ्यापुढें धरुन म्हणे, "मराठे, पहा. हें पोलकं पहा. कसं आहे?"

"मला त्यांत कांहीं कळत नाहीं." रुक्ष सुरांत मी म्हणे.

"सुंदर आहे." ती निर्णय देई. "मला फार आवडलं हें कापड. श्रीनीं घेऊन दिलं. सव्वा रुपया वार. पावणे दोन म्हणत होता तो दुकानदार; पण मी सव्वावर आणलं. हो. दुसऱ्याचे पैसे असले म्हणून काय झालं? नाहीं का मराठे?"

आणि मी तें कापड, तें पोलकं पहातही नाहीं म्हणून ती मनोमन खट्टू होई. दुसऱ्याविषयींच्या, दुसऱ्याच्या पैशाविषयींच्या तिच्या कल्पनेचं मी कौतुक करीत नाहीं म्हणून नाराज होई.

"हें सगळं तुम्हांला आवडतं?" मी एकदां रुक्ष, कडवट मुद्रेनं तिच्या घराच्या वाटेवर तिला विचारलं.

"हें म्हणजे?" तिनं उलट विचारलं.

"हें म्हणजे कुणाहीबरोबर कुठं तरी फिरणं, जुहूला कुठल्याही इसमाबरोबर रात्रीं रहाणं, लोकांनीं घेऊन दिलेल्या वस्तू वापरणं—"

"त्यांत काय आहे?" तिच्या सुरांत आश्चर्य होतं. मुद्रेवर आश्चर्य होतं. "मी कांहीं उगीच वाटेल त्याच्याबरोबर नाहीं संबंध ठेवीत. आणि मी थोडीच कुणाबरोबर लग्न करणार आहे कीं कुणाबरोबर पळून जाणार आहे? तशी मी जेवढ्यास तेवढंच वागते प्रत्येकाबरोबर; आईला माहिती आहे तसलं कांहीं मी करणार नाहीं तें. तिचा विश्वास आहे माझ्यावर. आणि शिवाय आतां कांहीं मी लहान नव्हे, चांगली जाणती झालें आहे. तिसावं लागेल मला. माझं मला कळतं सगळं."

• •

तालमींना येण्यांतला सुरवातीचा तिचा नियमितपणा पुढें तितका राहिला नाहीं. माझ्याशीं वारंवार खटके उडूनही ती जास्त जास्त अनियमित होत गेली. कधीं वेळेवर, कधीं उशीरा. कधीं मुळींच येतही नसे. आणि येई तेव्हां माझ्या वांकड्या, कुत्सित प्रश्नांना ती साधीं, सरळ कापणारीं उत्तरं देई. माझ्या रागाला निर्मळ मानभाव्या निडरपणानं जबाब देई. माझा तिरस्कार एकतर्फी तर तिचा (खरा वा खोटा) निष्कपट प्रांजलपणा दुप्पट असा भासला घडे. तिच्याशीं मी सौम्यपणें वागतां

नाराज, नाखूप नजरा तिच्याकडे वळल्या. पैसे देऊनही हा बेदरकारपणा कां ! — हा सर्वांच्या कटाक्षांचा एकसारखा आशय होता. तिला हें जाणवलं असावं. दारांशीच ती थबकली. परिस्थिति नजरेंत घेऊन खालच्या मानेनं सावकाश माझ्यापर्यंत आली.

"फार उशीर झाला ना मला?" जरा घुटमळून, खालच्या मानेनंच तिनं अपराधी सुरांत विचारलं.

"छे." मी म्हणालों.

"खोटं बोलतां." वर, माझ्याकडे पहाण्याची धडपड करीत तिनं तिच्या नकळत आरोप केला.

"तर मग विचारतां कशाला?" दुखावल्याचं दाखवीत मी विचारलं.

"वेळेवर आले असतें पहा मी," ती अस्वस्थ होत म्हणाली. "पण जमलंच नाहीं —"

"तें दिसतंच आहे." मी गुरगुरलों.

"नाहीं हो, जरा काम निघालं." ती स्पष्टीकरणादाखल म्हणाली.

"आणि इथं खेळत होतीं हीं सगळीं जणं." मी तालमींतल्या माणसांकडे दृष्टिक्षेप करून म्हटलं.

"तसं नव्हे." तिचा सूर पडला होता. "पण खरं म्हणजे एकजण आले बघा माझ्याकडे."

"अस्सं." मी धुमसलों.

"जा कसं म्हणावं त्यांना?"

"आणि या एवढ्या माणसांना वाट बघायला लावलीत ती?"

तिनं पुन्हा मान खालीं घातली. किंचित्काळ ती तशी राहिली. तशीच माझ्याकडे पहाण्याचा प्रयत्न करीत दीन हळूवारपणें म्हणाली, "खरंच; पुन्हा नाहीं मी उशीर करणार."

आणि तो विषय संपला.

त्या दिवशीं तिला घरीं पोंचवतांना ट्रॅम किंवा बस लौकर मिळाली नाहीं म्हणून टॅक्सी करावी लागली.

"आज उगींच रागावलांत माझ्यावर." टॅक्सी सुरूं झाल्यावर, माझ्याकडे न पहाता तिनं केव्हां तरी म्हटलं.

"तुमचंच बरोबर होतं." तिच्याकडे वळत मी म्हणालों.

"तसं नव्हे. पण एकादं माणूस घरीं आलं अचानक, म्हणजे त्याला नाहीं तरी कसं म्हणावं?"

"कशाला 'नाहीं' म्हणावं लागणार होतं तुम्हांला?" मी खोंचून विचारलं.

तिनं पदराशीं चाळा केला. ओंठ मुरडले. माझ्याकडे आणि हातांतल्या पदराकडे अस्थिर कटाक्ष टाकीत मला म्हणाली, "फिरायला."

मी यावर प्रश्नार्थक मुद्रा केली आणि तिनं पुढें म्हटलं, "श्रीधर कर्वे तुम्हांला माहीत आहेत ना?"

"नाहींत. माहीत करून घेण्याची इच्छाही नाहीं." तो विषय मला अप्रिय आहे असा देखावा करीत मी म्हणालों.

"असिस्टंट डायरेक्टर आहेत ते अण्णांकडे". तिनं माहिती दिली. आणि कांहीं तरी चुकल्याचं लक्षांत येऊन ती लागलींच म्हणाली, "अण्णा म्हणजे आपले शांतारामबापू. माहीत आहेत ना तुम्हांला? श्री त्यांना अण्णा म्हणतात."

"त्यांच्याबरोबर फिरायला गेला होतां." मी म्हटलं.

"हो." ती निर्मळ सुरांत म्हणाली. "श्रींबरोबर. ते आले अचानक आणि म्हणाले, 'जुहूला जाऊं या.' नाहीं तरी कसं म्हणणार मी? मी नाहीं म्हटलं कीं भारी रागावतात ते. येतच नाहींत मग दिवसचे दिवस. म्हणून मला जावं लागलं. तरी बरं जुहूवरचं चौपाटीवर भागवलं मी आणि तशी पळत तालमीला आलें. रस्ता ओलांडायलासुद्धां थांबलें नाहीं. दोनदां मरणार होतें."

माझ्यावर, आमच्या मंडळावर, नाटकावर, अन्यांवर, सर्वांवर उपकार

केल्याचा तिचा सूर होता. श्रीविषयींचा दरारा, लाडिकपणा आणि अभिमानही त्या सुरांत होता.

"जुहूला मोठं छान आहे, नाहीं?" तिनं चेहरा फुलवून माझ्याकडे पहात विचारलं. "गेला आहांत का तुम्ही कधीं? एकदां आम्ही तिथं राहिलों सुद्धां होतों. हॉटेलांत. रात्रीं!"

"कोण, श्री आणि तुम्ही?" तिखट सुरांत मी विचारलं.

"नाहीं. मी आणि करसन." ती सरळपणें म्हणाली. आणि माझ्या नकळत माझ्या चेहऱ्यावर जें झालं, त्यानं मनस्वी गोंधळली. थोडीशी घाबरलीसुद्धां. घाबरली. पण मग हळू हळू तिची मुद्रा निवळली. नितळ झाली. तिची अंगभूत धिटाई पुन्हा तिच्यापाशीं आली. निडरपणें ती माझ्याकडे पहात गप्प बसून राहिली. त्या नजरेंत निर्मळपणा होता. सरळपणाही होता. तो खरा कीं कृत्रिम तें मला समजलं नाहीं.

या भेटीनंतर आणि या संभाषणानंतर तिच्या व्यक्तिमत्वाविषयींची माझी ओढ अधिकच वाढली. तिच्याविषयींचा वरवरचा तिरस्कार, द्वेषही वाढला. तो तिच्याशीं बोलतांना वारंवार उमटेल अशी दक्षता मी कटाक्षानं घेऊं लागलों. माझं हें असं वागणं तिला लागत असावं; आणि तें लागावं हाच माझा हेतु होता. हें वागणं मी चालू ठेवलं. आणि तेवढा तिचा निडर सरळपणाही वाढत गेला. आपण होऊन ती माझ्याशीं बोलायला येई. अनेक नांवं तिच्या बोलण्यांत ती मुद्दाम आणी किंवा येत. त्यांतल्या त्यांत श्री आणि करसन हीं दोन नांवं अधिक वेळा ऐकायला मिळत. मी न विचारतां आणि वारंवार तोडून, निरुत्साही करूनही, आपण या दोघांबरोबर कुठं कुठं गेलो होतों, जात असतों, हें तिनं मला सांगून टाकलं. कोण कोण आपल्याला काय काय घेऊन देतं हें ती डोळे विस्फारून, फुलून फुलून सांगे. त्यांतले कांहीं ती मुद्दाम मला दाखवायलाही आणी. पदर ढळवीत दंड माझ्यापुढें धरून म्हणे, "मराठे, पहा. हें पोलकं पहा. कसं आहे?"

"मला त्यांत कांहीं कळत नाहीं." रुक्ष सुरांत मी म्हणे.

"सुंदर आहे." ती निर्णय देई. "मला फार आवडलं हें कापड. श्रीनीं घेऊन दिलं. सव्वा रुपया वार. पावणे दोन म्हणत होता तो दुकानदार; पण मी सव्वावर आणलं. हो. दुसऱ्याचे पैसे असले म्हणून काय झालं? नाहीं का मराठे?"

आणि मी तें कापड, तें पोलकं पहातही नाहीं म्हणून ती मनोमन खट्टू होई. दुसऱ्याविषयींच्या, दुसऱ्याच्या पैशाविषयींच्या तिच्या कल्पनेचं मी कौतुक करीत नाहीं म्हणून नाराज होई.

"हें सगळं तुम्हांला आवडतं?" मी एकदां रुक्ष, कडवट मुद्रेनं तिच्या घराच्या वाटेवर तिला विचारलं.

"हें म्हणजे?" तिनं उलट विचारलं.

"हें म्हणजे कुणाहीबरोबर कुठं तरी फिरणं, जुहूला कुठल्याही इसमाबरोबर रात्रीं रहाणं, लोकांनीं घेऊन दिलेल्या वस्तू वापरणं—"

"त्यांत काय आहे?" तिच्या सुरांत आश्चर्य होतं. मुद्रेवर आश्चर्य होतं. "मी कांहीं उगीच वाटेल त्याच्याबरोबर नाहीं संबंध ठेवीत. आणि मी थोडीच कुणाबरोबर लग्न करणार आहे कीं कुणाबरोबर पळून जाणार आहे? तशी मी जेवढ्यास तेवढंच वागते प्रत्येकाबरोबर; आईला माहिती आहे तसलं कांहीं मी करणार नाहीं तें. तिचा विश्वास आहे माझ्यावर. आणि शिवाय आतां कांहीं मी लहान नव्हे, चांगली जाणती झाले आहे. तिसावं लागेल मला. माझं मला कळतं सगळं."

• •

तालमींना येण्यांतला सुरुवातीचा तिचा नियमितपणा पुढें तितका राहिला नाहीं. माझ्याशीं वारंवार खटके उडूनही ती जास्त जास्त अनियमित होत गेली. कधीं वेळेवर, कधीं उशीरा. कधीं मुळींच येतही नसे. आणि येई तेव्हां माझ्या वांकड्या, कुत्सित प्रश्नांना ती साधीं, सरळ मारणारीं उत्तरं देई. माझ्या रागाला निर्मळ भासणाऱ्या निरागसपणानं जबाब देई. माझा तिरस्कार एकतर्फ तर तिचा (खरा वा खोटा) निष्कपट प्रांजलपणा दुप्पट असा मामला पडे. तिच्याशीं मी सौम्यपणें वागतों





अनुक्रमणिका

# कालिसावळी



— वि. म. कुळकर्णी

घाशित बसली — टाच घसघसा
टाकि लावल्या
आंघोळीच्या
दगडावरती
प्रौढ यौवना
कालिसावळी !

— वेळ उन्हाची
फार गुणाची !
नजर लावुनी
किरण पाहतो
पाठीवरची
पन्हळ तियेच्या...
—शुद्ध न त्याची तिला परंतु
एकच तिचिया मनांत हेतु
टाच निघावी स्वच्छ आपुली !
कुठेंहि कांहीं राहुं नये मळ
स्वच्छ निघो-कीं ओढ्याचा तळ
बालपणामाजें ज्याच्या कांठीं
खडक पाहुनि काळा काळा
टाच घासली होती कितिदां
इवली इवली ऐकत खळखळ !
भंवतीचें मजुरांचें तें जग
आपआपुल्या घाईमध्यें —
ढहुळत होतें
विव्हळत होतें
जाग तयाला येतच होती
—रस्ता हळुहळु बोलत होता
पहावयाचें पहात होता !
— अलग जराशी वरतीपासुन
ही दगडावर बसली होती
टाच घसघसा घाशित होती,
कपारिनें हातांतिल काळया...
— वेळ उन्हाची
फार गुणाची !

• • •

असा आरोप माझ्यावर येऊं लागला. 'कॉण्ट्रॅक्ट' मधल्या शर्ती ती उठल्या असल्या मोडते आहे हें माझ्या ध्यानांत वरचेवर आणून दिलं जाऊं लागलं. मी कांहींतरी करावं अशी सर्वांची अपेक्षा होती; कारण तिच्या अनियमितपणामुळें, गैरहजेऱ्यांमुळें, सर्वांचीच गैर-सोय होत होती. संध्याकाळीं पांच साडेपांचला ती कुठल्या तरी बस-स्टॅण्डवर आमच्यापैकीं कोणाला तरी उभी दिसे. त्याला म्हणे, "चला तुम्ही. ही मी आलेंच सहापर्यंत." आणि येत नसे. किंवा आली तर किती तरी उशीरां येई. तालमींत इतर कुणी खुलासा विचारला कीं 'भाऊजी' 'मामेभाऊ' 'मैत्रिण' 'ॲक्सिडेंट' असले शब्द तिच्या ओठांतून शंभर टक्के सत्याच्या सहजतेनं बाहेर पडत. माझ्याकडे मात्र ती खरं—निदान यापेक्षां निराळं बोले. ती म्हणे, "खरं सांगू का तुम्हांला मराठे, तुम्हांला म्हणून सांगतें—एका हलकट इसमाला चुक-वण्यासाठीं मी नाना खटपटी केल्या; त्यांत उशीर झाला. त्या इसमाला माझ्याशीं लग्न करायचं आहे. लग्न कर नाहींतर माझे पैसे परत कर असं म्हणतो. पण पैसे कुठून परत करूं? ते तर खर्च झाले. आणि लग्न-करण्यासाठीं तो मला पैसे देतो हें मला कळलं असतं तर मी त्याचे पैसे घेतलेच नसते. भलत्या गोष्टींना मी नाहीं कबूल होणार!"

नजरेंत—तोच—खरं बोलत असल्याचा अभिनिवेष असे; आणि ओठांत कुणाला तरी बनवीत असल्याचा, खेळवीत असल्याचा चटोंयाळ आशय सावधगिरीनें लपल्यासारखा वाटे.

सर्वांच्या म्हणण्याप्रमाणें, दडपणामुळें, मला तिच्याबद्दल कांहींतरी करणं प्राप्त होतं. तें जहाल असावं आणि तडकाफडकी व्हावं अशीही सर्वांची अपेक्षा होती. परंतु अनियमितपणें येऊनही तिनं आपल्या भूमिकेवर जें प्रभुत्व मिळवलं होतं, तें तर मी जाणतेपणीं विसरूं शकत नव्हतों. तिची नक्कल तिला गीतेसारखी तोंडपाठ होती; आणि दिग्दर्श-कानं एकदांच जें जें सांगितलं, तें सर्व तिनं अक्षरशः आपलंसं केलं होतं. तालमींत तिच्याबरोबरीची आमची हौशी आणि नियमित मंडळी फिकीं, अनभिज्ञ, निर्जीव वाटत; इतक्या आत्मविश्वासानं, धिटाईनं, सहज तादात्म्यतेनं ती भूमिका वठवी. ती चुके तीही आत्मविश्वासानंच; आणि त्यांतही मला वैशिष्ट्य भासे. हें सर्व असंच नजरेपुढें असतांना विचार-पूर्वक मी तिच्याबद्दल कांहींही पुरेसं जहाल करूं शकत नव्हतों. म्हणून विचार विसरून वागण्याचं मी ठरवलं.

त्या दिवशीं तालीम सुरूं झाल्यावर पांचच मिनिटांनीं ती येऊन पोहोंचली. तिचं काम असलेला भाग चालू होता आणि दिग्दर्शकच तात्पुरते तिची नक्कल वाचत होते. ती आली ती थेट त्यांच्यापुढें जाऊन उभी राहिली. आपलं भाषण साभिनय म्हणूं लागली. आणि हें पहात असलेला मी कर्कशपणें ओरडलों, "थांबा. इकडे या आधीं तुम्ही."

ती दचकली. तिचा चेहरा पडला. तिनं माझ्याकडे बघितलं. संथपणें ती सर्वांच्या रोखल्या नजरा अंगावर घेत माझ्यापर्यंत आली. माझ्याकडे पाहून दिलगिरीदर्शक असं एक स्मित करण्याचा तिनं उसना, दुबळा प्रयत्न केला. तो जमला नाहीं तेव्हां नुसतेच ओठ मुरडले.

"कुठं होतात?" मी विचारलं.

तिला कांहींतरी म्हणायचं होतं; पण माझी मुद्रा आणि माझा नूर पाहून ती गप्प राहिली. तिनं आवंढा गिळला.

"सभ्य वागणं ही चीज माहीत आहे का तुम्हांला?" मी विचारलं.

तरीहीं तिनं उत्तर केलं नाहीं.

"आज कुणाबरोबर कुठं गेला होतात?" मी भिंवया उंचावून रंगेलपणें प्रश्न केला.

आतां तिचे ओठ हलले, घाटी चाळवली, पापण्या फडफडल्या. पण शब्द उमटले नाहींत. एकदां ती माझ्याकडे पहात होती, एकदां खालीं जमिनीकडे.

"करसन भेटला कीं श्री? कीं अरुणकुमार? कीं—"

"कुणी नाहीं." ती मोठ्या प्रयासानं बोलती झाली. "उगींच नांवं घेऊं नका. पांचच मिनिटं उशीर झालाय् मला."

"पण तो कां?" मी ओरडलों. "आज पांच मिनिटं झाला. यापूर्वी किती वेळा आणि किती किती वेळ उशीर केलात, आला नाहींत किती वेळा, याची यादी हवी तुम्हांला? नाटकांत कामं करतां कीं तमाशांत? इथं ही मंडळी नोकरीधंदा संभाळून येतात त्यांच्या वेळाला कांहींच किंमत नाहीं? त्यांच्या श्रमांना मोलच नाहीं? त्यांना काय उद्योग नाहींत?"

"असतील." तीही आतां धुमसूं लागली होती जमिनीपेक्षां माझ्याकडे जास्त वेळ पहात होती. पुन्हा खालीं पहात होती. "असतील." ती पुन्हा कांहींतरी अधिक बोलण्याच्या धडपडींत म्हणाली.

"असतील नव्हे, आहेतच." मी गरजलों. "तुमच्याप्रमाणं रिकामटेकडे आणि दुसऱ्याच्या जिवावर मजा मारणारे नाहींत इथं कुणी."

"मी मजा मारतें?" तिनं ओठ चावून कांपऱ्या, चिरक्या आवाजांत विचारलं.

"तें तुम्हांला माहीत." मी उत्तरलों. "आम्हाला काय करायचंय् त्याच्याशीं? पण हें यापुढें खपणार नाहीं. एक मिनिटही उशीर होता कामा नये यापुढें तुम्हांला."

"तसं मला जमणार नाहीं." तिनंही अनावर रागाच्या उमाळ्यांत सांगून टाकलं.

"जमणार नाहीं? कसं जमणार नाहीं? जमवावं लागेल." मी म्हणालों. "कॉन्ट्रॅक्टवर सही केली आहेत तुम्ही"

"म्हणजे दासी झालें नाहीं तुमची." ती लाल होऊन फणकारली. "असलीं हजार कॉन्ट्रॅक्टं पाहिलीं आहेत मी. आणि सह्या पण केल्या आहेत."

"या बाबतींत वेगळा अनुभव येईल तुम्हांला." मी खलनायकी वळणाची समज दिली.

"काय कराल?" तिनं सरळ माझ्याकडे पहात निडरपणानं विचारलं.

"दिलेला ॲडव्हान्स अधिक नुकसानभरपाईचे पैसे तुमच्या आईकडून शेवटच्या पैपर्यंत वसूल करीन." मी सांगितलं.

"करा तर मग." ती निश्चलपणें म्हणाली. "नाहीं मी काम करीत"

"तुम्ही केलेलं पाहीन मी." मी वजावलें. "कशा करीत नाहीं तेंच पाहूं."

ती थरथर कांपत होती. राग आणि हुंदका दाबीत होती.

मी जरा वेगळा पवित्रा टाकीत म्हणालों, "शकते जरूर तरी काय तुम्हांला काम करण्याची! पैसे पुरवायला अनेक 'यार' आहेत तुम्हांला—"

आणि हातांतली नक्कल तिनं फाड्दिशीं जमिनीवर फेकली. हाडकुळ्या मुठी आवळल्या. दांत ओठ खाल्ले. पाण्यानं भरलेल्या, तरारलेल्या डोळ्यांनीं म्हणाली, "त्याच्याशीं तुम्हांला कांहीं कर्तव्य नाहीं. काम करून

घ्यायचंय ना ? घ्या करवून. करा वसूल पैसे. उद्यांपासून आधींच अर्धा तास येऊन बसतें मी. हवी तर तासभर आधीं येतें. इथंच रहातें हवी तर. लावा एकदां काय त्या नाटकाचे दिवे लावतां ते !"

आणि डोळे पुनः पुन्हा पुसत, नाक ओढीत, तिनं त्या दिवशीं रागीट, घोगऱ्या सुरांत, अत्यंत निर्जीव यांत्रिकपणें तालीम केली. तिला मी टाकून बोललों, तिला तें मनस्वी लागलं आणि ती वटणीवर आली, या आनंदांत जो तो होता. माझ्याकडे जो तो कौतुकादरानें पहात होता. तिच्याकडे पाहून तोंडांतल्या तोंडांत हंसत होता. मला तें बरं वाटत नव्हतं. तिचं तिकडे लक्ष नव्हतं—निदान, लक्ष असल्याचं ती दर्शवीत नव्हती.

त्या दिवशीं तालीम संपल्यावर ती एकटीच घरीं निघून गेली. मी बरोबर येण्याची वाट तिनं पाहिली नाहीं. जातांना वळून माझ्याकडे बघण्यालाही ती तयार नव्हती. काम संपवून तिनं पाठ वळवली आणि तरातरा चालती झाली. नंतरचीं सर्वांकडून मिळालेलीं अभिनंदनं मला ऐकावींशीं वाटत होतीं आणि तितकींच खुपत होतीं.

विचार तात्पुरता विसरला तरी कायमचा हरवणं शक्य नव्हतं. तो जागा झाला होता. कुतुहलही.

● ●

या प्रसंगापासून ती तालमींना वेळेवर येऊं लागली. कांहीं दिवस आमच्यांत कामाव्यतिरिक्त विशेष बोलणं नव्हतं. पण मी तिच्या घरापर्यंत सोबत म्हणून रात्रीं बहुतेक जात असे. अधून मधून आगखी कुणी जाई. कधीं ती एकटीच जाई. नाटकाच्या प्रत्यक्ष प्रयोगाच्या भोंवतालचे जे अनंत बारीक सारीक किचकट व्याप असतात, ते आतां माझ्यामागं लागले होते आणि त्यामुळें तिच्याशीं संबंध ठेवायचा, तिला पुन्हा बोलतं करायला किंवा मध्यंतरीच्या 'त्या' प्रसंगांतली कटुता घालव यला मला वेळ नव्हता.. स्वस्थताही नव्हती. त्याची तितकी जरूरही वाटली नाहीं.

कुठं मी गेलों आणि नाटकाचा विषय निघला कीं सहजच कुणीतरी 'कामं कोण कोण करतं आहे ?' असं विचारी. मी अनेक नांवं घेई त्यांत तिचं नांव असे. आणि इतर नांवं बहुधा संख्येंतल्यासारखीं जात तिथं, तिच्या नांवावर मला अडावं लागे. 'ती का ?' एकसारा ओळख दर्शव-णाऱ्या उजळ चेहऱ्यानं म्हणे. परंतु त्यापलिकडे मला यांतून कांहीं निष्पन्न होत नसे. म्हणणाऱ्याच्या चेहऱ्यावर ओळख तरळे. आणि मग निर्वि-कारपणा. राग नाहीं कीं लोभ नाहीं. आदर नाहीं तसा अनादरही नाहीं-स्पष्ट असं काहींच नाहीं. जिथं जावं तिथं असं.

आणि ती खरोखर आहे तरी कशी, हा प्रश्न मंडावून सोडी.

● ●

ज्या पद्धतीनं मीं तें शोधण्याचा प्रयत्न अखेर केला ती पद्धत तशी बरी नाहीं. व्यवहार्यही नसेल. किंबहुना पूर्ण स्वरूपांत ती माझ्या जाणत्या मनांतही नव्हती. कधींच नव्हती. पण झालं तें असं झालं खरं. सगळं घडत गेलं.



अनुक्रमणिका

अचानक आम्हांला तालमीची जागा बदलावी लागली. नवी जागा आडवळणांतली होती. आणि हा बदलही आकस्मिक होता. या बदलाची माहिती तिला वेळींच देऊन, नव्या जागीं आणण्याचं काम कुणाला तरी–मलाच–करणं प्राप्त होतं.

मी घरीं गेलों तेव्हां ती फ्रॉकमध्यें होती. आणि विशिष्ट जागची प्रौढ गोलाई सोडली तर बाकी ती फ्रॉकमधलीच पंधरा सोळा वर्षांची अल्लड पोर दिसत होती. कुठल्याही अर्थानं, फ्रॉक तिला शोभतो असं मला वाटलं.

मी घरीं आलेला पाहून तिला आश्चर्य वाटलं. आनंद वाटला. 'त्या' प्रसंगाच्या खुणा तिनं दाखवल्या नाहींत. (मात्र त्या माझ्या मनांत आल्यावांचून राहिल्या नाहींत.) भराभर वेणीफणी आटपून, पातळ नेसून, मला चहा करून देऊन ती माझ्या बरोबर निघाली.

"उशीर झाला का?" ट्रॅमची वाट पहातांना तिनं मृदु स्वरांत विचारलं.

"नाहीं विशेष." मी तिच्याच समक्ष विकत घेतलेल्या पाकिटांतली एक 'कॅप्स्टन' शिलगावली.

ट्रॅम आली आणि आम्ही दोघं आंत चढलों. शेजारीं शेजारीं बसलों. आज मी तिला मुद्दाम जरा चिकटून बसलों. तिनंही सरकासरकी केली नाहीं किंवा अंगाचा संकोच केला नाहीं.

इतकं माझ्या मनाप्रमाणं जमलं. तिला चिकटून बसल्यानंतर सहाजिकच आंत कुठं तरी होणारी चलबिचल कावूंत आणून मी सिगारेटचा मोठा झुरका घेतला. नाकावाटें लांब धूर सोडला. एका डोळ्यानं तिच्याकडे पाहिलं. ती स्वस्थ होती. निदान स्वस्थ दिसत होती.

"माझ्याबद्दल काय मत आहे हो तुमचं?" धुरांतून किलकिल्या डोळ्यांनीं तिला न्याहाळत मी विचारलं. "प्रामाणिक मत हं."

"तुमच्याबद्दल?" तिनं नवलानं विचारलं.

"हो. कां? माझ्याबद्दल कुणाचं कांहीं मत असणारच नाहीं कीं काय? इतका दिनमहत्त्वाचा वाटतों मी तुम्हांला?"

"छे, छे." ती म्हणाली. "तसं नव्हे. पण तुम्ही कधींच असं कांहीं विचारलं नाहींत मला."

"म्हणूनच आज विचारतों आहे." सिगारेटचं जळतं टोंक अभ्यासत मी म्हटलं. आणखी एक दीर्घ झुरका घेतला. बराच धूर सोडला. तिला माझा स्पर्श जाणवावा म्हणून बसल्या बसल्या अंग चाळवलं. तिला स्पर्श करणाऱ्या हाताची उगींच हालचाल केली.

"चांगले आहांत तुम्ही." ती समोर पहात म्हणाली. "तुमच्याबद्दल काय मत द्यायचं?" आणि हाच शेरा देणाऱ्या डोळ्यांनीं तिनं माझ्याकडे पाहिलं. पुन्हा नजर लांब नेली.

"माझी भीति नाहीं वाटत तुम्हांला?" मी विचारलं.

"अं? भीति? ती कशाबद्दल?" तिनं पुन्हा मला न्याहाळत विचारलं.

"पुरुष म्हणून." डोळ्यांच्या कोपऱ्यांतून तिला पहात मी पुटपुटलों.

"मला पुरुषांची भीति मुळीं वाटतच नाहीं." ती म्हणाली. "त्यांत काय भ्यायचं? पुरुष म्हणजे काय वाघ आहेत का सिंह आहेत?"

"मग लांडगे असतील." मी खास झाडीत म्हटलं. "मी नाहीं का तुम्हांला लांडगा वाटत?"

ती हंसून त्यावर म्हणाली, "छे. तुम्ही तुम्हीच वाटतां."

कांहीं वेळ मी गप्प राहिलों. ट्रॅम खडखडत धांवत होती. अडखळून थांबत होती, पुन्हा धांवत होती.

"समजा, मी तुम्हांला आतां एका एकान्त ठिकाणीं नेलं—" मी तिला सांगूं लागलों.

"पण तुम्ही नेणार नाहीं." ती म्हणाली.

"असंच म्हणूं नका. नेईनसुद्धां." डोळे तिच्यावर रोखून मी संथपणें म्हटलं.

"मी येणार नाहीं." ती पूर्वीच्याच सहजपणें म्हणाली. "कारण आपल्याला नाटकाच्या तालमीला जायचं आहे." आणि बालिशपणें खळखळ हंसली. निर्मळ डोळ्यांनीं.

तिच्या हंसण्यामुळें झालेला गोंधळ सावरीत, सिगारेट ओठांत चाळवीत मी गंभीरपणें म्हटलं, "तुम्हाला माझ्याविषयीं इतका विश्वास वाटतो, भरंवसा वाटतो, त्याला कांहीं पुरावा आहे का तुमच्यापाशीं ?"

"एवढे तुम्ही आहांत ना." ती अजूनही हंसतमुख होती. तिच्या मुद्रेवर माझ्याविषयींचा विश्वास पुरेपूर व्यक्त होत होता.

"मला असं तुम्ही कितीसं पाह्यलंय् ?" कपाळ सुरकुतवून मी विचारलं.

"खूप. दर दिवशीं तर पहातें."

माझ्यापर्यंत आलेल्या कंडक्टरच्या हातावर दोन आणे ठेवीत मी म्हटलं, "दोन चिराबाजार."

तिच्या मुद्रेवर आश्चर्य उमटलं. एका डोळ्यानं मला तें नीट दिसत होतं.

"चिराबाजार ?" कंडक्टरची पाठ वळतांच तिनं मला विचारलं. "आपली तालीम तर गिरगांवांत—"

मी किंचित् हंसलों. सिगारेटचा धूर सोडला.

"विश्वास आहे ना तुमचा माझ्यावर ?" मी विचारलं.

"पण सांगा ना, चिराबाजारला कुठं जाणार आपण ?" -तिनं विचारलं.

"माझ्यावर विश्वास ठेवा." मी ट्रॅमच्या खिडकीबाहेर पहात थंडपणें म्हटलं. अंग चाळवलं. तिच्या अंगाला कोटाची बाही घांसली.

ती आतां अधून मधून माझ्याकडे पहात होती. पुन्हा सरळ पहात होती.

"आज तालीम नाहीं ?" तिनं थोड्या वेळानं अस्वस्थपणें विचारलं.

"आहे." मी म्हटलं. हातांतलं सिगारेटचं थोटूक बाहेर फेकीत तिच्याकडे बघितलं. किंचित्काळ तसाच बघत गप्प राहिलों. मग म्हणालों, "आज चिराबाजारला तालीम आहे."

"म्हणजे—जागा बदलली ?"

मी म्हणालों, "हो."

"अचानक ?"

"अचानकच." मी म्हटलं.

"कां बदलली ?"

"ती जुनी जागा सोडणं भाग पडलं. आसपासच्या लोकांनीं तक्रारी केल्या मालकाकडे. गोंगाट होतो म्हणून." खोटं बोलत असल्याच्या विश्वासानं मी खरं बोलत होतों.

तिचं समाधान झालं असावं. किंवा नसावं. ट्रॅममधून मी उतरलों तिथं ती उतरली. माझ्यामागून तालमीच्या नव्या एकान्त जागीं आली. आम्ही बरेच लौकर येऊन पोहोंचलों होतों. तिला घेऊन तिथं यायला किती वेळ लागेल याविषयींचा माझा अंदाज निदान अर्ध्या तासानं चुकला होता. अद्याप जागेत कोणी आलेलं नव्हतं. फक्त आम्ही दोघेच होतों. जागेचं दार मी आंतून बंद करून घेतलं. बाहेर कुठं तरी कांहीं मुलं गोंगाट करीत होतीं.

भिंतीवरल्या एकेक तसबिरी पहात, हात मागें गुंफून, त्या प्रशस्त जागेंत ती मुरडत मुरडत संथपणें पाठमोरी फिरत होती.

मी तिच्याकडे गेलों. तिला वळवली. मिठींत घेतली; खूप आवळली आणि तिच्या ओठांना पुन्हा पुन्हा डंख मारला—

● ●

सुरुवातीलाच कबूल केलं आहे कीं, ती मुलगी अद्याप मला गूढच आहे. जें सांपडावं म्हणून तो चमत्कारिक पवित्रा माझ्याकडून घेतला गेला, तें अज्ञातच आहे.

मी मात्र सांपडलों आहे.

तिला वळवून मी तिच्या नजरेंत आंत—आंत पहात थंडपणें तिला विचारणार होतों, "आतां मी भलतं सलतं कांहीं केलं तर ? तर काय कराल ?-तर काय कराल ? ?"—

—आणि तिची प्रतिक्रिया आजमावणार होतों.

● ● ●







# चपला चपला अति!

: न. वि. गाडगीळ

**चपलांनीं शाप दिला म्हणून चिडून प्रतिशाप न देतां काका लेख लिहितात.**

मनुष्याच्या भावना कोणीही मान्य करतात. त्याच्या इच्छा व आकांक्षा, राग व लोभ, प्रेम व शाप या सर्वांचा आपल्याला परिचय आहे. त्यांचा साक्षात्कार जीवनांत नित्य होत असतो. पण वस्तु व वास्तु यांना सुद्धां भावना असतात हें कोणी मान्य करीत नाहींत. अन्न शापतें असें आपण म्हणतों पण त्यावर आपला विश्वास असतो असें मात्र नाहीं. कांहीं ज्योतिषी माणसांप्रमाणें देशांच्या, नगरांच्या कुंडल्या मांडतात व कांहीं वास्तूंच्याही मांडतात. 'येथें पायाचा दगड बसविला तर अभ्युदय' इत्यादि वार्तिकें पण सांगतात. वस्तूंचेंही तसेंच. वनस्पतींना जीव आहे ही गोष्ट आतां शास्त्रानें सिद्ध झाली आहे. त्यांना भावना आहेत असेंही शास्त्रीय निश्चयानें सांगितलें जातें. वृक्ष रडतात, लता गहिंवरतात, फुलें हंसतात ही केवळ कविकल्पनाच आहे असें नाहीं. तर शास्त्रज्ञ असें म्हणत आहेत. 'अपि ग्रावा रोदति अपि दलति वज्रस्य हृदयम्' ही भवभूतीची उक्ति केवळ कव्युक्ति नाहीं. आमची आजी आम्हांला सांगे, शेताचे पिकास दृष्ट लागते. घराला तर काळ्या बाहुल्या टांगतात. झाडें, जनावरें, तात्पर्य सर्व वस्तु व वास्तु, सजीव निर्जीव सर्व कांहीं भावनावश आहेत, हें शास्त्र मानण्यांत येतें. शेजारच्या रमाकाकूंनीं बरणी पाहिली व किती छान आहे म्हणाल्या आणि ती दुसरे दिवशीं फुटली. ही अगर अशी भाषा अपरिचित नाहीं. तात्पर्य सजीवाप्रमाणें निर्जीवाचीही भावना लक्षांत घेऊन वागलें पाहिजे. आणि आज हे विचार सुचण्याचें कारणही तसेंच आहे.

गेल्या मे महिन्यांत पुणें नगरवाचनालयाचे समारंभाचे वेळीं चपला हरवल्या व तेथें कोणी तरी म्हणालें, 'आतां निदान त्यावर एक सुंदर लेख तरी लिहा!' मनांत विचार केला, चपला माझ्या गेल्या, व या गृहस्थाला आनंद! कां तर मला लेखाला विषय मिळाला व त्याला मनोरंजनाची संधि मिळणार! गव मरावेत व पंतांना प्रमोदानची आशा उत्पन्न व्हावी असेंच थोडेसें होतें. मृत्यु व जन्म, नुकसान व लाभ यापैकीं कोणतीही कल्पना एकाकी सुचत नाहीं. तथापि द्वंद्वांत एक विरोध असूनसुद्धां सूक्ष्म असा समान धर्म असतो—पण चपला हरवल्या, नवीन मिळतील ही भावना योग्य, पण लेखाला विषय मिळाला हा विचार कांहीं निराळाच वाटतो. क्रौंचमिथुनांतील काममोहितांपैकीं एकाला निषादानें मारलें व आदिकाव्य जन्माला आलें. या घटनेंत अलौकिकता असेल, काव्य असेल पण तर्क नाहीं. पण यामुळें एक साहित्यिक परंपरा निर्माण झाली. आणि कदाचित् त्या परंपरेच्या प्रेरणेंतून नगरवाचनालयांतील सद्गृहस्थानें वर लिहिलेले शब्द उच्चारले असतील. तथापि विरहांत काव्याचा जन्म झाला आणि त्याचा सूड काव्यानें विरहांत कायम ठाण मांडून घेतला आहे! ज्या साहित्यनिर्मितींत, प्रेमाचा अंत मीलनांत होतो तें काव्य अगर तें साहित्य नीरस ठरतें. म्हणून जी वस्तु हरवली ती सांपडण्यांत जो आनंद त्यापेक्षां ती न सांपडण्यांत मनाला जी एक गूढ हुरहूर लागते ती सृजनशील असते. वस्तु मिळाली, घटना स्मृतिशेष होते. आणि ती मिळाली नाहीं तर तिची स्मृति मनाची प्रेरणा होते—अर्थात् प्रयत्नवादी मनाची. आणि जेव्हां नगरवाचनालयांतील समारंभ संपून मुख्य पाहुणे मुख्यमंत्रि यांचेबरोबर लगबगीनें उठलों, (कारण लग्नाला जावयाचें होतें) खालीं आलों, अन्यथा सहज सांपडतील पण सामान्यतः कोणी नेणार नाहीं अशा जागीं ठेवलेल्या चपला मला दिसेनात, तेव्हां, कोर्टापुढें भाषण करतांना जरूर तो कागद चटकन् सांपडूं नये, असें झालें. कुणेनें शमीवृक्षाखालीं ठेवलेलीं आयुधें न सांपडावीं असें झालें. क्षणभर स्तब्ध झालों. कुणीतरी म्हणालें 'अहो, नगास नग घ्या आणि चालूं लागा.' नगास नग हें तत्त्वज्ञान आयुष्यांत स्वीकारलें नव्हतें. जन्म व मृत्यु याव्यतिरिक्त जें मिळेल तें घेतलें नाहीं, हवें तें घेतलें व नको तें नाकारलें. यांतील सुख दुःख, मान अपमान या सर्वांचा अनुभव व यांतील अस्मिता व अभिमान यामुळें तसाच तेथें उभा राहिलों. गत जीवनांतील अर्ध्या शतकांतील एतद्विषयक अनुभव आठवूं लागलों. भोंवती मंडळींचा गराडा पडला. मान्यवरांच्या निर्गमनापेक्षां माझ्या चपलांची निगति जनमनाला अधिक आकर्षक करती झाली! कुणी त्यांचें वर्णन विचारी, कोणी वय, कोणी किंमत, तात्पर्य कुटुंबीयांच्या मृत्यूनंतर भेटावयास आलेले इष्टमित्र रोगाची, औषधांची व वैद्यांची चौकशी करतात पण तेथेंच थांबतात, तसेंच येथें होत होतें. येवढ्यांत वाचनालयांतील वृद्ध नोकरानें जवळ येऊन विनयानें सांगितलें कीं, 'काकासाहेब, मी तुमच्या चपला उचलून दुसरीकडे ठेवल्या आहेत. त्या आणल्या आहेत, घ्या.' चपला उचलून ठेवून त्यानें माझा केवढा आदर केला होता, पण मी कांहीं पेशवा नव्हतों कीं, त्याला जहागीर बहाल करूं शकेन! आणि याचेंच प्रथम वाईट वाटलें. पण मी केवळ पेशवा नव्हतों येवढीच वस्तुस्थिति नव्हती. मी



अनुक्रमणिका

एक 'महान् साहित्यिक' होतों आणि चपला आणून देऊन त्या वृद्ध नोकरानें, क्षणभर मनांत उत्पन्न होऊं घातलेल्या साहित्यकृतीची—अरेरे भ्रूणहत्या केली!

चपला घातल्या. लग्नसमारंभालाही जाऊन आलों. ही घटना अजिबात विसरलें असेंही वाटलें. परंतु सद्हू चपला मनांतून उतरल्याच. दरसाल येरवड्याच्या तुरुंगाला मेमध्यें भेट देतों त्याप्रमाणें नंतर तेथें गेलों असतां एक नवीन जोडीचें माप देऊन आलों. थोड्या दिवसांत त्या नवीन चपला आल्या व जुलै अधिवेशनाला, जुन्या चपला वास्तविक चांगल्या असूनसुद्धां कुठें तरी मनांत खोल दडी मारून बसलेल्या पूर्वग्रहामुळें गुण्यास टाकून देऊन, नवा जोड घेऊन स्वतंत्र भारताच्या राजधानींत गेलों. लक्ष्मीची कृपा सरस्वतीचे मार्फत प्रयत्न करून सुद्धां मला प्राप्त झालेली नाहीं त्यामुळें नेहमीं मी चपलाच वापरतों. यामुळें एक तर साधेपणाच्या लौकिकांत भर पडली व देशभक्तीची किनारही जीवनाच्या महावस्त्राला लाभली. नव्या वाहणा पाहतांच दिल्लींतील माझी काळजी वाहणारे तरुण मित्र रमेश म्हणाले, 'काका, वाहणा फार छान दिसतात. पण जुन्या कांहीं तितक्या जुन्या नव्हत्या झाल्या.' डोळ्यांपुढें नगरवाचनालयांतील घटना उभी राहिली व मनानें ठरविलें कीं लेख लिहून जुन्याचे ऋणांतून मुक्त व्हावें. सात पावलांनीं सप्तजन्मीं कायम टिकणारे ऋणानुबंध उत्पन्न होतात असें आपलें धर्मशास्त्र सांगतें; मग ज्यांना सात महिने तरी पायाच्या दासी मानून सेवा घेतली त्या चपलांबद्दल मनांत कांहींच येऊं नये हें कसें? आणि मनांत लेखाची जुळवाजुळव करूं लागलों.

यानंतर त्याच दिवशीं गणेश उत्सवाच्या एका कार्यक्रमाचें निमित्तानें दिल्ली शहरांत गेलों. दिल्ली राज्याचे प्रमुख श्री. पंडित यांचें व्याख्यान होतें व मी अध्यक्ष होतों. उपक्रम उपसंहार अध्यक्ष या नात्यानें मराठींत केला व श्री. पंडित महाराष्ट्रीय तथापि उत्तर प्रदेशांत राहिल्यानें हिंदींतच बोलले. त्यांचें भाषणही संस्कृतीबद्दल आणि विचारप्रवर्तक असेंच होतें. वास्तविक तेथून मी घरीं यावयाचा. तथापि गांवांतील महाराष्ट्रसभाजाच्या कार्यक्रमांत समाराधनेचा भाग त्या दिवशीं रात्रीं होता आणि तेथें येण्याबद्दलचा आग्रह इतक्या अगत्यानें व प्रेमळपणानें केला गेला होता कीं न जाणें गैर ठरलें असतें. म्हणून गेलों. व्हरांड्यांत चपला काढून ठेवल्या. सामान्यतः जेथें चपला तेथें चित्त असें होतें, तसें न होता निःसंकोचपणें प्रसादांत भाग घेतला. दक्षिणी स्वयंपाकाला तोड नाहीं आणि त्यांतली अवीट गोडी जो जन्मानें महाराष्ट्रीय आहे तोच जाणे. आळवाची पातळ भाजी म्हणजे अमृत! 'तयासी उपमा नाहीं मेरुमंदार धाकुटें' असें आहे. मोठ्या प्रसन्न चित्तानें 'यस्य कृपाप्रसादेन रात्रीं नाशयति विघ्नानाम् अस्या ऋद्धिसिद्धी' विनायकाचा प्रसाद घेऊन बाहेर आलों व जेथें चपला, ठेवल्या होत्या तेथें पाहिलें आणि त्या तेथें नव्हत्या! नव्या चपला! ऋद्धिसिद्धींनें अधिक दिलें नाहीं तरी आहे तें जाणार नाहीं इतका तरी किमान अनुभव यावा ही स्वाभाविक अपेक्षा होती. पन्नास मंडळी धुंडूं लागली. 'चटक लावी सकळ जना, पहाता कोठेंच दिसेना' अशा परिस्थितींत अकल्पित स्थितिप्रज्ञता मनांत प्रादुर्भूत झाली. प्राप्त अप्राप्त यापलिकडे मन गेलें. इतक्यांत आणखी दोघे तिघे पादत्राणें सांपडत नाहींत म्हणून कुजबुजूं लागले. मामला घाऊक प्रमाणावर झाला असें दिसलें. समाजाचे चिटणीस फौजदाराप्रमाणें नष्ट वस्तूचें वर्णन विचारूं लागले. ती आतां वर्णनातीत होती. मालक आतां तिच्या प्राप्तीची इच्छा करीत नव्हता. कारण त्याच्या मनांत 'जुन्या चपलांबद्दल जे पूर्वग्रह होते ते बाधले' हा विचार आकार घेऊं लागला. जुन्या चपला टाकून नव्या स्वीकारल्या, जुन्याचा शाप बाधला ही कल्पना मनाचा पिच्छा सोडीना.. मी घरीं आलों. बरोबर एक पोर होतें त्याचाही कोरा बूट गेला होता. गणपतीचा प्रसाद बहुतेकांना हा असा मिळाला असें वाटलें! वाटेंत नाना विचार आले व घरीं परतल्यावर कुणींतरी कुणाचें तरी हें वस्तुरूप धन घेऊन समाज हा सर्वांचा म्हणून समाजांतील संपत्ति सर्वांचीच या तत्त्वज्ञानाचे क्रियाशील प्रचारक ठरले आहेत असें वाटूं लागलें. माझें गेलें तर मी दुसऱ्याचें घ्यावें हा समाजाचा न्याय असावा का, याचा विचार





अनुक्रमणिका

करूं लागलों आणि चाळीस वर्षांपूर्वींची घटना आठवली.

१९३६ साल असावें. महायुद्ध रंगांत आलें होतें. जग लोकशाहीसाठीं सुरक्षित केलें जात होतें. मी त्या वेळीं बी. ए. चे वर्गात होतों. तथापि आमच्या कंपूंत असलेल्या समवयस्क मंडळींत कांहीं कॉलेजमध्यें न गेलेले असेही होते. त्यांत बाबूराव म्हणजे एक वल्ली होता. मॅट्रिकला दोनदां बसला पण परीक्षकांशीं मतभेद झाला व त्यामुळें नापास झालेला होता. गणितांत भास्कराचार्य व संस्कृतांत भगवान पाणिनी असल्यानें कॉलेज-जग त्याला परलोक झालें होतें. तथापि पोषाखांत अग्रयावत् असल्यानें किमान पदवीधर तो आहे असेंच इतरांना वाटे.

'आकृति विशेषेषु आदरः पदं करोति' या न्यायानें आम्ही जरी कॉलेजांतील असलों तरी तो 'इंप्रेसन' मारून असे. महायुद्धामुळें मिलिटरींत त्याला पटकन् नोकरी मिळाली व एकंदरींत तो 'चलता पुर्जा' म्हणजे मोठा कल्पक व हुशार असल्यानें कचेरींत सुद्धा रुवाब ठेवून होता. संध्याकाळीं भटकणें हा आमच्या कंपूचा एक नित्याचा कार्यक्रम होता. कोतवाल चावडी ते किर्लोस्कर थिएटरपर्यंतचा रस्ता म्हणजे जागतिक राजमार्ग आम्ही मानत होतों. संध्याकाळीं या राजपथावर, सौंदर्य, संपत्ति, अभिमान व अधिकार यांचा आविष्कार कोणालाही दिसे. कोतवाल चावडीनून थिएटरकडे तेथें असलेल्या उपहारगृहांत बहुशः जावयाचें हा उपक्रम व उपसंहार आमच्या रोजच्या दैनंदिनीचा होता. कुठल्या तरी ल्मांत आपला चांगला जोडा गेला व फाटका नगास नग या न्यायानें आणावा लागला म्हणून बाबूराव एक दिवशीं तक्रार करीत होता. आम्हांला वाटलें कीं, त्याला त्या दिवशीं उपहारगृहाची जबाबदारी टाळावयाची होती म्हणून बहाणा करीत असावा. दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें आम्ही बुधवार चौकाकडे जात असतां, पेलबागेजवळ आम्ही आलों आणि बाबूराव दर्शनाला जाऊं चला असें म्हणाला. कांहीं त्याजबरोबर मी गेलों नाहीं. गेलेले परत आले व आम्ही नेहमींप्रमाणें पुढें चालूं लागलों. चालतांना बाबूरावाचें लक्ष जोड्याकडे व आमच्याकडे सारखें लागलेलें दिसलें. माझें कुतूहल जागें झालें व अधिक न्याहाळून पाहतांच त्याच्या पायांत अगदीं कोरा आणि थोडा मोठा असलेला जोडा दिसला. मी जणूं सहज विचारलें, "आज जोडा विकत घेतला वाटतें? थोडा वाढल्या मापाचा दिसतो आहे!" तो नरमला व निर्ढावलेला नसल्यानें त्यानें पटकन सांगितलें कीं, "पेलबागेंत दर्शनाला गेलों आणि उद्देश हा कीं, माझा जोडा तरी मिळेल नाहीं तर चांगला तरी बदलून घेईन; वाटेत हा मिळाला तो झपाट्यानें घालून आलों, झालें! फाटका गेला, नवा मिळाला! थोडा मोठा असला तरी चालेल." त्या वेळीं वकील नव्हतों तरी त्याच्या उत्तरांतील पहिला भाग ही निव्वळ थाप आहे याची तात्काळ खात्री झाली. तथापि कांहीं बोललों नाहीं. परी परतल्यावर आमच्या इतर मंडळींशीं सल्लामसलत केली व बाबूरावाला कांहीं तरी दंड केला पाहिजे असें ठरलें. अर्थात् योजना व अंमलबजावणी यांची कामगिरी मजकडे सोपवण्यांत आली. (तेव्हांपासूनच या दृष्टीनें माझा लौकिक होता हें मुद्दाम नमूद करणें जरुर आहे. नाहीं तर माझा भावी चरित्रकार हे गुण मंत्री झाल्यानंतर जसे इतरांना चिकटतात असें म्हणतात तसें मला चिकटले असें म्हणावयाचा) तात्पर्य,



अनुक्रमणिका



ही दिवाळी व नूतन संवत्सर सर्व बांधवांना सुखाचें व भरभराटीचें जावो!




विडा उचलला व नंतर विचार करूं लागलों. बाबूराव पक्का बनेल, सहज फसणार नाहीं. शिवाय साहेबाचे कचेरींत काम करून मुरब्बी झालेला. महर्षी अण्णासाहेब पटवर्धन वारले, कारकूनांना सुट्टी पाहिजे होती. पण कोणाची छाती साहेबाला सांगण्याची झाली नाहीं. सर्व कारकून देवसेनेप्रमाणें कार्तिकेयाला म्हणजे बाबूरावाला शरण गेले, बाबूराव अगदीं रडत साहेबाचे खोलींत गेला व इतकें उत्कृष्ट नाटक केलें कीं जणूं मोठे संत वारले आणि गांव स्मशानयात्रेला लोटला आहे! साहेबानें सुट्टी दिली आणि बाबूरावाचा भाव तेजाळला. तात्पर्य बाबूराव ही व्यक्ति साधारण नव्हती. आणि यानं जाणीवेनें माझ्या कर्तृत्वास आव्हान दिलें. प्रसंग व पात्र यांचा सुयोग जुळवून बेमालूम काम करावयाचें होतें. अपयश आल्यास आत्मा व अस्मिता या दोघांचाही अपमान होणार होता. अनेकांशीं सल्लामसलत वर्णे धोक्याचें होतें. ज्या व्यक्तीकडून काम करून घ्यावयाचें ती विनयोलकी, जमल्यास विनडोक्याची, प्रामाणिकपणा नसला तरी तसा थोडा फार लौकिक असलेली अशी हवी होती. सहज अभिनय करील इतकी स्वयंप्रज्ञ, पण सूत्रधाराचें मानील इतकी आज्ञाधारक हवी होती. काम सोपें नव्हतें, काळ थांबणें शक्य नव्हतें, वेगाची आवश्यकता तीव्र होती. नवा जोडा जुना झाल्यास नवलाईची युक्ति अर्थशून्य ठरणार होती. तापलेलें लोखंड थंडावतांच प्रयत्नाचे हातोडे निरुपयोगी ठरणार होते. बातमी बाहेर अकाली फुटल्यास राष्ट्रीय नुकसान निश्चित होतें. वरसंशोधकाप्रमाणें व्यापक मित्रपरिवारावर नजर फिरविली. मनाशीं ठरविलेल्या कसोट्या लावून व्यक्तीची निवड केली. आणि मन येवढें प्रसन्न झालें कीं, किंचित् स्वतःशीं गाऊन मनाची पाठ थोपटली. व्यक्ती इतकी योग्य वाटली कीं, प्रयत्नाआधींच यशाची खात्री वाटली. तथापि तिला भेटून योजना समजावून सांगावयाची होती. आमचे राजाभाऊ म्हणजे मति व गति यांत सुसंगति राखणारे. चालणें हळूं, बोलणेंही तसेंच. नाकावर माशांचा थवा बसला तरी हात उचलणार नाहींत इतके धीमे. अमूक दिशेला जावयाचें नाहीं, व अमूक विचारसुद्धां करावयाचा नाहीं असें कोणीं सांगितलें तर मानणारे. क्षणाला वळी पडून पुढील आयुष्यांत दोनच गोष्टी केल्या: एक लग्न व १९२० च्या चळवळींत लॉ कॉलेज सोडणें. (पैकीं पहिली अनेक करतात.) कुणाला नाहीं म्हणता त्यांना येत नसे. त्यांचे गुणदोष लक्षांत घेऊनच माझ्यांनील धूर्ततेनें त्यांना या कामीं पसंत केलें होतें. त्यांच्याजवळ गेलों एका कामासाठीं व सहज बोलण्यांत मुद्याची गोष्ट काढली. त्यांतील नैतिकता व न्याय त्यांना पटला. होणारें कार्य सार्वजनिक हिताचें हीही त्यांची खात्री झाली. जें थोडेंसें असल्यासारखें करावयाचें होतें तें बोलावयाचेंसुद्धां नव्हतें. युधिष्ठिराप्रमाणें कानावरसुद्धां हात ठेवावयाचे नव्हते. 'नरो वा कुंजरो वा' येवढेंसुद्धां म्हणण्याचे कष्ट त्यांना मी देणार नव्हतों. होणाऱ्या जयापासून मिळणाऱ्या स्वार्थांत सुद्धां आम्ही त्यांना हिस्सा देणार नव्हतों, येवढी त्यांची प्रतिष्ठा आम्ही राखणार होतों. निष्काम व निःस्वार्थी अशीच त्यांची भूमिका होती किंवा आम्ही ती तशी ठेवली होती. त्यांनीं मान्यता दिली. योजना साधी पण कल्पक असाधारण, कार्य क्षणाचें पण परिणाम युगाचे. नाट्य म्हणजे वस्तुस्थितीचें प्रतिबिंब, पण येथें वस्तुस्थिति ही प्रतिबिंब होणार होती.

दुसरे दिवशीं संध्याकाळीं राजाभाऊनीं



ठराविक वेळीं ठराविक रस्त्यानें जावयाचें व आमची भेट होतांच सहज बाबूरावाच्या पायाकडे पहावयाचें व पुढें जावयाचें. व्यक्ति, वेळ, व प्रसंग हीं घटनेंतील द्रव्यें याप्रमाणें मुक्रर केलीं. त्याच दिवशीं संध्याकाळीं विषयाचे ओघांत राजाभाऊचा कोरा जोडा दोनतीन दिवसांपूर्वी वेलबागेंतून कुणीतरी उडवला म्हणून म्हणालों. राजाभाऊ वेलबागेंत दर्शनाला जातो ही गोष्ट सर्वांना माहीत होती. त्यावेळेचे विद्यार्थी मागासलेले होते व आतांसारखें 'लकी रेस्टॉरंट' ही तेव्हां नव्हतें, अगर जंगली महाराज रोड नव्हता कीं जेथें अनेक 'देवतांचीं' दर्शनें सहज व्हावीत. अंदाजाप्रमाणें आमच्यांतील दत्ता म्हणाला, 'बाबूराव, लेका, राजाभाऊचाच जोडा तूं उडविलास!' मी म्हणालों, 'जाऊं द्या, राजाभाऊला थोडाच पत्ता लागणार! आपल्यापैकींच कोणी सांगितलें तर कोण जाणें.' आणि आयागोच्या भेदक दृष्टीनें बाबूरावाकडे पाहूं लागलों. एवढा बनेल पण मन चळूं लागलें हें त्याच्या डोळ्यांतून दिसूं लागलें. हुषारीनें विषय बदलला व म्हणालों, 'उद्यांपासून दोन तीन दिवस आपण हा वेलबागेवरून जाणारा रस्ता घेऊं नये. कदाचित् राजाभाऊ आसपासच शोधांत असावयाचा!' त्या दिवशीं बाबूराव सारखा इकडे तिकडे पहात चालत होता. नेहमीं वर पाहून चालणारी दृष्टी भूमिगत झालेली दिसली. दुसरे दिवशीं, अगदीं सहज, ज्या रस्त्यानें जावयाचें त्या रस्त्याकडे मंडळीना बोलण्याचें भरांत नेलें आणि जमखिंडीकरांचे वाड्याजवळील वळणाजवळ येतांच राजाभाऊंची मूर्ति समोरून येतांना दिसली. पालीपुढें नांगी टाकावी तसें बाबूरावचें झालें. राजाभाऊनें ठरल्याप्रमाणें बाबूरावच्या जोड्याकडे पाहिलें. विचकल्यासारखें केलें, व मी लगबगीनें त्याला भाषणांत गुंतवून अत्यंत महत्त्वाचें कांहीं सांगावयाचें आहे अशा झोकांत बाजूला नेऊन मार्गी लावलें. परत येतांच बाबूराव अगदीं शरण आला होता. जोडा जाणार याबद्दल तितकेसें वाईट वाटत नसावें, पण त्याबरोबर आणखी कांहीं, म्हणजे लौकिक नव्हे, पण हुषारीचा अहंभाव जाणार होता. 'गाढ्या, लेका, वाटेल तें कर पण राजाभाऊला सांगूं नको. वेलबागेंत परत ठेवतों पण बोंबलूं नको.' त्याची वाणी खालच्या पट्टींत घोळती झाली. मनांत म्हणालों, 'येथपर्यंत तर योजना सफल झाली.' 'पार्टी देशील तर आम्हीं गप्प रहूं.' व्यवहारी सवंगडी बोलते झाले. बाबूरावाला दुसरा मार्ग नव्हता. तेथून आम्ही किर्लोस्कर थिएटरांतील उपहारगृहांत गेलों. यथेच्छ खाल्लें. बाबूरावानें बिल दिलें. जोड्याचे किमतीयेवढें जवळ जवळ तें होतें. बाहेर आल्यावर त्याला म्हणालों, 'जा. आम्ही कोणी राजाभाऊला सांगणार नाहीं.' व राजाभाऊलासुद्धां त्याच्या मदतीनें आम्ही काय मिळविलें हें सांगितलें नाहीं. आज तो जिथे [illegible] त्यानें वाचल्यास माझ्याबद्दल त्याचें [illegible] हें सांगता येत नाहीं.

आणि या आठवणीपासूनच १९२१ ची अहमदाबादची कॉंग्रेस आठवली. तेथें प्रत्येकाजवळ जोडे ठेवण्यासाठीं एक पिशवी दिली होती व त्यावर आमच्या एका पुढाऱ्यानें 'युक्तिवाद कमी पडल्यास उपयोगी पडणारें वादांतील अस्त्र' अशी कोटी केली होती.

१९२० सालापासून चपला युग सुरू झालें होतें. गेल्या तीस वर्षांतील अनुभव विविध आहेत. तथापि चपलांबद्दल लिहावयाचें ठरविलें आणि 'चपला गेल्या कारण तुम्हा चपलांचा शाप' ही कल्पना मनाचा पिच्छा सोडीत नाहीं. 'तदैव किं न चपले प्रलयंगतासि' अशी आर्त वाणी कवींनीं काढल्याचें आठवतें. आणि वैरानें वैर वाढतें म्हणून चपलेनें मला शाप दिला असला तरी मी नित्य चपलेची (लक्ष्मीची) उपमा देऊन तिचा क्रोध कमी करत आहे. हा गार्ग्यकुलोत्पन्न 'चपला चपला अस्ति' असें जाहीर करीत आहे. आणि आजपावेतर लक्ष्मीनें मजकडे पाहिलें नाहीं याचा सूड सूडही घेत आहे!

• • •



दुरून
कांहीं तरी येत होतें
एकेक पाऊल उचलीत:
त्याची

# चाहूल

परीक्षांचे निकाल नुकतेच लागले होते. बाबल्या आठवींत गेला होता. प्रगति पुस्तकाची गुंडाळी डाव्या तळहातावर आपटीत, आपल्या मित्रांबरोबर घरीं येत होता. सर्वजण मिळून सिनेमाचा बेत ठरवीत होते.

मुख्य रस्त्याला लागून असलेला प्लॉट मोकळा होता. मागें मोठी इमारत होती; तीन मजली अन् तीन पाखी. मधल्या पाख्यांत प्रत्येक मजल्यावर तीन तीन ब्लॉक्स अन् दोन्ही टोंकाशीं काटकोन करणाऱ्या सरळ रेषांत दोन दोन ब्लॉक्स. तिसऱ्या मजल्यावर आपल्या आक्काकडे बाबल्या रहात होता. बरोबरचीं मुलें पुढें निघून गेल्यावर तो घराकडे वळला. दुपारच्या प्रहरीं सगळीं बिऱ्हाडं स्वस्थावलीं होतीं. व्हरांड्यांतल्या तारांवर पायजमे, झंपर, मुलांच्या चड्ड्या वाळत होत्या. वाऱ्यानें हळूच मागंपुढें हलत होत्या. खालीं नळावर मोलकरणी भांडीं घाशीत होत्या.

अर्धेअधिक पटांगण चालून आल्यावर घरीं पोंहोंचण्याची बाबल्याला एकदम घाई झाली. तो जोरानें पळाला अन् एका दमांत जिन्याच्या तक्कडींत येऊन पोहोंचला. दोन पायऱ्या चढला अन् पुन्हा दणक्यानें निघाला तो दुसऱ्या मजल्यावरच्या जिन्यापर्यंत. मग एक पायरी चढला अन् पाय निसटून मागें आपटला....... 'आई ग ...' करीत हळूच उठला. कपडे झटकीत इकडे तिकडे बघूं लागला. व्हरांड्यांत कोणी दिसत तर नव्हतें. पण ती एक पायरी चढल्यावर कोणीतरी खुसखुस हंसल्याचा आवाज आला. जिन्याच्या कठड्याला पकडीत त्यानें मागें ओणवून पाहिलें. भाव्यांच्या दारांत कोणीतरी ओझरतें दिसलें. उन्हामुळें आधींच लाल झालेलें त्याचें तोंड आणखी लाल झालें. अन् मग गुडघ्यांत चमक निघत होती तरी तो भराभर पायऱ्या चढूं लागला. वर पोंहोंचल्याबरोबर ओरडत सुटला, "लते......ए लता,......आम्ही पास झालों. ए आक्का, माझा दुसरा नंबर.......आक्का ग, आम्ही दुपारीं सिनेमाला जाणार अं......"

तो बोलून गेला अन् मग आपली चूक त्याच्या लक्षांत आली. आतां सिनेमाला जातांना ही पोरटी मागें लागणार! पण तसें कांहीं विशेष बिघडलें नव्हतें. सबंध चिकणी सुपारी खाण्यांत लता दंग होती. पुन्हा पुन्हा तोंडांतून काढून बघत होती, फ्रॉकला बोटें पुशीत होती.

प्रगति–पुस्तक पहात आक्का म्हणाली, "बाबल्या, सामान्यज्ञानांत मार्क कमी आहेत अं...बरं, चल जेवायला..." पण जेवणांतहि बाबल्याचें लक्ष नव्हतें....मित्रांबरोबर गप्पा, सिनेमा...मग बावन नाईंतर पुडिंग्...मग भटकायचं, खूप....उद्यां सुट्टी, परवां सुट्टी, सबंध महिनाभर सुट्टी!

जेवण करून तो व्हरांड्यांत चटई टाकून पडला. बराच लोळला. मग उठला अन् कठड्याला टेकून उभा राहिला.





अनुक्रमणिका

कुंडींत त्यानें लावलेली तुळस दरदरून फुलली होती. तिचीं गडद जांभळीं पानें उन्हांत चमकत होतीं. सहज त्यानें दोन तीन पानें खुडलीं अन् कचूकचू चावून टाकलीं. मग तो समोर रस्त्याकडे पाहूं लागला. रहदारी वाढत होती. बसेस जात होत्या, मोटारी पळत होत्या. मधेंच एक 'जीप' गेली अन् त्याचें अंग फुरफुरूं लागलें. त्या दिवशीं शरद दवळेच्या घरापासून पद्माकर राजेच्या घरापर्यंत 'जीप' बरोबर पळालों होतों मी. आणखीसुद्धां पळेन...त्याच्या अंगांत ताकद मावत नव्हती, सारखी सुरसुरत होती. खालीं नळ सुटले होते. पाण्याच्या जोरदार प्रवाहावर हात दाबून मुलें कारंजें उडवीत होतीं, मोठमोठ्यानें डरकाळ्या फोडीत होतीं. बाबल्या हसूं लागला. जमिनींत पाय रोवून बसलेल्या त्या कॉंक्रीटच्या मजबूत इमारतींत उभा राहून हंसूं लागला. उगाचच त्यानें कठड्यावर एक सणसणीत लाथ मारली अन् गुडघ्यांत चमक निघाली तसा तो स्वतः-शींच हंसत म्हणाला, 'अरे नळ आले?...म्हणजे अडीच वाजले!'

लता निजली होती. विशेष आवाज होऊं न देतां त्यानें तोंड धुवून कपडे घातले अन् आक्काजवळून पैसे घेऊन तो व्हरांड्यांत येऊन उभा राहिला. पण,......शरु दवळेचा अजून पत्ता नव्हता! झोपेंत लता ऊं ऊं करूं लागली तसा तो घाईनें निघाला अन दुसऱ्या मजल्यावर येऊन वाट पहात थांबला.

खालीं पटांगणांत एका बाजूला पांच सहा नारळी होत्या. त्यांतली एक गुडघ्यांत मोडते कीं काय अशी वांकली होती, घाबरत होती अन् तरी तिसऱ्या मजल्यापर्यंत चढली होती. बाबल्या तिला हंसत होता!...... अशी किती चढणार ही?...फार तर आणखी अर्धा मजला. पण त्या पूर्वींच मी मॅट्रिक होईन,...मग कॉलेज,......त्या जयंत केळकर-सारखं. पण तीहि त्याच्याकडे पाहून हंसत होती, डोक्यावरच्या झिंज्या हलवीत होती. थोड्याशा वाऱ्यानें देखील थरारत होती अन् तरी आणखी उंच चढण्याची तिला घाई होती. तिसऱ्या मजल्याच्याहि खूप वर,...उंच...उंच...म्हणजे समुद्र दिसला असता!

बाबल्या दचकला. गर्रकन् वळून पाहूं लागला.

दोन्ही हातांचे पंजे तोंडावर ठेवून ती हंसत होती. बाबल्या वळला तशी ती आणखी हंसू लागली. मग दोन्हीं मनगटें जुळवून, पुढल्या तळव्यांनीं चट्चट् वाजवीत हंसूं लागली. 'हं ऽ...अं ऽ ऽ' असा श्वास आंत ओढीत खूप मोठ्यानें हंसूं लागली.

बाबल्या प्रथम गोंधळून गेला. स्वतःहि हंसण्याचा प्रयत्न करूं लागला. पण तें जमेना तसा रागावला. एवढ्यांत शरु दवळेची हांक आली अन् गुडघ्यांत चमक निघत होती तरी जोरानें पळाला.

शरु दवळे वर व्हरांड्याकडे आश्चर्यानें पहात होता. बाबल्यानें त्याला हात धरून ओढलें अन् दोघे चालूं लागले. कांहीं वेळ बाबल्या आपल्याच विचारांत होता. मग त्यालाहि हंसूं आलें. पद्माकर राजेच्या घरीं पोंहोंचे-पर्यंत, काय झालें अन् आपण कां हंसलों हें तो विसरूनहि गेला. नंतरचा वेळ मित्रांबरोबर गर्दींत गेला. सिनेमा झाला, हॉटेल झालें. पैसे संपले अन् पुन्हा भूक लागली तेव्हां एकएकजण घराकडे वळला.

रात्रीं त्याला शांत झोप लागली. शिवाय, उद्यां सकाळीं आक्का त्याला लवकर उठवणार नव्हती. बापूसाहेबांनीं शाबासकी दिली होती. आतां-पासूनच कॉलेजमधें कोणते विषय घ्यावेत यासंबंधीं ते बोलूं लागले होते. मॅट्रिकच्या वर्षीं खूप अभ्यास करावा लागेल असं आक्का बजावून सांगत होती. पण बाबल्याला त्याची काळजी नव्हती. त्याच्या मागें पुढें सगळीकडे नुसता प्रकाश भरला होता. एवढ्याशा अंधेराला देखील कुठें जागा नव्हती. सगळें कसें चक्क, स्पष्ट होतें.

सकाळीं खूप उशीरा त्याला जाग आली. लताच्या गडबडीनें झोप मोडली. दार खटखट वाजवीत ती एकदां आंत लपत होती, पुन्हा बाहेर डोकावून पहात होती. वाकुल्या दाखवीत होती अन् मधेंच रागावून बोलत होती.

"ए मने...ए मनी मांजरी..."

"ए लतू...ए लतूड..."

"ए मनी मांजरी...म्यांव् म्यांव्...मिआँव..."

"हं, लता, असं बोलू नये अं..."

"मग ती कशाला म्हणते आम्हाला, लतूड..."

"लतूडच आहेस तूं...ए लतूड..."

"ए माऊ माऊ...ये तुला दूध देते, ए मनी मांजरी, ये..."

"काय ग, थांब आलेंच!"

अन् मनी मांजरी दोन पायांवर धांवत आली. खडाडत दार उघडलें अन् येऊन लताला तिनें उचलून घेतलें. लता किंचाळली अन् मग दोघीहि हंसूं लागल्या. उन्हाचे झोतचे झोत बाबल्याच्या अंगावर आले. डोळे चोळीत तो अंथरुणावर उठून बसला. ती त्याच्याकडे पाहूं लागली तसा चटकन् उठला अन् आंत गेला.

तोंड धुवून तो बाहेर आला तेव्हांहि ती तिथेंच होती. लताशीं खेळत होती, मधून मधून आक्काशीं बोलत होती.





अनुक्रमणिका

मत्रांशी बावल्या आंत पळाला तेव्हां तो थोडा लाजला होता पण आतां धैर्यानें म्हणाला,

"कोण ग तूं ?"

"कोण रे तूं ?"

"तो मामा आहे."

"गप बस ग लते....काल जिन्यांत आपटलास तोच ना तूं ?"

"मामा जिन्यांत आपटला...आक्का, मामा आपटला...आक्का..."

लताच्या ओरडण्यानें आक्का बाहेर आली, पहाते तर बावल्या तिथेंच उभा !

"काय रे, आपटलास तूं ?"

"नाहीं ग. नुसता पडलों" "तें पण काल"

"बोलला नाहींस तें ?"

"त्यांत काय बोलायचं ? सहज थोडा पाय घसरला तर"

आक्का आंत गेल्यावर तो पुढें म्हणाला,

"तर एवढं हंसायला काय झालं ?"

"हंसलं थोडं म्हणून कुठें बिघडलं ?"

अन् ती पुन्हां हंसूं लागली. मग हळूं हळूं बावल्याहि हंसूं लागला. तिच्याकडे निरखून पाहूं लागला.

ती अगदीं बारीक, अगदीं सडपातळ दिसत होती, शब्दकोशांत ठेवलेल्या प्लॅस्टिकच्या पट्टीसारखी!कडक, गोरी, उंच. बावल्याला वाटलं, मी तिच्या खांद्याला लागेन......नाहीं, कानाला ! तिचे खांदे खालीं ओघळले होते अन् मान उंच दिसत होती. पहाण्यासारखें तिच्यांत कांहींच नव्हतें, पण बावल्या पुन्हा पुन्हा पहात होता. मधेंच अचानक तिनें त्याच्याकडे पाहिलें, तो गोंधळला अन् मग एकदम त्याच्या लक्षांत आलें, तिचे डोळे. तिचे डोळे फार तेजस्वी होते. पावसाळ्यांत येणाऱ्या जांभळासारखे ताजे अन् टपोरे. 'माझ्याकडे बघतोस ?बघ ! ' असा त्यांत खट्याळ भाव होता. परीक्षा पास होऊन नवीन वर्गांत, नवीन शिक्षिकासमोर बसावें तसें बावल्याला झालें.

"तुझं नांव काय रे ?"

"देशमुख."

"तुझं नांव, आडनांव नाहीं"

"कशाला ?"

"सांगायला लाजतोस काय ?"

"हॅट"

"मग सांग कीं"

"बाबुलनाथ देशमुख."

"बाबुलनाथ ?अय्या ! म्हणजे बावल्या...बावल्या"

अन् ती पुन्हां हंसूं लागली. रागावून बावल्या म्हणाला,

"अँ ? हंसायला काय झालं ?"

"उगांच......माझं नांव माहीत आहे तुला ?"

"हो."

"काय ?"

"मनू...मनी...मनी मांजरी..."

चिडवण्याच्या स्वरांत बावल्या म्हणाला. मग लताहि चिडवूं लागली, "ए मनी मांजरी...म्याऊ..." पण मनू चिडली नाहीं. उलट, त्या दोघांबरोबर स्वतःहि आवाज काढूं लागली, "मिआऊं...आले,... पकडलं,...मिआँऊं..."

अन् मग तिघंहि हंसूं लागलीं.

नंतरहि ती बराच वेळ थांबली. बावल्याशीं थट्टेनें भांडूं लागली, लताशीं मोकळेपणानें खेळूं लागली, आक्काबरोबर जाणतेपणानें बोलूं लागली. ती जायला निघाली तेव्हां बावल्यानें सहज विचारलं,

"ए मनू, तूं इथें केव्हां आलीस ग ?"

"परवां......गुरुवारीं."

"भाव्यांच्याकडे ?"

"हो."

"कशाला आलीस !"

ती अकल्पित गडबडली. पदरानें तोंड पुशीत म्हणाली,

"काम आहे."

अन् मग खाडींतल्या पडावासारखी अल्हाद दूर गेली. दारांतच क्षणभर थांबली अन् हळूंच हंसली. तोंड न उघडतां, नुसत्या ओठांनीं. अन् निघून गेली.

बावल्याला वाटलं, उगांच विचारलं आपण. पण नुसतं काय काम आहे म्हणून विचारलं तर एवढं काय झालं ? वेडीच आहे !

दुपारीं मित्रांच्याबरोबर तो बाहेर पडला अन् हिंडण्याखेळण्याच्या गडबडींत तिला विसरून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती आली तेव्हां आक्का लताला न्हायला

घालीत होती. लताचा ठणाणा चालला होता. काल्सारखीच ती टवटवीत अन् निर्मळ हंसू घेऊन आली. आपल्या जांभळासारख्या डोळ्यांनीं बाबल्याकडे पहात लताशीं बोलूं लागली.

"ए लता ...ए लतू ...वा वा ! गंगाबाई करतांना असं रडतं का कोणी ?......वेडी रे वेडी. ये ये, मी पुसं ना अंग?.........ये मग इकडे........."

तिनें लताचें अंग पुसलें, केस कोरडे केले अन् टॉवेल, अक्का धुणें नेण्यासाठीं थांबली होती तिच्या बादलींत टाकला. लताशीं ती सारखी बोलत होती. अन् लता ? अंग पुसतांना, डोळ्यांत काजळ घालतांना, प्रत्येक गोष्टींत त्रास देणारी लता, तिच्याकडून मात्र सगळं विनतक्रार करवून घेत होती. लताला कपडे घालतां घालतां ती म्हणाली,

"तुझ्या आक्काला एकच मुलगी का रे ? "

"हो."

"आणखी होतील, नाहीं ?"

"मला काय माहीत ?"

"तुला पण होतील, नाहीं ?......मोठा झाल्यावर......"

बाबल्याला तिचें बोलणें विचित्र वाटलें पण ती अगदीं सहज बोलत होती. तो गप्प बसला तशी लता म्हणाली,

"हो हो, मामाला मुलगी होतील......"

दोघी हंसू लागल्या पण बाबल्याला राग आला. तो ओरडला,

"ए गप बस.......वेडी कुठली !"

पण लता तेंच वाक्य सारखी बडबडत राहिली. मनूनें विचारलं,

"तुमच्या बापूसाहेबांची मोटार आहे ?"

"नाहीं."

"मग काल होती ती ?"

"त्यांच्या ऑफिसची आहे."

"तूं पण मोटार घेशील ?"

"मी ?"

"मोठा झाल्यावर रे......"

"मला काय माहीत ?"

"आणखी काय करशील मोठा झाल्यावर ?"

"आणखी काय करायचं ?"

"लग्न ?"

"हो हो, मामा लग्न करील...मामा लग्न करीऽ...मामा..."

"अग ए......मूर्ख "

"अग बाई,...एवढं रागवायला काय झालं ?..."

"मी रागावलों काय ?"

"मग ?...लाजतोस तूं ?...ए लता, तुझा मामा लाजला..."

"...मामा लाजला...मामा लाजला..."

"ए मने, आतां लप्फड देईन एक..."

"अय्या, खरं ?"

"हो. एक दिली तर पाणी मागशील."

"मग पाणी देशील तूं ?...मला..."

आतां मात्र बाबल्याचा पूर्ण पराभव झाला ! काय बोलावें तें कांहींच समजेना. काल्सारखीच ती क्षणभर गप्प झाली अन् मग हंसूं लागली. दोघीही हंसू लागल्या. बाबल्या मात्र डोळे बारीक करून तिच्याकडे बघूं लागला. अन् तीच गोष्ट त्याच्या पुन्हा मनांत आली. किती लहान दिसते ही ! पांचवारी पातळांत पूर्ण गुंडाळल्यासारखी. पातळ सोडलं तर कदाचित् आंत सांपडणारच नाहीं......ती फक्त तिच्या हंसण्यांत होती, डोळ्यांत होती. लताला पावडर लावतां लावतां तिच्या डोळ्यांत पुन्हा तोच खोडकरपणा चमकला. कांहीं तरी अस्पष्ट उत्कंठा चमकली. पावडरचा पफ हातांत घेऊन ती उठली अन् म्हणाली,

"बाबल्या, तुला लावूं पावडर ?"

"अग नको .."

"थोडी लावते रे..."

"नको नको. माझी अंघोळ व्हायची आहे अजून...नको."





अनुक्रमणिका

ती त्याच्यावर चाल करून येऊं लागली तसा तो उठला अन् टॉवेल थोढीत बाथरूमकडे पळाला.

बंबाच्या नळ चालला होता तरी तिचें अन् लताचें बोलणें त्याला ऐकूं येत होतें. उगांच वेड्यासारख्या दोघीजणी बोलत होत्या !

"........... मोठी झाल्यावर तूं काय करशील ग ? ......' 'मी पातळ नेसणार......बापू मला पुस्तकं आणणार आहेत......' 'खरं ?......' 'हो. तुम्ही भाच्यांकडे रहातां ?...... मावशीकडे ?... तुला झिम्मा येतो ?... मग मला शिकव...' '...हो, शिकवीन अं. मी नाचणार आहे, खूप खेळणार आहे .....' 'मी पण, रडणार नाहीं कांहीं.... अं ?... काय कुठें म्हणालीस ?... आभाळांत देव असतो ? ... मग ?... समुद्रांत ना ?...... छल् खोटं. बापूसुद्धां म्हणतात असतो म्हणून... तुला दिसतो ?... खरं ?... मग मला दाखव. एकदांच दाखव ... ए दाखव ना ग.... अं ?... काय ?... जंमत ?...... हो हो करूं या..., ........."

लताशीं तिच्यासारखेच हेल काढीत मनू बोलत होती. तिचीं वाक्यें लता पुन्हा पुन्हा उच्चारीत होती. मधेंच दोघी हलक्या स्वरांत बोलत होत्या अन् चोरटें हंसत होत्या. तिच्या स्वभावाची बाबल्याला गंमत वाटत होती. तो विचार करूं लागला, पण काळ-काम-वेगाचं अवघड गणित सुटेना तसा मनांत म्हणाला, काय खुळी पोरगी आहे. उगांच ओरडलों आपण तिच्यावर.

अंघोळ झाल्यावर त्यानें वर पाहिलें.

बाथरूमच्या दारावर टॉवेल नव्हता, कपडे नव्हते !

"ए लते... गाढवे..."

दोघी बाहेर किंचाळत हंसूं लागल्या. एकीचें झालें कीं दुसरी, कीं पुन्हा पहिली अशा सारख्या हंसूं लागल्या.

"ए आक्का... ए आक्का... लते, मार देईन बरं का..."

तो ओरडूं लागला. दारावर बुक्क्या मारूं लागला. त्या आणखी हंसूं लागल्या. शेवटीं तो रडकुंडीस आला तेव्हां ती म्हणाली,

"ए बाबल्या, बाहेर ये."

"टॉवेल दे."

"नाहीं. तसाच ये..."

"अंऽऽ... दे ना टॉवेल..."

"देते पण..."

ती दाराजवळ आली अन् हळूंच म्हणाली,

"आधीं सांग, तुला आवडते मी ?"

"बिल्कुल नाहीं."

"मग टॉवेल देत नाहीं."

"अग नाहीं नाहीं.......आवडतेस मला तूं..."

"बरं. आतां सांग, तूं आंत लाजतो आहेस ?"

बाबल्या गप्प झाला. पुन्हा ओरडूं लागला. मग आपल्या उघड्या अंगाकडे पाहूं लागला. तिनें पुन्हा विचारलें,

"सांग ना,...लाजतो आहेस तूं ?"

"थोडासा..."

"ए बाबल्या, मी पण लाजते आहे रे..."

"ठीक आहे. पण टॉवेल दे ना..."

"बाहेर आल्यावर काय करशील तूं ?"

"काय करूं ?"

"मला मारशील ?"

"नाहीं नाहीं."

"मग नाहीं देत टॉवेल !"

"अग मारीन मारीन..."

कपडे मिळाल्यावर त्यानें अंग पुसलें, पायजमा घातला. मग टॉवेलचा पिळा केला अन् तो पट्ट्यासारखा फिरवित, चांगला सणसणीत रपाटा देण्याच्या तयारीनें तो बाहेर आला. पण ती बाहेर नव्हती, लताहि नव्हती. घाईनें तो ब्हरांड्यांत आला पण तेथेंहि त्या नव्हत्या. आक्का मात्र नुकतीच धुणें धुवून येत होती.

कदाचित् जरा वेळानें ती येईल म्हणून टॉवेलचा पिळा तयार ठेवून तो कांहीं वेळ थांबला. नंतर उठून दुसऱ्या मजल्यावर भाव्यांच्या ब्लॉकपाशीं आला. आंतून दोघींच्या खिदळण्याचा आवाज येत होता. तो दार उघडणार एवढ्यांत, पलिकडच्या ब्लॉकमधला जयंत केळकर त्याच्याकडे पाहून हंसला. नुसता पायजमा नेसून अन् हातांत टॉवेलचा पिळा घेऊन बाबल्या उभा होता. त्याला वाटलं, आपल्यालाच हंसतो आहे वेडा! अन् रागांतच तो वर आला.

आपण मनूवर रागावलों आहों हें त्याला विसरायचें नव्हतें. इस्तरी मोडूं नये म्हणून उठतां बसतां कपड्यांची काळजी घ्यावी तशी तो आपल्या रागाची आठवण मनांत वागवीत होता. पण सबंध दिवसभरांत ती आली नाहीं. दुसऱ्या दिवशीं आली तेव्हांहि त्याला आठवण होती पण मग त्या शिळ्या रागाला उकळीच फुटेना.

ती दररोज येत होती. पत्ते, कॅरम सर्व खेळ खेळत होती, सर्वांबरोबर बोलत होती, हंसत होती. बोलतां बोलतां मधेंच एखाद्या वाक्यानें त्याला गोंधळांत टाकीत होती. त्याला गंमत वाटत होती. कोणीतरी खूप गुदगुल्या केल्यामुळें शेवटीं तोंड दुखायला लागावें तसें होत होतें.

तिच्या येण्याची तो वाट पहात होता पण ती आली नाहीं तसा बाहेर जायला निघाला. पहिला जिना उतरला अन् थांबला. समोरून जयंत केळकर घाईनें येत होता. हातानें त्याला थांबण्याची खूण करीत होता.

त्याला थांबायचें नव्हतें. कारण, केळकर त्याला बिलकूल आवडत नव्हता. केळकरच्या घरीं त्याच्या आईशिवाय कोणीच नव्हतें म्हणून बाबल्या त्याच्याकडे सहसा जात नव्हता. शिवाय, तो केळकर म्हणजे महाशिष्ट! खेळतांना मुलें ब्लॉकपुढें आलीं कीं तो रागावे अन् त्यांना हाकलून देई. एकदां तर तो त्यावर मुद्दां रागावला होता. सध्यां कॉलेजांत इंटरला तर होता पण स्वतःला मात्र फार शहाणा समजे!

तरी पण....तसा तो बरा होता! खाकी गॅबर्डिनची पँट अन् कडक इस्तरीचा शर्ट घालून अन् सारखें हातरुमालानें तोंड टिपीत तो चालला कीं बाबल्या त्याच्याकडे पहात राही. मनांत म्हणे, 'हं, कॉलेज!...मी पण असाच ड्रेस करीन.'

केळकर आला अन् बाबल्याच्या पुढेंच उभा राहिला. 'अरे बाबल्या... अरे बाबल्या' करूं लागला. घाईमुळें त्याला नीट बोलतां येईना. बाबल्या वाकून म्हणाला,

"काय?"

"अरे काम आहे....ये तर..."

कुतूहलानें बाबल्या त्याच्याबरोबर गेला. आंत गेल्याबरोबर केळकरनें कावऱ्या बावऱ्या नजरेनें इकडे तिकडे पाहिलें अन् आई कामांत आहे अशी खात्री करून घेतल्यावर तो हळूंच म्हणाला,

"बाबल्या..."

"अहो काय?...सांगा ना ..."

केळकरनें गादी हळूंच बाजूला केली. तेथून एक [redacted] ला अन् हातांत तो गच्च आवळून धरीत म्हटलें,

"ए बाबल्या..."

अन् पुन्हां तो गप्प झाला! बाबल्या आश्चर्यानें पहात होता. [redacted] खालून कांहींतरी विलक्षण चीज निघेल असें त्याला वाटलें होतें पण साधा झंपरच निघाला! अन् मग एकदम त्याच्या लक्ष्यांत आलें,...हा झंपर मनूचा!

"हा झंपर तुमच्याकडे?"

"तेंच तर सांगत होतों." झंपरनें तोंड पुशीत केळकर बोलूं लागला, "बाहेर माझा शर्ट वाळत होता, तर त्याच्यावर येऊन पडला!"

"पडला असेल वाऱ्यानें..."

"हो पण...पण नक्की माझ्याच शर्टावर?..."

बाबल्या बुचकळ्यांत पडला. आश्चर्यानें केळकरकडे पाहूं लागला. मनांत म्हणाला, 'एवढा मोठा झालाय् पण काय मूर्ख मनुष्य आहे!'

केळकर त्याच्याकडे पहात राहिला. मग म्हणाला,

"काय वेडा आहेस रे...पण जाऊं दे...अजून..."

"अजून काय?"

"कांहीं नाहीं."

"मग द्या झंपर इकडे. मी नेऊन देतों."

"हो हो, पण...तूं देतोस होय?...ठीक आहे..."

"द्या कीं मग .."

झंपर हिसकावून घेऊन बाबल्या निघाला. त्याला राग आला होता. कारण समजत नव्हतें तरी खूप राग आला होता. पाय आपटीत तो भाव्यांच्या ब्लॉकपाशीं आला.

दार उघडेंच होतें. सर्वजण नुकतेच बाहेर जाऊन आले होते. खुर्चीवर झंपर फेकून बाबल्या जायला निघाला अन् नकळत दारांत थांबला.

मनू गुलाबी पातळ नेसली होती. केसांत तिनें फुलं माळलीं होतीं. पावडर जरा अधिक लावल्यामुळें गालावर अन् कपाळावर पांढरट डाग दिसत होते. पण तरी ती सुंदर दिसत होती. नेहमींप्रमाणें ती बोलली नाहीं तेव्हां बाबल्याला जरा चमत्कारिक वाटलें. जातां जातां तो म्हणाला,

"तुझा झंपर,...तिकडे पडला होता."

इतका वेळ मनू गप्प होती. जागी झाल्याप्रमाणें ती उठली अन् 'कुठं?' विचारीत त्याच्याबरोबर व्हरांड्यांत आली. बाबल्या थांबेना तेव्हां

त्याचा हात धरुन म्हणाली, "ए थांब ना...कुठें पडला होता?"

बाबल्या एकदम थांबला. अगदीं काकुळतीस आल्याप्रमाणें ती बोलली होती. पण मग नेहमींप्रमाणें बोलायला लागली, हंसायला लागली.

केळकर काय म्हणाला तें सर्व तिनें त्याच्याकडून काढून घेतलें. बाबल्या सांगत असतांना उतावीळपणानें 'खरं ! खरं?' असं सारखं विचारूं लागली. पुन्हा तेंच तेंच विचारून घेऊं लागली. ऐकतांना अगदीं मोहरून गेली. मग हंसूं लागली. हंसतां हंसतां तिचें अंग थरथरूं लागलें, डोळ्यांना पाणी आलें. सुखाचा आहे कीं दुःखाचा, तें समजूं नये असा चमत्कारिक भाव तिच्या डोळ्यांत चमकूं लागला. बाबल्या आचंबित झाला पण त्यापेक्षां अधिक रागावला अन् म्हणाला,

"हंसूं नकोस ग...हंसूं नकोस...,'

"बरं, नाहीं हंसत."

तिचं हंसूं दबून गेलं. दम लागल्याप्रमाणें ती फुसफुसूं लागली अन् पुन्हा तिचे डोळे भरून आले. त्यांतली विचित्र चमक नाहींशी झाली, भाव ओळखीचा वाटूं लागला. व्हरांड्याच्या कठड्यावर हात अन् डोकें टेकून ती स्फुंदूं लागली. मग सरळ सरळ रडूं लागली. तिची आई एकदां दारांत आली अन् कांहीं न बोलतां आंत निघून गेली. बाबल्या चकित झाला, मग बावरला अन् तिला थोपटूं लागला,

"ए मनू...मनू रडूं नकोस ग...मला सांग काय झालं?...मला सुद्धां नाहीं सांगणार?...सांग ना..."

मोठ्या प्रयत्नानें तिनें स्वतःला आवरलं. पदरानें नाक, डोळे पुसले. मिनीटभर ती स्तब्ध राहिली. मग त्याच्याकडे पहात, किंचित् हंसत म्हणाली,

"तुला सांगूं?"

"हो. सांग."

"काय सांगूं?"

"काय झालं तें......कुठें गेली होतीस तूं?"

"कुठें नाहीं."

"सांग ग......मला फसवूं नकोस."

"मी गेले होते,......फोटो काढायला."

"फोटो?"

"हो. तुमच्याच तर मोटारींतून गेले होतें. आक्का कांहीं बोलली नाहीं?"

"नाहीं बुवा,...बरं. पण फोटो काढला तर एवढं रडायचं कशाला?"

पुन्हा ती गप्प बसली. बाबल्या हट्टानें विचारूं लागला तरी कांहीं बोलली नाहीं. शेवटीं तो चिडून म्हणाला,

"बरं...नको सांगूं अं..."

"रागावूं नकोस रे बाबल्या...नको नको..."

पुन्हा त्याच कांपऱ्या स्वरांत ती म्हणाली. तिचे ओठ थरथरूं लागले, डोळे पुन्हा भरून आले. अन् तें पाहिल्यावर बाबल्याच्या पोटांत गलबलूं लागलें. विचार करीत तो थोडा थांबला. मग तिला समजावीत म्हणाला,

"मनू, तूं सांगितलं नाहींस तरी मला कळतंय्."

"काय?

"तुझं लग्न ठरतंय्...म्हणून फोटो काढला...कसं ओळखलं!..."

"होय रे होय...कित्ती हुषार आहेस तूं..."

तो थोडा थांबला. मग तिच्याकडे शोधक नजरेनें पहात म्हणाला,

"लग्न ठरलं तर रडतेस कशाला?"

"उगींच."

"वेडी आहेस."

"होय रे, वेडी आहे मी. पण तूं रागावूं नकोस माझ्यावर... बाबल्या...मला वाटतं...सांगूं काय वाटतं?"

बाबल्याच्या खांद्यावर तिनें हात ठेवला अन् त्याला आपल्या शेजारीं उभं केलें. नकळत दुसऱ्या हाताची मूठ गच्च आवळली. मग दूर त्या नारळींच्या पलिकडेहि ती पाहूं लागली. मिनिटभरानें बोलूं लागली,

"संध्याकाळचं आकाश किती छान दिसतं, नाहीं?......किती चमकतं......किती रंगाच्या लाटा......समुद्रासारख्या......किती सुंदर ......पण, ...... उगाचंच......बाबल्या, तुला सांगूं का......असा काय पहातोस? ...मी कांहीं वेडी नाहीं, बाबल्या. ......बाबल्या, तूं हुषार आहेस...तूं मोठा होशील, तुला......बघ, खालीं बघ ना. ......किती मुलं खेळताहेत......तो अनिल, ...तो विजू......ती सुधा. ...बाबल्या, मला वाटतं......खूप...खूप......"

खूप काय तं तिला सांगतां येईना. बाबल्या ऐकत होता. तिच्याकडे टक लावून पहात होता. ती वेडी नव्हती, खास. पण तरी तिचें बोलणें नीट उमजत नव्हतें स्वर बावरवून सोडीत होता. कांहींतरी खूप महत्वाचें होतें, त्याची चाहूल लागत होती पण तें समजत नव्हतें. मनांत नुसतें हळूं हळूं टोंचत होतें. ...... तो अस्वस्थ झाला अन् मधेंच एकदां त्याला वाटलं, हिच्या हाताला हिसडा द्यावा अन् इथून पळून जावं. पण मग त्याची त्यालाच लाज वाटली.

लता एवढ्यांत आली नसती तर तो स्वतःच रडायला लागला असता. एक एक पायरी उतरत अन् त्याला हांक मारीत लता आली.

"ए मामा......आक्कानं भजीं केलीं......तुला बोलावलंय्......"

"भजीं केलीं? ......ओ हो लता, आम्हांला नाहीं बोलावलं?..."

"मामाला बोलावलंय ......"

"बाबल्या, तुला भजीं आवडतात? ... अन् थालपीठ?......अन् टोमाटूचं सार?......बोल ना रे......खूप खूप खावं अन् खूप खूप खेळावं. ......चल लता, आपण खालीं जाऊं......खेळूं..,...झिम्मा खेळूं......"

त्या दोघी खालीं निघून गेल्या तरी बाबल्या बराच वेळ एकटाच उभा होता. मनांत उठणारे कल्लोळ दडवीत होता, सोडवूं पहात होता. ते सोडवतां येत नव्हते म्हणून अधिकच रागावत होता. जरा वेळानें आक्काची हांक आली अन् तो वर गेला.

बापूसाहेब आक्काला कांहींतरी सांगत होते. तो आला तसे ते गप्प बसले. जरा वेळानें म्हणाले,

"बाबल्या, इकडे ये."

"कशाला?"

"अरे कशाला, काय विचारतोस?"

"मला नाहीं खायचं......"

बापूसाहेब गप बसले. पण मग अक्का रागावून म्हणाली,

"बाबल्या,......अभ्यास करायला, फिरायला जायचं तर सारखा त्या मनूबरोबर काय खेळत असतोस!......जायचं नाहीं तिच्याकडे......"

"हो!......जायचं नाहीं!......बापूसाहेब तिला मोटारींतून घेऊन गेले तर मला सांगितलं का?......कां नाहीं सांगितलं?........."

त्याला कोणीच उत्तर दिलें नाहीं. तो उठला अन व्हरांड्यांत गेला. कठड्याला टेकून बसून राहिला.

खालीं पटांगणांत मुलांची गडबड चालली होती. चार चार, आठ आठ जणांचे गुच्छ खेळत होते. क्रिकेट, आंब्याच्या बाठी; शिवाशिवी, किती तरी खेळ चालले होते. पळतां पळतां मुलें सोप्यावर चढत होतीं, परत उड्या मारून दूर जात होतीं, नारळींना चकरा मारीत होतीं. संध्याकाळच्या वेळीं पसरलेल्या तिच्या लांबच लांब छायेची सीमारेषा कल्पून





अनुक्रमणिका

ओरडत होतीं, ' ए बाहेर गेला·········आऊट् आऊट्·········बाजूला हो ·········'

पायऱ्याजवळचा गलबला मधेंच थोडा कमी झाला. कोणीतरी गाणें म्हणूं लागली. गलबला आणखी कमी झाला. मग चारपांचजणी म्हणूं लागल्या, नाचूं लागल्या, टाळ्या वाजवीत ताल धरूं लागल्या.

'·······आंबा पिकतो······रस गळतो,······
कोकणचा राजा झिम्मा खेळतो······'

बाबल्या ऐकूं लागला. दोनचारदां तीच ओळ ऐकल्यावर उद्गारला, ' कुठलं भिकार गाणं काढलंय् ! ······जुनाट आजीबाईचं.' गाणं उंचावलं. आणखी कांहीं जणी म्हणूं लागल्या तरी आवाजांतली कर्कशता कमी झाली. त्यांत घनता आली; भरीवपणा आला. तीच ओळ मुली पुन्हा पुन्हा म्हणत होत्या·········

' आंबा पिकतो······रस गळतो,·········
कोंकणचा राजा झिम्मा खेळतो—'

बाबल्याला तें गाणें स्वस्थ बसूं देईना. तो उठला अन् वाकून बघूं लागला.

सातआठजणी गोल फेर धरून नाचत होत्या. त्यांच्यापेक्षां लहान होत्या त्या बाजूला उभ्या होत्या. गाणें उंचावलें कीं त्यांत आपला स्वर मिळवीत होत्या. सर्वांच्या मधें, फुलांतल्या केसरासारखी मनू उभी होती. स्वतःभोंवती पद्धतशीर फिरत होती. फिरतांना तिचा काळाभोर शेपटा हवेंत गोल वळणें घेत होता.

गाणं अगदीं तालबद्ध झालं, दूरवर पसरूं लागलं, सगळीकडे दरवळूं लागलं. नाद बरोबर कोठून उमटतो आहे, वर आकाशांतून का खालीं पटांगणांतून तें कळेनासं झालं. बाबल्या त्यांत लपेटून गेला.

सगळ्याजणींना दम लागला होता पण तरीहि त्या गात होत्या, बेभान होऊन थय थय नाचत होत्या. तळहातावर तळहात छप् छप् ठेका धरीत होते, पाय जमिनीवर ठरत नव्हते, धूळ उडत होती. उंच उंच चढणाऱ्या लहरी द्रुत गतीनें धांवत होत्या, त्यांतून आणखी जन्मत होत्या, विस्फुरत होत्या. इतक्या रसरशीत होत्या त्या कीं त्या कधीं थांबतील असं वाटत नव्हतं.

पण त्या थांबल्या. अकस्मात् थांबल्या. मनू मधेंच ठसकली अन् खोकूं लागली. मग खालीं बसून खोकूं लागली. मुली उभ्या राहिल्या, दम टाकीत तिच्याकडे बघूं लागल्या. बाबल्या पळत खालीं गेला.

तिचा खोकला अजून थांबत नव्हता. पायऱ्यावरून [illegible] घेत तो जवळ गेला. तिच्या पाठीवरून हात फिरवूं लागला. पण ती सारखी खोकत होती. मिनीटभर ती नुसतें कोरडें खरखरीत खोकत राहिली. दमछाट झाल्यामुळें तोंडानें श्वास घेऊं लागली.

तिची आई खालीं आली. भाव्यांची बायको आली. अन् दोघींनीं तिला वर नेलें. बाबल्या बरोबर गेला पण दारापाशीं आल्यावर, तिची आई म्हणाली, "आतां जा तूं."

दार बंद झालें. बाबल्या मुकाट्यानें वर आला. कोणाशीं बोलला नाहीं. रात्रीं जेवला नाहीं. बराच वेळ त्याला आपल्याला काय होतं आहे तेंच कळेना.

मग हळूं हळूं एकमेकांत गुंतलेले विचार कांहींसे नीट दिसूं लागले... मनूच्या मनांत कांहींतरी दुःख आहे याबद्दल त्याची खात्री झाली..... म्हणूनच ती कधीं तरी वेड्यासारखं बोलते, कांहींतरी करते. दमछाट होईपर्यंत खेळत रहाते. नीट बोलत नाहीं, कोणाला कांहीं मनांतलं सांगत नाहीं...मला सुद्धां नाहीं !...पण काय करणार असं ?... तिची आई तर नुसती पहात रहाते !...कां ?...कोणीच कां सांगत नाहीं ?...आक्काला अन् बापूसाहेबांना कांहींतरी माहीत आहे पण तेहि बोलत नाहींत···कां ?···या लोकांचं कांहींतरी ठरलंय,...कांहींतरी [illegible] आहे, खास...मनूला फसवायचं असेल, मनाविरुद्ध तिचं लग्न लावून टाकायचं असेल......अन् मी ?......ऐकणार नाहीं, मनूला फसूं देणार नाहीं...कांहींतरी करायला पाहिजे, लौकर...तातडतोब...पण काय ?

अन् मग महत्वमापनाच्या गणिताचा फार्म्युला आठवावा तशी त्याच्या डोक्यांत कल्पना आली,...मी अन् मनू पळून गेलों तर ?...कुठेंही, या फसवणाऱ्यांच्यापासून दूर...प्रथम त्याला कल्पना मोठी छान वाटली अन् मग हळूं हळूं भीति वाटायला लागली. उगांचच ! पण तरी त्यानें ती सोडली नाहीं.

तो हळूंच उठला अन् पाय न वाजवतां आंत आला. बापूसाहेब अन्

आक्का मोटारसंबंधींच कांहींतरी बोलत होते. तो आंत आला तसे ते गप्प बसले. अजून भूक नाहीं का लागली म्हणून आक्कानें विचारलं पण तो बोलला नाहीं. मुकाट्यानें अंथरुणावर जाऊन पडला.

शेजारीं [illegible] निजली होती. झोंपेंत हंसत होती. तिच्या गालावरून त्यानें हळूवार हात फिरविला अन् त्याचा गळा दाटून आला...मी गेलों तर,...लता रडायला लागेल, आक्का रडायला लागेल, बापूसाहेब घाब-[illegible] जातील. पण काय करणार?...लताच्या गालावरून त्यानें पुन्हां हात फिरविला. ओठ गच्च आवळले अन् तोंडावरून पांघरूण घेतलें.

• •

सकाळीं उठल्याबरोबर तो आधीं खालीं आला. भाव्यांचें दार बंद होतें. मनूशीं त्याला बोलायचें होतें. वेळ न घालवतां तावडतोब तिला भेटायला हवें होतें. जिन्यावरून खालीं अन् पुन्हा वर अशा त्यानें किती तरी चकरा मारल्या पण मनू भेटली नाहीं. दुपारपर्यंत भाव्यांचें दार बंदच होतें.

जसजसा उशीर होऊं लागला तसतशी काळजी वाढूं लागली. एकदां मनांत आलं, पळत जावं अन् लाथ मारून दार उघडावं...पण...आंत [illegible] दिसेल?...कदाचित् मनू आंत नसेल, तिला कुठं दूर नेलं असेल, बळजबरीनें तिचें लग्न लावीत असतील!...नाहींतर तिला मारीत असतील. दुष्ट माणसें [illegible] घसुक्यां घेतात!...पण तिची आई?...पुन्हा त्याला वाटलं, असं कांहीं शक्य नाहीं. मनू आंतच असणार.

दुपारचे तीन वाजले अन् मग त्याला धीर निघेना. वाटेल तें झालं तरी मनूला भेटायचंच असं ठरवून तो उठला. पुन्हा डोक्यांत कांहींतरी विचार आला अन् बाहेर जाण्याचे कपडे घालून तो खालीं आला.

भाव्यांचें दार उघडें होतें. कुठेंतरी बाहेर जाण्याची तयारी चालली होती. सोनसळीचें पातळ नेसून मनू कॉटवर बसली होती. तिनें उंच टांचाच्या चपला घातल्या होत्या अन् बाहेर चाण्यासाठीं घाईला आल्याप्रमाणें ती त्या काट् काट् वाजवीत होती. बबल्याला पाहिल्यावर ती उठली. पुढें येत म्हणाली,

"तूं?"

"हो."

"कुठें निघालास?"

"हें ग काय?...तुझ्याकडेंच तर आलों."

"आम्ही बाहेर चाललोंय रे...बापूसाहेब पण येणार आहेत."

"मग मी येतों."

"नको नको."

"मी येतों..."

सर्व जण खालीं आले. बापूसाहेबांनीं ऑफिसची मोटार पुन्हां आणली होती. बबल्याकडे त्यांनीं नापसंतीनें बघितलें.

मोटार निघाल्यावर त्यानें मनूला हळूच विचारलें, 'कुठें?' पण 'काम आहे' यापेक्षां ती अधिक बोलली नाहीं.

कांचेच्या खिडक्या असलेल्या एका इमारतीपाशीं मोटार थांबली. बापूसाहेब अन् भावे खालीं उतरले, अन् दगडी पायऱ्या चढून वर गेले. मग तिची आई उतरली. मनू उतरली नाहीं. बबल्याचा हात धरून बसून राहिली. आईला म्हणाली,

"आई, तूं हो पुढें...आलेंच मी."

आईनें एकदा तिच्याकडे अन् मग बबल्याकडे पाहिलें. मनूला ती कांहींतरी म्हणणार होती पण तिच्या डोळ्यांत पाणी तरारलें अन् चटकन् तिनें तोंड वळवलें. खूप थकलेल्या माणसाप्रमाणें, गुडघ्यावर हात ठेवीत ती एक एक पायरी चढली अन् आंत गेली.

मूक चित्रपटासारख्या या सर्व हालचाली बबल्या बघत होता. त्याला खूप बोलायचें होतें, मनूला किती तरी विचारायचें होतें, तिला सोडवायचें होतें. पण मनावर कांहींतरी दडपण येत होतें अन् तोंड दाबून धरीत होतें. मनूनें धरलेला हात सोडवून घेण्याचा त्यानें नकळत प्रयत्न केला

पण तिनें तो भागखी गच्च पकडला ! मुकाट्यानें तो समोर पाहूं लागला.

मोटारच्या कांचेवर पडलेल्या उन्हामुळें डोळे चमकत होते. रस्त्यानें जाणारीं माणसें विचित्र आकार घेतल्यासारखीं दिसत होतीं. मनू पाठ ताठ करून बसली होती. सरळ समोर पहात ती म्हणाली,

"बाबल्या......"

"काय ? "

"आतां तूं इथेंच थांब. मी आंत जातें."

"कां ?" म्हणून विचारीत बाबल्यानें तिच्याकडे पाहिलें. तिच्या गालांना राखेसारखा मळकट रंग आला होता. खालचा ओठ ती सारखा चाळवीत होती. हात घामेजले होते, कांपत होते. कुठेंतरी दूर ती धास्तावल्या-सारखी पहात होती. कांहींतरी भयप्रद तिला दिसत होतें. त्यावरून दृष्टि काढून घेण्याची शक्तिहि जणूं तिच्यांत राहिली नव्हती.

"मनू......ए मनू..."

प्रथम तिला ऐकूंच आलें नाहीं. मग तोंडावर गोठून बसलेली भीति हळूं हळूं वितळूं लागली. त्यांच्या हातावरची पकड सैल झाली. छाती भरून तिनें श्वास घेतला अन् सोडला.

"मनू, चल ना."

"कुठें ?"

"कुठें जायचं तिथें."

"तूं नको. मी येतें जाऊन."

"मी येतों."

"नाहीं."

"बरं तों कशी येऊं देत नाहींस तें..."

"नाहीं रे बाबा, नाहीं. अन् कुठवर येणार तूं मजबरोबर ? आज रात्रीं तर आम्ही गांवाला जाणार."

"मग मी येतों."

"तूं येतोस माझ्याबरोबर ?...खरं ?"

"अगदीं खरं."

"कित्ती चांगला आहेस तूं...तूं शूर आहेस...पण मी फार भित्री आहे रे..."

"बरं, पुरे. चल आतां."

पण ती उठली नाहीं. वळून त्याच्याकडे तोंड करून बसली. त्याच्या डोळ्यांत पाहूं लागली. मग तिनें त्याच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवले अन् फुलाचा वास घ्यावा तसा आपल्या ओठांनीं त्याच्या गालाला स्पर्श केला. किंचित् मागें होऊन पुन्हा तसाच त्याच्या ओठांना स्पर्श केला. नंतर, आपल्या डोळ्यांनीं त्याला पकडून ठेवीत स्वतःला तिनें दूर खोडून घेतलें. अन् भराभर पायऱ्या चढून ती निघून गेली.

तोंडावर हात ठेवून अन् भुवया उंचावून बाबल्या पहात होता. ती निघून गेली तरी तिचा ऊष्ण श्वास त्याला आपल्या गालावर जाणवत होता. ओठांची चुरचुर होत होती. कांहींतरी चमत्कारिक वेदनेनें त्याचें अंग भरून गेलें. उगाचच उत्साह वाटूं लागला, अस्वस्थता वाटूं लागली. एक मिनीट झालें तरी ती कमी होईना. मग तिच्याप्रमाणेंच एकदम घाई करीत तो उठला अन् मोटारींतून बाहेर आला. दोनदोन पायऱ्यांवरून उड्या घेत वरच्या दाराशीं आला. थोडा थांबला अन् दार उघडून आंत गेला.

हॉल चांगला ऐसपैस होता पण आंत कोणीच नव्हतें. तो आला तें अर्धें कांचेचें दार आपोआप बंद झालें. समोर अन् दोन्ही बाजूंना दारें होतीं, तींहि बंदच होतीं. कोणीतरी येईल अन् चौकशी करील या अपेक्षेनें तो दाराजवळ उभा राहिला पण पांच मिनीटें झालीं तरी कोणीच आलें नाहीं. बाहेरच्या रहदारीचा आवाज मात्र दबल्यासारखा मंदपणें येत होता. तो पुढें झाला अन् पांढऱ्याशुभ्र भिंतीला लावून ठेवलेल्या बांकावर बसला.

त्याची नजर सगळीकडे फिरूं लागली. डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत फिरत्या खुर्चीपुढे टेबल ठेवलें होतें. त्यावर पेपरवेटखालीं कागद ठेवले होतें. कडेला टेलिफोन होता. उजव्या बाजूला वेताच्या खुर्च्या अन् पांढरें कापड आच्छादलेला कोच होता. भिंतीवर एक लांबलचक कॅलेंडर लटकत होतें. त्यांत, एक उभा माणूस दाखविला होता अन् घडी उलगडून कापड दाखवावें तशी त्याची छाती फाडून आंतलें काळीज बागानें दाखविलें होतें. फिरत फिरत बाबल्याची नजर त्या माणसावर स्थिरावली. छाती फाडली होती तरी तो माणूस रोखून पहात होता.

हॉलमधें सगळीकडे नुसतें स्वच्छ, शुभ्र अन् स्तब्ध होतें. जवळ इतर वस्तु होत्या तरी ती स्तब्धता तेवढी प्रकर्षानें जागवत होती. उगाचंच कसेंतरी वाटायला लावीत होती.

मधूनच एकदोनदां कोणीतरी कण्हत असल्याचा आवाज आला. टेबल इकडून तिकडे सरकवलें जात होतें. कांहींतरी यंत्र सुरू झालें होतें. पाय न वाजवतां बाबल्या हळूंच उठला अन् जिकडून आवाज येत होता त्या बाजूचें दार त्यानें किंचित् उघडलें. एकदम औषधाचा तीव्र दर्प त्याच्या नाकातोंडांत घुसला. झटकन् दार बंद करून तो मागें झाला. अन् मग कपड्यांत शिरलेल्या थंडगार किड्याप्रमाणें त्याच्या मनावर भीति चढूं लागली. श्वास रोधून तो अंमळ उभा राहिला अन् पुन्हां बांकावर येऊन बसला...कोणाला तरी हांक मारावी अशी त्याला अत्यंत इच्छा झाली. बापूसाहेबांनां हांक मारावी का मनूला?...पण मनू,......त्याचे गाल पुन्हा गरम झाले. ओठ थुरथुरूं लागले.

मनांतले विचार घालविण्यासाठीं तो दाराच्या कांचेंतून बाहेर पाहूं लागला. रस्ता दिसत नव्हता. जाणाऱ्या येणाऱ्या मोटारींचे टप तेवढे मागेंपुढें सरकत होते. माणसांचीं मुंडकीं, कोणीतरी दोरीनें बांधून ओढीत असल्याप्रमाणें दृष्टीपुढून तरतरत जात होतीं. वर दिसणारा आकाशाचा भाग लालभडक झाला होता. त्याचें मन अधिकाधिक बेचैन होत होतें. इथून तावडतोब निघून जावंसं वाटत होतें. पण तरी तो तसाच आंतल्याआंत झगडत राहिला.

बाजूचें दार उघडलें. मघाच्याच औषधाचा वास आला. मग एक टक्कल पडलेले गृहस्थ आले. त्यांच्या गुडघ्यापर्यंत पोंचणाऱ्या पांढऱ्या कोटाच्या खिशांत स्टेथोस्कोप दिसत होता, हातांत फोटोची फिल्म् होती. बाबल्याकडे त्यांनीं एकदा नजर टाकली अन् खिडकीजवळ जाऊन ती फिल्म ते तपासूं लागले. बाबल्या बसला होता तेथून त्याला एकांत एक गुंतलेले पांढरे फराटे तेवढे दिसत होते. फिल्म बाजूला ठेवीत त्यांनीं टेलिफोन उचलला अन् नंतर फिरवून ते बोलूं लागले.

"हॅलो......होय, मीच बोलतोंय...एक्स रे पाहिला......हा भरून घ्यायला पाहिजे...नाहीं, आतांच नाहीं...काय?......होय, तेंच सांगतोंय ...जायलाच पाहिजे. चालेल. लोणावळा, तळेगांव कुठेंहि...तावडतोब ...अन् मुलांना दूर ठेवा. अगदीं दूर..."

मधेंच ते दुसऱ्या टोंकाचें बोलणें ऐकत थांबले. बाबल्या लक्ष देऊन ऐकत होता. ऐकतां ऐकतां बांकाच्या अगदीं कडेवर आला होता. ते रागावून बोलूं लागले.

"...तें चालणार नाहीं....नाहीं, आधीं माझं ऐका...अं? ..नाहींतर 'केस्' घेणार नाहीं मी!...दुसरीं माणसं काय मारायचीं आहेत काय!

...मग?..हो हो, एकदा सांगितलं ना, फार भयंकर असतं 'इन्फेक्शन' ...तात्बडतोब पाठवा..."

'नॉन्सेन्स' म्हणत टेलिफोन त्यांनीं जोरानें आपटला. बाबल्याकडे रागानें पाहिलें अन् ते आंत निघून गेले.

अन् मग एकदम सर्व स्तब्ध झालें. त्या स्तब्धतेंतून कांहींशीं अस्पष्ट भीति बाबल्याच्या मनांत घुसली. पोटांत कालवूं लागलें, फडफडूं लागलें. त्याला वाटलं, तात्बडतोब उठलं पाहिजे, घरीं गेलं पाहिजे,...आक्काकडे. बापूसाहेब बाहेर येईपर्यंत थांबायचं नाहीं.. अन् मग?...अन् पुन्हा मन घट्ट करून तो बसून राहिला. जरा वेळानें बाजूचें दार पुन्हा उघडलें तसा तटकन् उठला.

पांढरे कपडे घातलेले दोघे नोकर बाहेर आले. त्यांनीं दाराच्या दोन्ही फळ्या पूर्ण उघडल्या अन् रबरी चाकांची गाडी ढकलीत तिसरा माणूस मागोमाग आला. एकजण पुन्हा आंत गेला अन् स्ट्रेचर घेऊन आला. मग त्यांनीं गाडीवर पसरलेलें ब्लँकेट उचललें.

खालीं एक माणूस होता. वाळलेल्या काटक्यांप्रमाणें त्याचे कोरडे खरखरीत हातपाय लांबच लांब पसरले होते. पांढऱ्या शुभ्र चादरीवर, भुरकट काळे केस विसंगत दिसत होते. नोकर त्याला स्ट्रेचरवर ठेवूं लागले तेव्हां त्याचा एक हात, तुटलेल्या फांदीप्रमाणें लोंबूं लागला......बाबल्याला वाटलं, हा कांहीं म्हातारा नाहीं. मग मेला कसा? इतका तरुण माणूस मरतो?......पण तो मेला नव्हता. स्ट्रेचरवर ठेवल्यावर डोळे उघडून तो बाबल्याकडे पाहूं लागला. ओळखीच्या माणसाकडे पहावें तसा पाहूं लागला. त्याची एकटक नजर ओळख उकरून काढूं लागली. त्याच्या शरीरांत त्राण नव्हतें, हातपाय लुळे पडले होते पण डोळे मात्र चमकत होते. शरीरांतील सर्व पाणी त्या दोन डोळ्यांत सांठून राहिलें होतें.

अन् बाबल्या घाबरून गेला. ती नजर त्याला ओळखीची वाटली. त्याच्या छातींतली धडधड पळभर बंद झाली अन् पुन्हा जोरानें सुरू झाली. ......ती नजर त्यानें ओळखली, पक्की ओळखली. एक एक पाऊल उचलीत, मागें मागें हटत तो दारापर्यंत गेला अन् मग एकदम पाठ फिरवून पळूं लागला. माणसें, मोटारी, बसेस् कांहीं न पहातां पळूं लागला. ......त्याचं मन विरघळून गेलं होतं. फक्त शरीर तेवढं पळत होतं. ......आधीं घरीं जायचं, आक्काकडे जायचं, एवढीच एक जबरदस्त इच्छा सर्व शरीर भरून टाकीत होती, छाती गरम [illegible] होता, अंगांतून निघणाऱ्या घामाच्या प्रत्येक थेंबाबरोबर निथळत होती.

बराच वेळ तो पळत राहिला. श्वासामुळें तोंड मिटतां येईना तेव्हां थांबला. एका दुकानाच्या फळीला टेकून दोन तीन मिनीटें उभा राहिला. बाजूचे लोक विस्मयानें बघूं लागले तसा पुन्हा निघाला. कावऱ्याबावऱ्या नजरेनें सगळीकडे पहात झप् झप् चालूं लागला.

मग, त्याच्या चालण्याचा वेग कमी झाला. वेळेचें त्याला भान नव्हतें. डोळ्यापुढें अंधारी येत होती त्यामुळें नीट दिसत नव्हतं. तो आपोआप थांबला...अमळशानें सर्व नीट दिसूं लागलें. सर्व कांहीं जागेवर येऊं लागलें. कांहींतरी जाणीव होऊं लागली, ......सुटल्याची, ......बरें वाटत असल्याची. ......पण आतां त्या जाणीवेचीच भीति वाटूं लागली अन् तो हळूं हळूं चालूं लागला.

नकळत तो अचूक चालत होता. मुख्य रस्ता संपला. मोकळा प्लॉट आला. समोर घर दिसूं लागलें. त्यानें पुन्हा पळायला सुरुवात केली. पटांगणांतून अन् दोन्ही जिन्यांवरून तो पळतच वर आला. जोरानें दार उघडून आंत गेला.

दोन मिनीटें स्वस्थ बसला अन् मनांत कांहींतरी आलें तसा घाईनें उठला. कपडे काढून त्यानें थेट बाजूला फेकून दिले. नंतर बाथरूममध्यें जाऊन तोंड धुतलें, ओठांना अन् गालाला पुन्हा पुन्हा साबण लावून धुतलें.

आक्का स्वैपाकघरांत गुंतली होती. लता कुठें खेळायला गेली होती. कोणाशीं तरी बोलावें, कांहींतरी बोलत रहावें, एकटें नको, असें त्याला वाटूं लागलें. तो उठला अन् व्हराड्यांत येऊन उभा राहिला.

संध्याकाळ टळली होती पण अद्याप अंधार झाला नव्हता. पाया-खालच्या सावल्या तेवढ्या नाहींशा झाल्या होत्या. खालीं पटांगणांत, रोजच्याप्रमाणें मुलांची गडबड चालली होती. चारचार सहासहा जणांचे गुच्छ खेळत होते, पळत होते, उड्या टाकीत होते. एक मुलगा दूर उभा राहून त्या उंच नारळीला दगड मारीत होता. बहुतेक नेम चुकत होते पण एखादाच बसला कीं टर्रर्र् आवाज करीत नारळी थरथरत होती. बाबल्याचे डोळे अकल्पित भरून आले. नजर बदलून तो दुसरीकडे पाहूं लागला.

तिघी चौघी मुली एकत्र आल्या अन् नाचूं लागल्या. झिम्मा खेळूं लागल्या. मनूनें केव्हांतरी शिकवलेलें गाणें गाऊं लागल्या;

"झिम् पोरी झिम्......कपाळाचं भिंग,
भिंग गेलं फुटून......पोरी आल्या उठून
झिम् पोरी झिम्.........."

पण पोरी उठून जात नव्हत्या; तशाच गात होत्या, नाचत होत्या, टाळ्या वाजवीत होत्या. अन् उंच तिसऱ्या मजल्यावरून बाबल्या पहात होता. त्याला स्वतःची लाज वाटूं लागली. हळूंहळूं सरकत तो व्हरांड्याच्या कोपऱ्यांत गेला.

मग त्याला स्वतःचा राग आला. वाटलं, स्वतःच स्वतःला उचलावं अन् तिसऱ्या मजल्यावरून खालीं फेकून द्यावं. पण डोळे पुन्हां पुन्हां भरून येऊं लागले अन् खालचें कांहीं दिसेना. अंगांतली ताकद संपल्या-प्रमाणें तो हलक होऊन खालीं बसला. डोळे पुशीत विचार करूं लागला. मग निर्भयपणें स्वतःवर रागावून म्हणाला, दुष्ट...भित्रा...पळपुटा !

हळूंहळूं अंधार झाला. सगळीकडे दिवे लागले. जेवणाची वेळ झाली. खेळणारीं मुलें निघून गेलीं. जीवाची उलघाल करणारी, उन्हाळ्या रात्रीची जड हवा आभाळांतून संथपणें उतरूं लागली.

खालीं मोटार आल्याचा आवाज झाला तसा तो चटकन् उठला, पण लाजेनें चूरमार होऊन पुन्हा खालीं बसला. आवाज न करतां मुकाट्यानें रडूं लागला.

लताला घेऊन बापूसाहेब वर आले. आंत गेले अन् मग पुन्हा एकटेच खालीं गेले. किंचित् विस्मयानें तो उठला अन् वांकून पाहूं लागला.

पायऱ्याशीं एक टॅक्सी उभी होती. पलिकडे बापूसाहेब मोटार धुववून घेत होते. भाभी, भाऊकाकडून सामान खालीं नेत होते. त्यांची बायको अन् मनूची आई बोलत उभ्या होत्या.

'कट्ट' आवाज झाला अन् व्हरांड्यांतला दिवा लागला. बाबल्या वळून पाहूं लागला.

मनू त्याच्या मागेंच उभी होती. दिव्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला होता. केस काळेभोर दिसत होते, डोळे चमकत होते. त्यांतलें पाणी आंतल्या आंत जिरवीत ती म्हणाली, "बाबल्या, आम्ही चाललों... ओळख ठेवशील माझी ?"

टिपकागदावर लाल शाईचा डाग पसरावा तसें तिच्या तोंडावर हंसूं पसरलें. मोठ्या हिंमतीनें ती बोलली पण त्या बोलण्यांत अन् हंसण्यांत फिकट आर्तता होती. बाबल्याला ती पुरेपूर जाणवत होती. अर्धवट रडत तो म्हणाला,

"मनू...मनू,...मला क्षमा कर."

"क्षमा ? कशाची ?"

मोठ्या प्रयासानें हुंदका आवरीत तो म्हणाला,

"मी घाबरलों...पळून आलों अन्...आल्याबरोबर तोंड धुतलं.... मनू रागावूं नकोस ग माझ्यावर..."

शेवटचें वाक्य तिच्याकडे मान उचलून पहात तो बोलला. ती गंभीर झाली, पण क्षणभरच. लगेच हंसूं लागली, अगदीं मनापासून अन् समजूतदारपणाच्या दुःखानें हंसूं लागली. "किती वेडा रे तूं...तुझ्यावर रागावेन मी ? कध्धीं नाहीं ग...बरं, जाते मी..."

"पण मनू..."

तिनें त्याच्याकडे पाहिलें अन् थांबण्याचा मोह तिला आवरेना. मागला दिवा बंद करून ती जवळ आली. त्याचे दोन्ही दंड पकडून अगदीं कानांत म्हणाली,

"बाबल्या............"

तो कांहीं बोलला नाहीं. तिचा श्वास त्याच्या कानावर आला तरी मोठ्या धैर्यानें तो उभा राहिला. कशाची तरी वाट पहात थांबला. त्याच्या दंडाचे स्नायु चांचपीत ती म्हणाली.

"किती तयार आहेत तुझे दंड.........तूं मोठा होशील, आणखी ताकदवान् होशील........."

अन् एकदम त्याचे दंड तिनें सोडून दिले. त्याच्याकडे एकदां पाहिलें अन् झपझप् पावलें उचलीत ती निघून गेली.

जिन्यावरून पळणाऱ्या पावलांचा आवाज आला. मग तोहि बंद झाला. मिनीटभरानें टॅक्सी निघाली.

बाबल्या तसाच उभा होता. ती निघाली कीं आपल्याला रडूं येईल, आपण तिला हांक मारूं असें त्याला वाटलें होतें. पण तसें कांहीं झालें नाहीं. तिच्याबरोबर तो खालीं सुद्धां गेला नाहीं. नुसता उभा राहिला. कशाची तरी चाहूल घेत थांबला.

खूप दूरवरून आपल्याकडे कांहींतरी येत आहे, एक एक पाऊल उचलीत मंदपणें, पण तितक्याच खात्रीनें, अपरिहार्यपणें येत आहे, त्याची त्याला चाहूल लागली अन् मनांतला एक कोमल भाग बधिर झाला; चिरडून मरूं लागला.

• • •





अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

केशवसुत

# नवचित्रकार आणि तुम्ही



वेळ सायंकाळची. कवीर त्याच्या एका शिष्याला म्हणाला, "आज मी तुला सिंह हिरवें गवत खातांना दाखवीन. त्याच वेळीं नदींतून चालणाऱ्या नावांच्या ऐवजीं, नावांमधून वहाणाऱ्या नद्या दाखवीन."

शिष्याला कवीराच्या बोलण्याचा अर्थ कळेना. परंतु तो कवीराचा शिष्य असल्यानें त्याला हें समजून चुकलें कीं, 'कवीराचे बोल समजण्यासाठीं मला ज्या पातळीवरून त्याच्या बोलण्याचा अर्थ लावितों ती पातळी बदलावयास हवी. तरच कवीराच्या त्या विशिष्ट अनुभवामागें दडलेला गूढ आशय मला कळेल.'

'कवीराला आपल्या अनुभवांतून जें कांहीं सांगावयाचें होतें तें कळवून घेण्यासाठीं शिष्याला स्वतः अंतर्मुख होऊन विचार करणें अगत्याचें वाटलें.

नवचित्रकारांचीं कांहीं संकलित चित्रें या अंकांत अन्यत्र पहावयास मिळतील. हीं चित्रें पहात असतांना सर्वसाधारण वाचकाला आणि रसिकाला कांहीं काळ संभ्रमांत पडल्यासारखें वाटेल. हीं सर्व चित्रें सांप्रत "मॉडर्न आर्ट"—'नवचित्र-कला' या नांवानें संबोधिलीं जातात.

कवीराच्या 'सिंहानें हिरवें गवत खाणें' अथवा 'नावांमधून नदीनें वहाणें' या उक्तींचा लागलींच अर्थ लागत नाहीं. बुचकळ्यांत पडायला होतें. नेमकें तसेंच या नव-चित्र-कलेच्या पंथांतल्या कलाकृतींबाबत होत असतें. परंतु कवीर कवीर होता म्हणून त्याच्या या वरपांगी चमत्कारिक उक्तींमागील गूढ, उच्च आशय समजावून घेण्याचा प्रयत्न सामान्य जनांकडूनही अद्याप होतो आणि त्या वेडेपणा म्हणून झटकल्या जात नाहींत; तें भाग्य नवचित्रकारांना लाभलेलें नाहीं. बरीचशी उपेक्षा आणि कांहींशी हेटाळणी या पंथाच्या वांट्याला येथें सतत आली आहे.

परंतु या अपेक्षेपलिकडे, हेटाळणीपलिकडे या नव्या, वाढत्या पंथाच्या प्रयत्नांत अधिक चौकसपणें, अभ्यासूपणें आणि स्वच्छ नजरेनें डोकावून पाहण्याची वेळ आतां आली आहे असें निश्चितपणें वाटतें. हा पंथ येथें रुजला आहे.

कवीराइतक्या नव्हे तरी कमींत कमी त्याच्या शिष्याइतक्या सहानुभूतीचा आणि अन्तर्मुख दृष्टीचा प्रांजल प्रयत्न कोणी करतील तर विक्षिप्तपणा, वेडसरपणा, पोरकटपणा, याहिपलिकडे या नवीन पंथांत आणि त्याच्या प्रयोगांना कांहीं आढळूं शकेल.

दी. १५

नवचित्रकला म्हणजे चित्रकलेंतला 'नव' पंथ. चित्रकला म्हणजे चित्रांची कला आणि कला म्हणजे अभिव्यक्ति किंवा अभिव्यक्तीचा प्रयत्न, एक मार्ग. अभिव्यक्ति जीवनाची, जीवनांतल्या वेळोवेळीं जागणाऱ्या आशयाची वा आशयाच्या तुकड्याची, बऱ्यावाईट अनुभूतींची आणि प्रतिक्रियांची.

म्हणजे चित्रकलेचें उद्दिष्ट हें असलें पाहिजे.

नवचित्रकार म्हणतात कीं आमच्या कलेंत हें आहे. किंबहुना आजवर या विशुद्ध अभिव्यक्तीवर कलाकृतीच्या अवस्थेप्रत ती पोंचेपर्यंत जे अनिष्ट संस्कार किंवा जुलूम होत, ते दूर करून ही अभिव्यक्ति अधिक मोकळेपणानें, इमानानें व्हावी म्हणून तर आमचा पंथ.

जीवन—वरवरचे फरक सोडले तर-मूलतः एकच. त्यामागचा आशय एक. आशयाचा तुकडा अपरिचित असला तरी संदर्भ परिचयाचा आणि बऱ्यावाईट अनुभूति आणि प्रतिक्रिया झाल्या तरी एका व्यापक पण निश्चित चौकटींतल्याच.

म्हणजे यांची विशुद्ध अभिव्यक्ति वास्तविक कुठल्याही सुबुद्ध माणसाला कळायला हवी; निदान ओळखीची वाटायला हवी. परंतु आज ती कळत नाहीं, अनोळखी, विक्षिप्त वाटते ही वस्तुस्थिति आहे.

नवचित्रकार म्हणतात कीं ही ओळख पटवून घ्यायची, आशय जाणून घ्यायची 'नजर' आजच्या बहुसंख्य सुबुद्ध माणसांपाशीं नाहीं. आमची कला बरोबर आहे. मार्ग थोडा वेगळा असला तरी योग्यच आणि अगदीं सरळ आहे.

ही 'नजर' म्हणजे काय?

वास्तविक कुठल्याही वस्तूला, पदार्थाला दोन रूपें असतात. एक जड, पार्थीव. म्हणजे समोर दिसतें तें. आणि दुसरें मनांत शिरतें, भ.पतें आणि मग वेडेंवांकडें किंवा मुळाबरहुकूम परंतु आगळी कशाशीं तरी निगडित असें टिकून राहतें तें. मनांतली ही एवढी क्रिया उणी केली तर केवळ वस्तूच्या पार्थीव, बाह्य आणि तुटक स्वरूपाला खरोखर अर्थ उरत नाहीं. मनाच्या या नैसर्गिक क्रियेला Impression असें थोडक्यांत म्हणतात. अभिव्यक्ति म्हणजे केवळ दिसतें तें तसेंच यांत्रिकपणें व्यक्त करणें नव्हे. अभिव्यक्ति म्हणजे दिसतें किंवा दिसलें याबद्दलचें मनावरचें Impression इमानानें व्यक्त करणें. दिसतें, मागाचें असतें तें जितकें मोघम, मिश्र, तितकी अभिव्यक्ति गुंतागुंतीची. तीं मनानें नव्यानें रचलेलीं, मांडलेलीं, दुरुस्त केलेलीं संक्षिप्त प्रतीकें जास्त.



अनुक्रमणिका

अर्थात्-यांतही एक पूर्णगणा असतोच. ही सारी गुंत मिळून कांहीं तरी धूसर, मोघम impression त्याच्या अनिश्चित, अदृश्य पण हमखास सीमांसह साकार व्हायला हवें; जाणवायला हवें.

नवचित्रकलेची कलाकृति यशस्वी वा अयशस्वी याचा हा निकष.

हें यशापयश सामान्य सुबुद्ध माणसाचें कसें ओळखावें? यशस्वी कलाकृतीचा आनंद त्यानें कसा उपभोगावा? 'नजर' कशी जोपासावी?

नवचित्रकार म्हणतात, त्यानें अंतर्मुख व्हावें. केवळ चर्मचक्षूंची भाषा विसरून अंतःचक्षू किलकिले करावेत. समोर फलकावर जें दिसतें आहे त्याचा अर्थ निव्वळ वस्तुनिष्ठ, पार्थीव, परंपरागत दृष्टिकोनांतून लावण्याचा घाईचा आणि चुकीचा प्रयत्न न करतां चित्र सरळ आणि विशुद्ध अनुभूतीपर्यंत संज्ञाप्रवाहापर्यंत सहज आणि न अडता पोंचूं द्यावें. असें तें पोंचलें—आणि तें यशस्वी असलें—तर कुठें तरी कांहींतरी उजळेल. निदान निमिषभर 'मी' पूर्णपणें विसरला जाईल. गोंधळ सरून सहानुभूतीची तृप्ति पसरेल. आनंद मिळेल, चित्र प्रतिभेंत स्फुरतांना, फलकावर उतरतांना आणि उतरल्यावर चित्रकाराचें नेमकें हेंच होतें.

अद्यापही हें अवघड वाटतें. क्लिष्ट वाटतें. सरळ आणि विशुद्ध अनुभूति म्हणजे काय? संज्ञाप्रवाह म्हणजे काय?

विशुद्ध अनुभूति म्हणजे मनाची कणगी. गोदाम. यांत सारे अर्धेमुर्धे, जुने नवे, शुद्ध संमिश्र, लहान मोठे. अनुभव अस्ताव्यस्तपणें आणि तरीही एका अस्पष्ट सुसूत्रपणें पसरलेले, लपलेले, किंवा अडकलेले असतात. संज्ञाप्रवाह म्हणजे या अनुभवांची, या अत्यंत अस्ताव्यस्त, अव्याहत मालाची सतत आणि आपोआप होत रहाणारी उलट सुलट, सैरावैरा तरीही सुसंगत मोजदाद. या कणगीपर्यंत चित्रांतली विशुद्ध अनुभूति पोंचली. या अखंड चालणाऱ्या यादीच्या पुढ्यांत ती पडली कीं खट्दिशीं तिची जात पटते. सच्चेपणा पटतो. तिच्याच जातीचें मुळांतलें कांहीं चाळवतें, खळखळतें, खळखळत रहातें आणि बुडबुडे मागें सोडून पुन्हां तळाशीं, खोल जातें. उरते तृप्ति. Aesthetic Ecstacy असें या अवस्थेला म्हणण्यात येतें.

असा अनुभव रसिकांना संगीत ऐकतांना, काव्य वाचतांना वा एखाद साधें निसर्गदृश्य पहातांनादेखील येतो. तसाच तो चित्र पहातांनादेखील येईल; यायलाच हवा. रडणें, हंसणें, दुखावणें आणि सुखावणें या पलिकडची जी एक धुंद, संमिश्र मानसिक अवस्था कलेच्या कुठल्याही माध्यमांत कलाकाराला जाणवते तशी ती नवचित्रकलेंतही जाणवायला हवी. नवचित्रकारांना ती जाणवते. अर्थात् रसिकांना ती, अवश्य ती कळकळ बाळगल्यास, कां जाणवूं नये?

नेमका हाच रसग्रहणाचा भाग सर्वसाधारण रसिकांना अधिक सुगम व्हावा म्हणून केशवसुतांची एक कविता आम्ही कांहीं विख्यात नवचित्रकारांना दिली आणि तिच्याबाबत प्रत्येकीं जें स्फुरेल तें (वेगळ्या लेखी खुलाशासह) फलकावर उतरविण्यास सुचवलें. तींच या अंकांत छापलेलीं नवचित्रें.

दिलेली कविता अशी :

व.गि

मज्जेचीं निज जो फुलें पसरितो आयुष्यमार्गावरी,—
आहे अद्भुत रम्य का अधिक तें त्याहूनि कांहींतरी ?
चाले तो धरणीवरी तर पहा ! जेथूनि तो चालिला,
धूळी तेथील होतसे कनकिता !—घेऊं नका भ्रान्तिला.
तो गम्भीर वदे स्वा, तर, मुक्या पृथ्वीस या वाटतें,
कीं "मातें श्रुति लक्षसंख्य फुटल्या," आणीक ती ऐकते !
दृष्टी तो फिरवी वरी, तर लवे आकाश तें खालती,
तारांचे गण गात्रयाम वरुनी स्तोत्रें अहा ! लागती !
लीलेनें स्वकरांत तो धरितसे कांडी वरूची जधीं,
साऱ्या सुन्दर वस्तु त्या झडकरी येती समाधीमधीं—
त्याच्या, येउनि त्या तयास वदती "आम्हांस दे भूषणें,
दिव्यें, आणि शिकीव लौकरि अम्हां तीं अप्सरोगायनें !"
श्वासोच्छ्वास करी परी नवल हें :—जो विश्वसंहारक
वायू घेउनि आंत, तो त्यजितसे वायूस त्या पोषक !
राही तो, तर देव भूमिवरतीं येतात हिंडावया,
जातां, स्वर्ग सवें धरेस उतरे त्यालागिं धुंडावया !
दादर, १४ मार्च १८९१.

• • •

चित्रांसोबत चित्रकारांनीं दिलेले खुलासे आतां पाहूं.

गाडे म्हणतात,

"माझें चित्र कवितेचें प्रतिचित्रण नव्हे. मात्र 'साध्याही विषयांत नितांत आशय पहाणारा', त्यांतूनी मौलिक सौंदर्यानुभव घेऊं शकणारा व तो शब्द व कल्पना या समर्थ्यानिशीं विविध प्रतीकांद्वारें व्यक्त करणारा कवि आणि हेंच वेगळ्या, रंगरेषांच्या सामर्थ्यानिशीं साधणारा चित्रकार यांतलें मूलभूत साम्य मला कवितेंत जाणवलें. माझ्या पद्धतीनें मी याबाबतचें माझें Impression चित्रांत मांडलें आहे.

सार्थी मूर्तीचीं ओबडधोबड, मोडकीतोडकी घरें आणि भव्य, नितांत सौंदर्यानें भरलेला निसर्ग यांतून हें चित्र उत्स्फूर्त झालें आहे. रंगकार व रेषाकार यांच्या परस्परसंबंधामुळें निर्माण होणाऱ्या पृथ्वसापेक्षतेंतून Space relations व्यक्त होऊं पहाणारें कांहींतरी मौलिक व्यक्त होऊं देण्याचा हा प्रांजल प्रयत्न आहे. हें 'कांहींतरी' स्वानुभवसिद्ध आणि खोल आत्मप्रचीतींतून निर्माण झालेलें असें च आहे.

रसिक मनाला हें 'कांहींतरी' आणि तें व्यक्त करण्यांत मला लाभलेलें कमी अधिक यश जाणवावें ही अपेक्षा. या 'जाणवण्या'ला मी Aesthetic ecstacy म्हणतों.

● ●

हिन सामंत म्हणतात,

"चित्रकाराचा स्वतःचा कांहीं अनुभव सांगण्यासाठीं चित्रकला निर्माण झाली असें मी मानतों.

अनुभव अनेक प्रकारचे येतात. परंतु त्यांतील कांहीं अजब कोडीं निर्माण करतात आणि तीं निमिषभरच, उदळ उदळ सोडवूनही दाखवतात.

केशवसुतांच्या या कवितेंत त्यांनीं कलाकार म्हणून अनुभवलेले असे कांहीं धुंद क्षण साकार करण्याचा प्रयत्न आहे.

माझ्या अस्तित्वामागल्या, या विश्वामागल्या कोड्याबद्दल मला नेहमींच उत्सुकता वाटत आली आहे. एकादें चित्र स्फुरतें आणि तें समूर्त करतांना ही उत्सुकता सुखावते. एक वेगळीच धुंदी, शांति रोमरोमीं अनुभवाला येते. हें मी स्वतः अनुभवलेलें आहे. समाधिसारखें कांहींतरी हें असतें. मी म्हणजेच सर्व कांहीं आणि सर्व कांहीं हाच मी, हा साक्षात्कार होतो.

म्हणूनच चित्रकलेला मी साधना मानतों. ही साधना प्रत्यक्ष जीवनांत राहून, जगून करावयाची असते. (योगसाधनेपासून म्हणूनच ही वेगळी.)

केशवसुतांनीं वर्णिलेला साकार करण्याचा प्रयत्न केलेला साक्षात्कार मला पटला. आपला वाटला. मी जी अवस्था अनुभवतां तीच ही, हें समजून माझ्या या मुक्त अवस्थेशीं संबंधित रंग व व्याप्ति (space) मी प्रथम दाखविली. नंतर सृजन करणाऱ्या कलाकाराचें प्रतीक व त्याच्या कलाकृतींनीं, किमयेनें लौकिक जीवनावर होणारे संस्कार हे मी निरनिराळ्या आकारांनीं चित्रांत मांडले. अमका आकार असाच कां किंवा त्याचा अर्थ काय याचें उत्तर माझ्यापाशीं नाहीं. हे आकार मनांतून, अस्तित्वांतून खळबळून वर आले आणि सहजच समूर्त झाले, इतकेंच. हे मनांत, अस्तित्वांत दडून, अडकून होते. कां तें मला माहीत नाहीं. कदाचित् याबाबत अनुमानधपक्यानें एकादा फार तज्ञ मानसशास्त्रज्ञ माझे सविस्तर आत्मवृत्त अभ्यासून बरोबर वा चुकीचें, कांहीं सांगूं शकेल. मला या कारणाशीं कर्तव्य नाहीं.

कलाप्रेमी माणसानें तपशीलवार अर्थ न शोधतां हें सबंध चित्र एक अनुभव म्हणून 'आत्मसात्' करावें ही माझी अपेक्षा.

● ● ●

गायतोंडे म्हणतात,

एखादी गोष्ट वा कल्पना 'प्रतिचित्रित' करण्यासाठीं मी चित्रनिर्मिति करीत नाहीं. माझ्या दृष्टीनें चित्र हीच एक स्वयंपूर्ण, स्वतंत्र अनुभूति आ

म्हणून कवितेचा अर्थ चित्रांत व्यक्त करण्याचा अस्वाभाविक प्रयत्नहि मी केला नाहीं. कविता हा एक स्वतंत्र सौंदर्यानुभव. (Aesthetic Experience) आणि चित्र हा दुसरा. शब्दाकार आणि रंग व रेषाकार हीं माध्यमेंच अगदीं भिन्न होत. म्हणून प्रत्यक्ष कविता शोधण्यासाठीं चित्राकडे पाहूं नका. चित्र चित्र म्हणूनच पहा. कविता व हें चित्र यांतून स्वतंत्रपणें एकच सौंदर्यानुभव व्यक्त होतो असें कुणाचें म्हणणें असेल तर मात्र मला तें मान्य होईल. माझा उद्देश तोच आहे.

चित्राचें स्पष्टीकरण अर्थातच गैरलागू आहे.

• •

पळशीकर म्हणतात,

" चित्रकार अमूकच पद्धतीचें चित्र कां करतो याचें एकमेव उत्तर कधींच देता यायचें नाहीं. कारण ज्या कालखंडांत तो रहातो, विचार करतो त्याच अनुरोधानें त्याचें मनोगत त्याच्या माध्यमांतून व्यक्त होत असतें. अमूकच रंगाकृति वा रेषाकृति तो कां वापरतो, वगैरे प्रश्न गौण ठरतात आणि ज्या दृष्टिकोनांतून तो बघतो (Attitude) तोच समजून घेणें जास्त महत्वाचें ठरतें.

म्हणूनच केशवसुतांची ही कविता वाचल्यावर जी सृष्टि माझ्या मनःचक्षूंपुढें आली तिचें चित्रण हातीं असलेल्या साधनांनीं करण्याचा प्रयत्न मी केला आहे.

केशवसुतांची कविता मला दिसली ती कांहींशी अशी :

" हे सृष्टी, कां अभिमान करतेस ? तुझ्याजवळ जें सौंदर्य आहे तें अस्सल नसून आभास आहे. त्यावर मला माझ्या कल्पनांचे साज वारंवार चढवावे लागतात. तुझ्यांत नसलेलें सौंदर्य जगाला दाखवावें लागतें. तुझे हे केवळ अलंकार पाहून मानव तुझ्याजवळ येतो व गात गात सौंदर्याचें पान करतो.

वर्षानुवर्ष झिजून तुला आलेलें वृद्धत्व लपवण्यासाठीं तुला नेहमीं नवनवीन वस्त्रें नेसवून सजवावी लागते. जुनीं वस्त्रें तुझ्या अंगावर लक्तरें दिसतात आणि तुझा चेहरा त्यामुळें जास्तच भेसूर दिसतो. पाण्याच्या लाटा, आकाशांतील तारका, किंवा हिरव्यागार वनराजीनें तुला झांकावें लागतें.

वृद्धे, तुझ्या रंजनासाठीं तारे, चंद्र, सूर्य यांची योजना केली आहे. अनंत काळ तूं यांचीं गीतें ऐकते आहेस परंतु यांना सदोदित नवीं गीतें शिकवून तुझ्यांतलें चैतन्य कसें बसें टिकवावें लागतें. सूर्याची प्रखरता आतां तुला सहन होत नाहीं म्हणून मेघांना तुझ्या मस्तकावर धरावें लागतें. पदोपदीं तुझ्या कुरूपपणामुळें, जरेमुळें तूं कळवळतेस आणि मग नवनवीन अलंकार पुरवावे लागतात– आणि मग कुठें किंचित् स्मित तुझ्या मुद्रेवर झळकतें. मुखावरील सुरकुत्या किंचित्शा लपतात. तुला तारुण्य प्राप्त झालें आहे असा खोटा भास कांहीं क्षण निर्माण होतो. तुला जगविण्यासाठीं मला श्वासोच्छ्वासही करावा लागतो. केवळ तुला पोषक असा उच्छ्वास बाहेर टाकावा लागतो. आणि हिरवी टवटवी टिकवावी लागते.

तूं सजलेस कीं प्रत्यक्ष देवही लुब्ध होतात. तुझ्या तारुण्याच्या आभासामागून ते विहार करायला इकडे येतात.

हे सृष्टी ! तूं खुशाल विश्रांति घे. फळेंफुलें, झाडीं, वर निळें अथांग आकाश, खालीं विस्तीर्ण जलाशय, हें सारें तुझ्या रंजनाकरतां, तुला भूषविण्याकरितां अस्तित्वांत आहे. मासे तुला गोड गीतें ऐकवून तुझी करमणूक करतील. या सर्वांच्या अस्तित्वाचा एकत्र आशय—बाजूचा पिवळा भाग—हा तुला अखंड तरुण आणि तेजस्वी ठेवील. तुझ्या निर्मितीमागल्या गूढाचा साक्षात्कार घडतील...कवि, चित्रकार वा कलावंत नव्हे, विश्वकर्मा.

क्षमर्ण पै म्हणतात,

"केशवसुतांनीं आपल्या कवितेंत वर्णन केलेला कवि म्हणजे केवळ शब्दलिपींमध्यें लिहिणारा बाळबोध साहित्यिक, असें मानावयास मीं तयार नाहीं. चैतन्याचा अमाप व तरल प्रवाह या हेतूनें कवि या प्रतीकाचा अर्थ लावणें मला योग्य वाटतें. आणि हा अर्थ घेणें अधिक योग्य वाटण्याचें आणखी एक कारण आहे, व तें हें कीं, या प्रतीकाला धरून चालण्यानें या क्षेत्रांतील समग्र कलाकार व द्रष्ट यांचे विचार या कवितेद्वारा अभिव्यक्त करण्याचा एक यशस्वी प्रयत्न केशवसुत करीत आहेत, असें मला आढळून आलें. साहित्याच्या प्राङ्गणांत अशा फारच कमी व्यक्ती आढळतील कीं ज्यांनीं संपूर्ण कलाजगताला आपल्या शब्दचित्रांनीं वेढा मारून एकत्र केलें आहे.

'कवि' ही कविता वाचल्यानंतर मीं माझ्या पद्धतीनें चित्र काढलें आहे. सर्वसाधारणपणें माझ्या कलाकृतींना 'मॉडर्न आर्ट' या नांवानें ओळखतात व मॉडर्न आर्ट म्हणजे 'न समजणारें, विचित्र, रंग व प्रतीकांचें कडबोळें' अशीहि समजूत रूढ आहे. या निमित्तानें मॉडर्न आर्ट अथवा नवचित्रांबद्दल लोकांच्या मनांत वसत असलेल्या शंकाकुशंकाचें निरसन करणें हा प्रमुख हेतु या निवेदनापाठीं नाहीं; तरी देखील नव चित्रांच्या आड दडलेलें 'चित्रकाराचें मन' साध्या व सरळ भाषेंत मांडणें हा हेतु मात्र निश्चित आहे. विशेषतः 'कविता'—चित्राचा आधार—वाचकांच्या समोर असल्यानें माझ्या चित्रामागील दृष्टिकोण सांगणें सोपें झालें आहे.

मीं स्वतःला कवि समजलों आहे. मला विशद करण्यासाठीं मी चित्रामध्यें मेघाचें रूप घेतलें आहे. कलाकाराचें रूप मुख्यतः चैतन्याचें असल्यानें, या चैतन्याला अधिकांत अधिक सुस्पष्टता व सामंजस्य आणण्यासाठीं मला मेघाचें तरल रूप फारच उपयोगीं वाटलें.

परवां माझे एक मित्र सदर चित्र पहात असतांना म्हणाले,

"का हो, तुम्ही मेघाचेंच रूप कां निवडलेंत ?"

"मला मेघाचेंच रूप योग्य वाटलें !" मीं.

"पण कां ?"

असल्या प्रश्नांना आजच्या चित्रकारांच्या दुनियेंत उत्तरें मिळणार नाहींत. प्रत्येक कलाकाराचीं कुवळशीं प्रतीकें त्याच्या सामाजिक, सांस्कृतिक, व धार्मिक संस्कारांवर अवलंबून असतात. याशिवाय मनाचें इतके कांहीं चमत्कारिक व गूढ व्यापार स्वदोदित चाललेले असतात, कीं मेघाचीच निवड कां करावी ह्याचा शोध करायला गेल्यास माझा मनोवैज्ञानिक Psychiatrist होईल आणि माझ्यांतील चित्रकार हरवून जाईल. मीं या मेघाचा रंग श्वेत दाखविला आहे.

# जखमी चंद्रमा



— बा. भ. बोरकर

जळनि आज चंद्रमा
घावांतुनि ढाळितसे घन तमांत रक्तिमा
लांछित जळ तप्त शिळा
वांछितात दंश कळा
'उघड तिळा' 'उघड तिळा' कण्हत क्रंदने क्षमा
वृक्षांतुन गळति विषें
पक्ष्यांचीं जळति पिसें
यक्षाचें विकट हंसें निकट करि परिक्रमा
कमलांतुन सुटति शाप
भ्रमरांतुन कलि कलाप
गंगेंतुन उठुनि पाप धरि गजेंद्र-विक्रमा
सघन गगन विगतधवा
ही हवाहि अहिप्रसवा
चरुंतुन पेरित वणवा घेरिते जगा अमा
स्पर्धेच्या फनुनि दलीं
श्रद्धेची वरकदली
मी वधिली मज मधली हाय माय पूर्णिमा

• • •

श्वेत रंग, कलाकाराच्या मौलिक सृजनशक्तीचें प्रतीक Original creative inspiration मानावयास हरकत नसावी. किंबहुना वेदशब्दस्तुतांनीं कवींचें जें सामर्थ्य आपल्या शब्दांमध्यें सांकळविलें आहे त्यांत त्यांचा आग्रह, कलाकाराच्या अक्षम सृजनसामर्थ्याचा परिचय देण्याचाच आहे. फुलांच्या लेखणीनें तो नव–निर्मिति करतो. दुसऱ्या हातावर त्यानें मस्तक विसवलें आहे. कलाकाराचें सृजनकार्य असें वरचेवर सहज, जाणीव आणि अ–जाणीव यांच्या दरम्यानचें, व निर्व्याज असतें :

यानंतर चित्रांतील इतर गोष्टींकडे वळावयास हरकत नाहीं. मीं वर सांगितलें आहेच कीं, कवि म्हणजे कलाकार हा चैतन्याचा प्रवाह. याच चैतन्याच्या क्रियेनें कलेचें सृजन होत असल्यानें चैतन्याचें निश्चित कलाकृतीच्या धारणेपर्यंतचें स्थित्यंतर कसें होतें हें माझ्या दृष्टिकोनांतून मला सांगावेसें वाटतें. माझ्या चित्रांतील इतर उरलेल्या प्रतीकांमध्यें मी तीच भावना प्रतिक्षेपित (interprete) करण्याचा प्रयत्न केला आहे.

चैतन्याचा संबंध व्यावहारिक जीवनाशीं येताक्षणींच चैतन्याच्या अमूर्त रूपाला मूर्त प्रतीकें मिळूं लागतात. मेघाचें रूपांतर होतें याचा अर्थ मूळ चैतन्य लोपलें असा नाहीं. चैतन्य अखंड, अक्षय आहे. त्याच्या केवळ संपर्कामुळें लौकिक रूपांमध्यें वेगळेंपण येतें. व म्हणूनच चित्रांतील इतर भागामध्यें चैतन्याच्या लौकिकत्वाशीं झालेल्या संपर्काचा परिणाम म्हणजे कलाकृती व तिचें भौतिक रूप विशद केलें आहे.

चैतन्याचीं प्रतीकें बनून स्वर्गीय आकाश--लोक, येथील तारे, नक्षत्रें चंद्र व सूर्य हे अवतरतात. चर्मचक्षूंना जरी तारे, नक्षत्रें, चंद्र व सूर्य दिसतात तरी देखील कलाकार त्यांना अज्ञेय अशा जीवन--प्रवाहाचीं प्रतीकेंच मानत आहे. जीवन प्रवाहाच्या मूळाचा शोध व त्याच्या हेतूबद्दलचे निरनिराळे सिद्धांत अन्यान्य तत्त्वें व दर्शनें, धर्म व शास्त्रें यांनीं अनंत काळापासून आपापल्या परीनें बांधलीं. परन्तु कलाकार हा तरीही असंतुष्टच आहे.

जीवनांतील स्थायी शांतीचा शोध अथवा शाश्वत अशांतीचा नाश कर यासाठीं प्रत्येक सजीव व चेतन मन अखंड प्रयत्न करत असतें. जें आपण सर्व जाणून घेण्याचा प्रयत्न करीत असतों, त्याला मी अज्ञेय (Unknown) समजून त्या अज्ञेयाच्या शोधांत कलाकाराला गवसलेलीं कांहीं रूपें म्हणून चंद्र, सूर्य, नक्षत्रादि रूपें चित्रित केलेलीं आहेत. हीं प्रतीकें केवळ जड व निष्प्राण नाहींत. तर तीं जणूं कांहीं 'दिसार' आहेत, मुख्य शोध लावण्याचें काम चालूच आहे.

• •

चित्रकारांचे हे खुलासे (आणि त्यांचीं चित्रें) लक्षांत घेतल्यानंतर त्यांच्या वतीनें श्री. गाडच्यांना अभ्यासूंना सांगावयाचें आहे तें असें ; 'उच्च, उदात्त, सात्विक सौंदर्य भावना (Aesthetic Emotion) उद्दीपित करणाऱ्या ('मी' विसरायला लावणाऱ्या—सं.) ललित चित्रांतील रसपरिपोष केवळ रंगरेखा-रचनेंतून (Design) होत असल्यामुळें नवीन







अनुक्रमणिका

या जुन्या चित्रांची रसग्रहण-पद्धति एकच आहे. पण जुनीं चित्रें प्रतिलेखन (मुळाबरहुकूम प्रतिकृति—सं.) पद्धतिचा अवलंब करीत असल्यामुळें चित्रमाध्यमांतर्गत सौंदर्यानंद (Aesthetic ecstacy) ग्रहण करण्याचें सोडून चित्रांत कोणता विषय प्रतिलेखित केला आहे व तो कितपत वास्तव निष्ठ आहे हें पहाण्याची संवय सामान्य माणसास इतकी झाली आहे कीं चित्रकलेंतील लालित्याचीं खरीं आणि आवश्यक मूल्यें, त्यांतील रसपरिपोष-पद्धति, याचा त्यांना विसर पडला आहे. नवचित्रांतील आनंद लुटण्यास हीच खरी अडचण आहे. हीं मूल्यें पुन्हा शोधलीं जाणें आवश्यक झालें आहे.

Aesthetic भावनांना प्रेरित करणारी रंगरेखांची रचना 'चित्र' या संज्ञेस प्राप्त होते. ती वास्तविता-दर्शक असेल, वा नसेल. व म्हणूनच चित्र ही एक स्वतंत्र अनुभूति आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. चित्रकारांत ही अनुभूति प्रेरित होण्यास एखादा प्रसंग, एखादी गोष्ट, वा निसर्गदृश्य कदाचित् कारणीभूत होत असलें तरी त्यांचा प्रेरणा देण्यापुरताच या अनुभूतीशीं संबंध असतो. या प्रेरणेच्या अभिसंभवांतून चित्रनिर्मिती होत असते. चित्रकारणाचा चित्रांतल्या अंतिम आकाराशीं ओळखण्याइतका संबंध असतोच असें नाहीं. चित्राचें नांव, चित्राचें स्वरूप याकडे बघतांना ही गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत ठेवणें आवश्यक असतें—या अभिसंभवांतून चित्रकाराच्या अंतःदृष्टीसमोर निर्माण झालेली रंगरेखा-रचना चित्र म्हणून फलकावर उमटते. त्यांत कांहीं ओळखीच्या वस्तूंचा भास होत असला तरी त्यांतील भावनापरिपोष रंगरेषा रचनेंतून (design) होत असल्यामुळें—वास्तवतेंतून नसल्यामुळें—चित्र-रसिकांस हा सौंदर्यानुभव अशा रचनेंतून आत्मसात् करण्याची संवय लावणें जरूर आहे.

एकच काव्य-कल्पना निरनिराळ्या प्रकृतीच्या वा प्रवृत्तीच्या चित्रकारांत निरनिराळी अनुभूति निर्माण करते. प्रत्येकाचीं आंतरदृश्यें वेगळीं वेगळीं असतात हें सोबतच्या कवितेनें प्रेरित केलेल्या चित्रांवरून (आम्ही चित्रकारांनां आपआपलें स्पष्टीकरण दिलेंच आहे.) स्पष्ट होतें. हीं आंतर दृश्यें नवनवीन आकार वा रंगाकार, रचना वा दृश्यमापेक्षता निर्माण करण्यास चित्रकारास प्रोत्साहित करीत असतात. पण चित्ररसिकाच्या दृष्टीनें मात्र चित्राचें अंतिम स्वरूपच जास्त महत्वाचें असतें. कारण त्यांतूनच माध्यमांतर्गत उदात्त रसपरिपोष व सौंदर्यानुभव मिळत असतो. चित्र पहाणाच्या रसिकांत त्यासंबंधी होणारी प्रतिक्रिया ही त्याची मानसिक पार्श्वभूमी आणि त्याचा व्यासंग यावरच अवलंबून असते.

• • •

कोडय़ा मांजरीसारखी
नको तेव्हां
अंगाशीं येते ती
ही




: स. गं. मा ल शे

रोम शहरांत वुसिओलु आणि पिएत्रु पावलु या नांवाचे दोन तरुण राहात होते. एकमेकांचे जिवश्चकंठश्च मित्र. एकाच सावेली घराण्यांतले. वडे वापके वेटे. कायद्याचा अभ्यास करायचा आणि त्यासाठीं वोलोनाला जायचं हा दोघांचाहि वेत.

स्नेह्यासोवत्यांचा नि आतेष्टांचा निरोप घेऊन ते दोघे वोलोनाला निघाले. वुसिओलुनें दिवाणी कायद्याचा तर पावलूनें फौजदारी कायद्याचा अभ्यास सुरूं केला. अभ्यास व्यवस्थित चालला होता. दिवाणी कायद्याचा अभ्यासक्रम अधिक जारीनें आंखलेला होता. त्यामुळं वुसिओलूचं शिक्षण अगोदर पुरं झालं नि त्याला पदवीसुद्धां मिळाली. तो रोमला परत जायचा विचार करूं लागला.

"हें वघ मित्रा!" वुसिओलु पावलूला म्हणाला, "मला आतां पदवी मिळाली. मी घरीं जायचं म्हणतोंय."

"छे छे! असं रे काय?" पावलु म्हणाला "हा हिंवाळा संपू दे. उन्हाळ्यांत माझी हि परीक्षा होईल. थांव ना रे तोंपर्यंत! मग दोघेहि एकदमच जाऊं. तोंपर्यंत तूं दुसऱ्या कसल्या तरी शास्त्राचा अभ्यासक्रम पुरा कर. इथं कमी मुदतीचे अभ्यासक्रम काय थोडे आहेत? म्हणजे वेळ फुकट गेला असं वाटायला नको."

हो ना करतां करतां अखेर वुसिओलूनं मित्रासाठीं राहायचं ठरवलं. आपण दुसरा कांहींतरी शिक्षणक्रम घेत आहोंत, तेव्हां उगाच उनाडक्या करण्याचा आपला हेतु नाहीं, ही गोष्ट त्यानं आपल्या आतेष्टांना कळविली.

मग दिवस जात न लावतां तावडतोव तो वसतिगृहांत राहाणाऱ्या आपल्या आवडत्या गुरुजींकडे गेला. त्यांचा सल्ला त्याला नेहमींच वहुमोल वाटत आलेला होता. तो म्हणाला, "गुरुजी, मी तुमचा आवडता विद्यार्थी! मला तुम्हीं मदत केली पाहिजे."

"म्हणजे? कसली मदत?"

"नाहीं. म्हंजे मी माझ्या मित्राच्या सोवतीसाठीं आणखी कांहीं दिवस इथंच राहायचं म्हणतोंय. तेव्हां एखादा कमी मुदतीचा शिक्षणक्रम घेण्याचा माझा विचार आहे. मला तुमचं मत पाहिजे. आणि मार्ग-दर्शनहि पाहिजे."

"कल्पना स्तुत्य आहे. पण शिक्षणक्रम मात्र तुझा तूंच आपल्या आवडीप्रमाणं निवड. माझ्याकडून शक्य ती मदत मी करीनच."

वुसिओलूचा ऊर कृतज्ञतेनं भरून आला. तो म्हणाला, "गुरुजी, मला—मला प्रेमशास्त्राचा अभ्यास करण्याची इच्छा आहे."

"वाः छान!" गुरुजी गंमत वाटून म्हणाले. "याहून उत्तम विषय तो कोणता? वहारीची आवड आहे तुझी. तुझ्या वयाचा विचार करतां या शास्त्राचा अभ्यास त्वां करावास, हें योग्यच. मीसुद्धां या शास्त्रांत पूर्ण पारंगत आहे. तेव्हां आतां वेळ न दवडतां अभ्यासाला आरंभच कर."

"हो. हो. पण आरंभ कसा करूं?"

"पहिली गोष्ट म्हणजे येत्या रविवारीं सकाळीं तूं फ्रांति मिनोरी चर्च-मध्यें जा. शहरांतल्या सर्व वायका तिथं आलेल्या असतील. प्रार्थना चालू असतां सर्वांवर नजर फिरवून कोण मनांत भरते तें निश्चित कर. प्रार्थना संपली रे संपली कीं तिच्यावर पाळत ठेवून तिच्या मागोमाग जा. तिचं ठिकाण पाहून ये. इतकं झालं कीं लगोलग मला भेट. वस्स. या शास्त्रां-तला हा तुझा पहिला पाठ. आणखी वाकीचे धडे मागाहून देईन."

वुसिओलु चर्चमध्यें गेला. सोयीस्कर जागीं उभा राहून त्यानं टेहळणी केली. पाहातां पाहातां त्याची नजर एका तरुणीवर स्थिर झाली. इतकी स्वरूपसुंदर आणि आकर्षक स्त्री त्यानं उभ्या आयुष्यांत पाहिलेली नव्हती. प्रार्थना संपतांच दवत दवत तो त्या सुंदरीमागून चालूं लागला. आपल्या मागून कोणी तरी प्रेमलंपट तरुण येतो आहे हें त्या चतुरेनं तेव्हांच ताडलं. वुसिओलूनं तिचं राहाण्याचं ठिकाण पाहून ठेवलं आणि तो लगोलग गुरुजींकडे आला. घडलेली हकीगत त्यानं निवेदन केली. तो म्हणाला,

"सर्व गोष्टी आपल्या सांगीवरहुकूम केल्या. पाखरूं असं पाहिलंय कीं ज्याचं नांव तें. ठिकाणहि नीट पाहून आलों."



अनुक्रमणिका

अभ्यासाच्या बाबतींतला आपल्या विद्यार्थ्यांचा प्रामाणिकपणा गुरुजींच्या परिचयाचा होता. तरीसुद्धां त्या विक्षिप्त शास्त्रांतली त्याची प्रगति पाहून ते थक्क झाले. ते हंसत हंसत म्हणाले, "ठीक ठीक. पहिला धडा तर उत्तम गिरवलास. आतां नीट लक्ष दे. यापुढं दिवसांतून तीन चार वेळां तरी तिच्या दारावरून येरझारा घालण्याचा नित्यक्रम ठेव. मात्र नीट काळजी घ्यायला हवी हं. त्या माणसाच्या लक्षांत ही गोष्ट यायलाच हवी—नजरेला नजर भिडायलाच हवी. पण आपण तिथं गोंडा घोळीत घुटमळतां आहोंत, हें चिटपांखरालाहि कळतां उपयोगी नाहीं. एवढं कर नि मला भेट. बस्स. हा तुझा दुसरा धडा."

प्रेमशास्त्राचा तो नवखा विद्यार्थी गुरुजींचा निरोप घेऊन बाहेर पडला. त्या सुंदरीच्या दारावरून येरझारा घालण्याचा उपक्रम त्यानं गंभीरपणं सुरू केला. होतां होतां एक तरुण इथल्या कोणातरी व्यक्तीसाठीं आपल्या दारासमोर घुटमळतोय, हें त्या तरुणीच्या लक्षांत आलं. तिचं दर्शन झालं कीं तो वांकूं लागला: या त्याच्या कृतीवरून तिची खात्री पटली कीं तो आपल्यासाठींच येरझारा घालतो आहे. त्यानं प्रेमळ नजरेनं पाहातांच तिनं तितक्याच प्रेमळ नजरेनं प्रतिसाद दिली. बुसिओलूची खात्री पटली कीं आपणहि तिला आवडलों आहोंत. तो तावडतोब गुरुजींकडे गेला! त्याची हकीगत ऐकून गुरुजी संतुष्ट झाले. ते म्हणाले, "वत्सा! छान! चांगली प्रगति होईल तुझी."

"हा सारा आपल्या मार्गदर्शनाचा प्रभाव."

"कसचा! कसचा! बरं, आतां पुढची गोष्ट. युद्ध आणि प्रेम यांत नेहमीं कारस्थानं लढवावीं लागतात. आतां असंच कारस्थान करून तिच्याशीं बोलण्याची संधि मिळवायची."

"होय. पण एकदम कसं बोलतां येईल?"

"अरे! मी सांगतों तुला युक्ति. शहरांतल्या रस्त्यांतून जाळ्या, भरतकामाचे रुमाल, सुंदर पिशव्या विकणाऱ्या त्या फेरीवाल्या बाया तूं पाहिलेल्या आहेस ना? त्यांतल्या एखादीला कांचनाच्या प्रयोगानं वश करून घ्यायचं, आपण त्या सुंदरीचे नम्र भक्त आहोंत, तिच्यावांचून आपणांस दुसरें कांहीं सुचत नाहीं. साऱ्या जगांत न आढळणारं अनुपम लावण्य तिच्या ठिकाणीं आहे, अशा प्रकारचा निरोप त्या फेरीवाल्या बाईकरवीं तिच्या कानांवर पडण्याची व्यवस्था करायची. थोडक्यांत म्हणजे तुझ्यासाठीं त्या बाईनं त्या सुंदर तरुणीकडे मध्यस्थी करायची. बस्स. एवढं जमलं कीं तावडतोब इथं वसतिगृहांत येऊन मला भेट. पुढचं मी सांगेन."

प्रेमशास्त्रांतला पुढचा धडा गिरवण्यासाठीं तो बाहेर पडला. कर्मधर्मसंयोगानं एक म्हातारी फेरीवाली त्याला आढळली. तीही मोठी चतुर निघाली. त्यानं चांगलं बक्षिस देण्याचं मान्य केल्यावर ती बाई म्हणाली, "एवढीच कामगिरी ना? शेट, तुमच्यासाठीं मी वाटेल तें करीन."

बुसिओलू म्हणाला, "गोड बोलून तिचं मन माझ्यावर जडेल असं कर."

बाई म्हणाली, "शेट. तुम्हीं काळजीच करूं नका."

बुसिओलूनं तिला दोन फ्लॉरिन्स आगाऊच दिले आणि तो म्हणाला, "व्हाया माकारेलापर्यंत जायचंय. तिथं गिओव्हॅना नांवाची अति सुंदर तरुणी राहाते. तिला सांगायचं कीं तुझ्या कृपाप्रसादासाठीं तुझा हा दास आतुर झालेला आहे. आपली सारी हुशारी पणाला लाव. असं मिठास भाषण करशील कीं नकार देणं तिच्या जिवावर यावं! काय?"

फेरीवाली म्हणाली, "तें माझ्याकडे लागलं. मी सारं संधान अगदीं नीट जुळवून देतें."

"जा–जा लवकर!" अधीरपणं बुसिओलू म्हणाला. "मी इथं तुझी चातकासारखी वाट पहातोंय."

टोपली डोक्यावर घेऊन फेरीवाली कामगिरीवर निघाली.

ती त्या तरुणीच्या घराजवळ गेली तेव्हां ती दारांतच हवा खात बसली

होती. ती अगदीं विनम्र आवाजांत त्या तरुणीला म्हणाली, "बाईसाहेब, घेतां का कांहीं? बघा-वाटेल तो माल पसंत करा."

हें बोलतांना तिनें भरतकाम, जाळीकाम, पिशव्या, आरसे वगैरे सुंदर सुंदर वस्तू टोपलींतून काढून पुढं मांडल्या होत्या. वस्तूंपैकीं एक सुंदर पिशवी त्या तरुणीच्या नजरेंत भरली होती. त्या वस्ताद फेरीवालीनं तें हेरलं. ती धोरणीपणानं म्हणाली, "बाईसाहेब! किमतीबद्दल विचार करूं नका. वाटेल ती वस्तू घ्या. या वस्तूंची किंमत मला मिळालेली आहे."

तरुणीला आश्चर्य वाटलं. पण फेरीवाली चढेलपणानं बोलत नसल्यामुळं न भडकतां ती म्हणाली, "बाई माझे! तूं काय बोलतेस, त्याचा अर्थ तरी तुला कळतो का?"

जरा दुखावल्यासारखं करून ती म्हातारी म्हणाली, "हें पहा बाईसाहेब! माझ्याच तोंडून वदवायचं असलं तर वदवा बापडं! इथं बुसिओलू म्हणून एक तरुण राहतो, त्यानं मला तुमच्याकडे पाठवलं. त्याचं तुमच्यावर मनापासून प्रेम आहे. या वस्तूचशा काय, तुम्हीं मागाल ती वस्तू तो तुम्हांला देईल. पण तुमच्याशीं त्याला बोलतां येत नाहीं, त्यामुळं त्याची फारच कुचंबणा होते आहे. मला वाटतं तो तुमच्यासाठीं झुरतो आहे. तो जितका प्रेमळ तितकाच उमदा आणि रूपसुंदर आहे. मला त्याची फार दया आली. त्याचं आयुष्य बरबाद होऊं नये. असं नाहीं का तुम्हांला वाटत?"

हें ऐकतांच ती तरुणी भयंकर चवताळली. त्या फेरीवालीला आपादमस्तक न्याहाळीत ती ओरडली, "अग सटवे! माझ्या अब्रूचा प्रश्न आहे म्हणून. नाहींतर तुला चांगलाच धडा शिकवला असता. इथं सभ्य वस्तींत फेरीवालीचा धंदा करतेस. डोईवरचे केंससुद्धां पांढरे झाले तुझे. इतकी बनेल असशील असं वाटलं नव्हतं. असली पापी वाणी माझ्यासमोर उच्चारतांना तुझी जीभ झडली कशी नाहीं?"

संताप अनावर होऊन तिनं तिथली एक लोखंडी कांब उचलली. ती कडाडली, "निर्लज्ज थेरडी! आतां कधीं या बाजूला ये तर खरी, टाकतें तुझं पेकाट मोडून!" ती घाव घालायला म्हणून धांवून आली. तो बाटिकेचा अवतार पाहून म्हातारीची अगोदरच तारांबळ उडाली होती. ती टोपली डोक्यावर घेऊन जी सटकली, ती पुन्हा मागं वळूनहि न पाहतां थेट बुसिओलू उभा होता त्या ठिकाणीं आली. बुसिओलूनं अधीरपणं विचारलं, "काय म्हणाली ती?"

फेरीवाली म्हातारी थरथरत म्हणाली, "काय म्हणाली? म्हणाली माझं डोंबलं! उभ्या जन्मांत अशी कैदाशीण पाहिली नव्हती. पळालें नसतें तर कपाळमोक्षच झाला असता माझा. आपल्याला तुमचा पैसा नको नि कामगिरी पण नको. आणि माझ्या म्हातारीचं ऐकायचं असलं तर बाबा तूं कांहीं असल्या फंदांत पडूं नको. एक म्हणतां दुसरंच कांहीं तरी होऊन बसेल."

बिचारा बुसिओलू अगदीं खिन्न होऊन गेला. तावडतोब तो गुरुजींकडे वसतिगृहांत आला आणि त्यानं आपली दुःखद कहाणी निवेदन केली. गुरुजी म्हणाले, "बेटा! खट्टू होऊं नकोस! वृक्ष कांहीं एका घावासरशा तुटत नाहीं. तूं पूर्वीचाच धडा पुन्हा गिरव. जा पाहू पुन्हा येरझारा घाल. तिच्या नजरेला नजर भिडव. तीन संतापानी छटा दिसली तर मग पुढं काय करायचं तें मी सांगतों. घाबरूं नकोस. प्रयत्न कर. धीर नो गंभीर!"

तो पुन्हा येरझारा घालूं लागला. त्याला पाहतांच त्या सुंदरीनं आपल्या कामकरणीला बोलावलं आणि सूचना दिली,

"तो तरुण फिरतोय ना रस्त्यावर, त्याच्यामागून जा बघूं पटकन् आणि त्याला सांग कीं, संध्याकाळीं बाईसाहेबांनीं गप्पा मारायला बोलावलंय. जा—जा बघूं लवकर."

कामकरीण बुसिओलूजवळ आली नि म्हणाली, "साहेब! मी निओव्हाणा बाईसाहेबांची दासी—त्यांचं आपल्याशीं काम आहे. संध्याकाळीं त्यांनीं गप्पा मारायला बोलावलंय."

बुसिओलूला आश्चर्याचा आणि आनंदाचा धक्काच बसला. तो म्हणाला, "त्यांना सांग, मी जरूर येईन."







अनुक्रमणिका

तो तात्र्डतोब शिक्षक महाशयांकडे गेला. आणि आपली सर्व प्रगति त्यानं निवेदन केली.

त्याची हकीगत ऐकून शिक्षकमहाशय जरा गंभीर झालेले दिसले. त्यांना कांहीं तरी खटकलं. ते त्याला इतकंच म्हणाले, " मग जाणार तर तूं. "

" हो. कां जाऊं नको ? तपश्चर्या फळाला येते आहे ! "

" मग जाण्यापूर्वी मला इथं भेटून जा. नक्की–विसरूं नकोस. "

" हो. जरूर. "

संध्याकाळीं बुसिओलू त्यांना सांगायला गेला, " मी जातों तिकडे. "

" जा. पण वागतांना सावधगिरी ठेव. काळजी घे. "

" मी संपूर्ण काळजी घेतली आहे. प्रीतिशास्त्रांत सर्व संकटांना तोंड द्यावं लागतं ना ? मी जंबिये, सुरे बरोबर घेऊन ठेवलेत. वेळ आहे–वखत आहे ! "

तो गेला. लागलींच गुरुजीसुद्धां बाहेर पडले. ते आपल्या शिष्याच्या पावलावर पाऊल टाकीत चालले होते. चालतां चालतां शिष्य त्यांच्या घराच्या रस्त्याकडे वळला. आणि काय आश्चर्य ! तो त्यांच्या दारासमोर थांबला. दारावर ' टक्टक् ' असा आवाज झाला.

गुरुजींच्या मनांत आलं :–

आपली पत्नी कुलटा नि आपला शिष्यच तिचा जार ! काय हा दुष्ट योगायोग ! म्हणजे एकंदरींत माझा हा शिष्य माझ्याच जिवावर हे प्रेमशास्त्राचे धडे गिरवतो आहे......खासा न्याय......

इतक्यांत दार उघडलं. गुरुजींना संशय राहिला नाहीं. ते आपल्याशींच म्हणत होते, " वाटतो तितका भोळा नाहीं तो-तो सांगतो त्याहून किती तरी शिकला असेल ! "

लागलींच ते वसतिगृहाकडे गेले. जंबिया, तरवार त्यांनीं बरोबर घेतली. ' सूड सूड ' असे शब्द मनांत घोळवीत ते घराकडे आले.

त्यांनीं दारावर थाप मारली. बुसिओलु आणि ती तरुणी शेकोटीशीं बसून प्रेमालाप करीत होतीं. दारावरची थाप ऐकतांच तिनं तात्र्डतोब ओळखलं कीं, आपला पतीच आला असणार ! तिनं बुसिओलूला धरून उठवलं आणि आंतल्या दालनाच्या खिडकीखालीं इस्तरीच्या कपड्यांची रास पडलेली होती, तींत नेऊन दडवलं.

बाहेरून दारावर लाथा बसत होत्या नि आवाज येत होता, " दार उघड लवकर ! कुलांगार कारटे ! तुला चांगलेंच शासन करतों. "

बाईनं दरवाजाची कडी काढली. गुरुजींचा अवतार पाहून चमकलींच ती. त्यांनीं तरवार उपसली होती. ती एकदम उद्गारली, " नाथ–प्राणनाथ ! हें काय आरंभलंय आपण ? "

" काय आरंभलंय तें आपल्या कर्माला विचार. कुठं आहे तो तुझा जार ? "

" जार ? कुणाचा ? काय बोलतां तुम्हीं हें ? तुम्हांला झालंय तरी काय ? छे: ! कांहीतरी झालंय तुम्हांला. भुतानं झपाटलंय बहुतकरून. काय अभद्र बोलतांहांत तुम्ही ! जन्म गेला, कधीं वांकडं पाऊल पडलं नाहीं. माझ्या कुळांत असं कुणी निपजलं नाहीं. तुमच्यावर कुणीतरी करणी केलीय ! बाई ग बाई ! "

"जास्त बोलूं नको. मेणबत्ती आण. पाहातोंच कुठं आहे तो."

"पहा. खात्री होऊं द्या तुमची. कोणी आढळलं तर तत्क्षणीं माझीं खांडोळीं करा, पण असलं भलतंसलतं मी बोलूं नाहीं देणार!"

पत्नी मेणबत्ती घेऊन आल्यावर तळघरापासून तो वरच्या पिंजरीपर्यंत सर्व धुंडून झालं. पाट्यी, हारे, पेट्या, हडपें, पिंपें, जिथं जिथं लपण्या-सारखी जागा होती ती पाहून झाली. गाद्यांमधून इंचाइंचावर तलवार खुपसून झाली. कोंपरान् कोंपरा पाहून झाला. पण कोणीच आढळलं नाहीं. मेणबत्ती दाखवतां दाखवतां बाई गुरुजींना म्हणत होती, "काय बाई हें वेड तरी!—उगांच कुणी पीप काल्वलं हें संसारांत...तुम्हांला कुणीतरी नक्कीच झपाटलंय. मी सांगतें तुम्ही माळ घ्या आणि जप करा. मला तर बाई डोकंबिकं फिरण्याची भीति वाटते."

याचकांचे हे तळमळीचे उद्गार गुरुजींना पटले नसले तरी त्यांचा थोडा फार परिणाम झालाच. इतका शोध करून कोणीच सांपडलं नाहीं, तेव्हां आपल्याला कांहीं भूल पडली नाहीं ना, असा संशय गुरुजींना येऊं लागला. विमनस्क स्थितींत त्यांनीं पत्नीचा निरोप घेतला नि ते वसतिगृहाकडे निघून गेले.

गुरुजींच्या पत्नीनें दार बंद केलें. प्रियकराला कापड्यांच्या गठ्ठींतून बाहेर काढलें. फळें, दारू, उत्तम प्रकारचे खाद्यपदार्थ आणून दोघांनीं चंगळ केली. प्रेमक्रीडेंत सबंध रात्र घालविली. गुरुजी येऊन मध्यें जो प्रसंग घडला तो त्यांच्या खिजगणतींतच नव्हता.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बुसिओलु वसतिगृहांत गेला. गुरुजींना म्हणाला, "मोठी गंमत झाली काल. तुम्हीं ऐकलीत तर तुम्हांलासुद्धां हंसूं येईल."

"कसली गंमत?" गुरुजींनीं प्रश्न केला.

"ऐका." शिष्य म्हणाला. "काल रात्रीं त्या सुंदरीकडे मी गेलों नि लागलीच काय झालं असेल, असं तुम्हांला वाटतं?– तिचा नवरा आला होता आणि भलताच भडकला तो! त्यानं वर खालीं सारं घर धुंडाळलं. पण मी कांहीं सांपडलों नाहीं. मी अर्धवट सुकलेल्या कपड्यांच्या राशींत होतों दडलेला. मला त्याचे शब्द प्रत्यक्ष ऐकूं आले नाहींत, कारण ती रास आत होती आणि माझ्या अंगावर कपड्यांचा ढीग होता. पण तो अगदीं भयंकर चवताळला होता. पण त्या सुंदरीनं अशी वेळ मारून नेली म्हणतां! अखेर तो बिचारा निघून गेला. मग तिनं मला कपड्यांच्या राशींतून बाहेर काढलं! खूप मौज केली मग. अगदीं रंग आला होता. आयुष्यांत इतकी मजा मी कधीं केली नसेल. पण मी आतां जातों. माझे डोळे अजून चुरचुरताहेत. थोडी झोंप घेतों. आजसुद्धां येतों म्हणून सांगितलंय तिला. कालच्याच वेळीं जाणार आहे."

"बरं. नक्की जा." थरथरत गुरुजी म्हणाले. "पण निघतांना मला सांगून जा."

"हो हो, जरूर, गुरुजी! तुमचे आभार मानायला शब्द नाहींत माझ्या जवळ." असं म्हणत शिष्य निघून गेला.

त्या दिवशीं गुरुजींची मनःस्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. त्यांनीं विद्यार्थ्यांना कसलेच पाठ दिले नाहींत. त्यांना संध्याकाळ केव्हां येते आणि आपण सूड केव्हां उगवतों, असें होऊन गेलें.

संध्याकाळीं बुसिओलु अगदीं निश्चित मनानं गुरुजींकडे आला आणि म्हणाला, "मी निघालों तिकडे."

"बरं. जा." गुरुजींनीं उत्तर दिलं. "आणि उद्यां शक्य झालं तर इथे येऊन पुढं काय प्रगति झाली, तें मला सांग."

"हो. येईन." असं म्हणून तो त्या सुंदरीला भेटण्यासाठीं जेलदीनं निघाला. शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन गुरुजीसुद्धां शिष्यामागोमाग निघाले. त्यांनी चालण्याचा वेग खूपच वाढवला. कारण तो आंत शिरत असतांनाच दारांतच त्याला पकडायचा आणि त्याच्या पापाचं माप पदरांत घालून सूड उगवायचा, असा त्यांचा बेत होता. पण ती सुंदरी प्रियकराची वाट पहात आधींपासूनच खिडकींत उभी होती. प्रियकरामागून गुरूहि येताहेत, हें तिनं पाहिलं. तिनं दारावर पहिली थाप पडतांच दार उघडून पटकन् प्रियकराला आंत घेतलं आणि दार लावून टाकलं. तें गुरुजींच्या नाकावर धाडकन् आदळलं. बाहेरून दारावर धडक्या बसूं लागल्या. बाईनं दिव्याला निरोप दिला. मेणबत्ती मालवली. सर्वत्र काळोख झाला. बुसिओलुला हळूच दाराच्या फळीआड उभा केला. करांची कडी काढली. पति आंत पाऊल टाकतांच तिनं त्याच्या मानेला विळखा घातला. तिला दूर करण्याच्या यत्नांत तो दोनतीन पावलं आंत आला. तेवढ्यांत बुसिओलु दाराची फळी लोटून चोरपावलांनीं बाहेरच्या बाहेर पळून गेला.

ती एकदम गहजब करून ओरडूं लागली "धांवा हो धांवा! माझ्या यजमानांना वेड लागलंय. धांवा हो!" तो भयंकर संतापला होता. तिनं त्याला घट्ट धरून ठेवलं होतं. शेजारीपाजारी आरडाओरडा ऐकून तिथं गोळा झाले. कुणीतरी दिवा पुढं केला. आंतलं दृश्य पाहून सारेजण चकित झाले: हा शिक्षक इतका शांत, इतका विचारी आणि याच्या अंगावर हीं भयंकर शस्त्रें कशाला? आणि ही बाई अशी ओरडते आहे, हें काय आहे तरी काय? कोणी म्हणाले, "अहो! फार अभ्यासाचा परिणाम हा!" कोणी म्हणाले, "अहो अति तिथं माती! वेड लागलं बहुतकरून!"

"हें बघा गुरुजी! काय मांडलंय तुम्हीं हें? शांत व्हा." कोणीतरी मध्यें पडून म्हणाला, "सोडा तिला. आणि इथं खुर्चीवर बसून विश्रांति घ्या."

"विश्रांति? आतां उभ्या जन्मांत या तळमळत्या जिवाला विश्रांति नाहीं. ही कुलटा इथं वाटेल ते थेर करते आणि मी विश्रांति घेऊं?

अरे ! माझ्या डोळ्यादेखत हिचा जार इथं येतांना पाहिला !" गुरुजी कडाडले.

"अहो माझं नशीब फुटलं हो !" ती बाई ओक्साबोक्शीं रडत बोलूं लागली, "इथं तुम्हीं सारीं जमलां आहांत. कधीं माझी वावगी वागणूक कुणी पाहिली आहे का कुणी ? काय हें कुभांड रचलं यांनीं !"

सर्व लोकांनीं गुरुजींना समजवण्याचा प्रयत्न केला. त्यांची पत्नी चांगल्या वागणुकीची असल्याबद्दल सर्वांनीं निवाळा दिला. "इतकी सरळ बाई आमच्या तरी पाहण्यांत नाहीं" असा सर्वांचा अभिप्राय पडला.

"पण मी सांगतों ना" गुरुजी ओरडून म्हणाले "—मी माझ्या दोन डोळ्यांनीं तो घरांत शिरतांना पाहिला. अजून आंत दडलेला असेल तो."

दरम्यान् बाईचे दोघे भाऊ येऊन दाखल झाले होते. ते येतांच तिला अगदीं भडभडून आलं. ती रडत रडत म्हणाली, "बाबांनो ! कपाळ फुटलं माझं. नवरा वेडा झाला. त्यांना इथं कोणीतरी दडलंय असा संशय आहे. तुमची खात्री पटेल. कोणीहि माझ्या शब्दावर विश्वास ठेवील. पण हे ठेवायचे नाहींत. माझा जीवच घेत होते आतां."

दोघे बंधु पुढं सरसावले आणि सभ्य स्वगत शिक्षकमहाशयांना म्हणाले, "तुमच्या या वर्तनानं तुम्हीं आम्हांला आश्चर्याचा धक्काच दिलात. आमच्या बहिणीला तुम्ही कुलटा ठरवलीत ! आतां आणखी काय शिल्लक राहिलं ? इतकीं वर्षं सुखानं संसार केलात आणि आतां तिच्यावर भलभलते आरोप करतांना तुम्हीं विचार करायला हवा होता. ही अगदीं कमाल झाली !"

"हें पहा" शिक्षकमहाशय म्हणाले "मी त्याला पाहिलंय. ह्या घरांत तो मनुष्य दडलेला आहे."

"असं ?" दोघे बंधु संतापानं म्हणाले, "मग चला. सारं घर धुंडूं या. फडशाच पाडूं या गोष्टीचा. दाखवा माणूस म्हणजे तुम्हीं सांगाल ती शिक्षा आम्हीं आमच्या बहिणीला देऊं."

त्या दोघा बंधूंपैकीं एकानं बहिणीला बाजूस घेऊन हलकेच विचारलं, "काय ग ? खरंच कुणी आहे का ? अगदीं खरं खरं सांग."

"म्हणजे ?" ती अगदीं काकुळतीनं म्हणाली. "धरणी दुभंगून मला पोटांत घेऊं दे, मी खोटं बोलत असलें तर ! मी आपल्या कुलाला असा कलंक लावीन का ? तूं सुद्धा असा संशय घेतोस, म्हणजे कमाल झाली."

हें ऐकून भावाचं समाधान झालं. शिक्षकमहाशयांनीं सांगितल्याप्रमाणें सर्वत्र शोध सुरू झाला. त्यांनीं तडक सर्वांना खिडकीखालीं टाकलेल्या कपड्यांच्या राशीकडे नेलें. तिथें रेशमी कपड्यांची रास पडलेली होती. आपल्या हातांतल्या तरवारीनं ती रास त्यांनीं कितीदांतरी भोसकली. हें करतांना आपण बुसिओल्याच भोसकतों आहोंत, अशी त्यांची खात्री होती. प्रत्येक वेळीं ते त्याला नाना प्रकारचे शिव्याशाप देत होते.

"बघा आतां. मी म्हटलं नाहीं ?" बाई सांगत होती. "त्यांचं डोकं बिघडलंय. आपल्याच वस्तूंची किंमत नाहीं त्यांना. सोन्यासारखीं वस्त्रं फाडून टाकलीं त्यांनीं."

सगळीकडे शोध केला पण व्यर्थ ! शेवटीं एक भाऊ म्हणाला, "डोकं ठिकाणावर नाहीं यांचं." जमलेल्या सर्वांनीं त्याला दुजोरा दिला. नंतर तो गुरुजींकडे वळून त्यांना म्हणाला, "धिक्कार असो तुम्हांला ! फार झालं हें ! धुतल्या तांदळासारखं शील असणाऱ्या माझ्या बहिणीवर

कसला नीच आरोप केलात तुम्हीं. डोकं फिरलंय म्हणून, नाहींतर तुम्हांला......"

हें ऐकत असतांना शिक्षकाच्या संतापाचा पारा भलताच चढला. त्यानीं रुद्रावतार धारण केला आणि तरवार उपसली. लोकहि सावध होते. त्यांनीं काठया सरसावल्या. पण गुरुजी ऐकेनात; त्यांनीं तुफान मांडलं. तेव्हां कटु कर्तव्य म्हणून लोकांनीं त्यांच्या पाठींत काठीचे रट्टे घालून त्यांना खालीं पाडलं. लोक म्हणाले, "अहो ! अति अभ्यासाचा परिणाम हा !"

सारं घर आपल्या ताब्यांत घेऊन दोघे बंधु त्या रात्रीं तिथंच राहिले. दुसऱ्या दिवशीं नामांकित भिषक्वर्यांना बोलावण्यांत आलं. त्यांनीं सांगितलं, "रोग्याची खाट शेगडीजवळ ठेवा. त्याच्याशीं कोणी चकार शब्द बोलायचा नाहीं. बरा होईपर्यंत मी सांगेन त्याप्रमाणं पथ्यावर ठेवायचं." भिषक्वर्यांच्या सूचना लगोलग अंमलांत आल्या.

शिक्षकांविषयीं सर्वांनाच आदर होता. त्यांना वेड लागल्याची वार्ता बोलेना शहरांत पसरतांच सर्वांना हळहळ वाटली. त्यांचे सहकारी म्हणत होते, "फारच वाईट झालं. काल ते जरा चमत्कारिक वागले. कोणाशीं बोलले नाहींत. पाहिलंत का तुम्ही ? काय बिनसलं होतं, कोण जाणे !"

"हो हो. काल वाटलं खरं तसं. बिचारे !"

— गुरुजी वेडे झाले ही गोष्ट ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली. विद्यार्थ्यांनीं आपल्या गुरुजींना पाहायला जायचं ठरवलं. बुसिओलु गुरुजींना रात्रीचा अहवाल सादर करण्यासाठीं गेला तेव्हां कळलं कीं गुरुजी वेडे झाले. त्याला फार वाईट वाटलं. इतर विद्यार्थ्यांबरोबर आपणहि गुरुजींच्या समाचाराला जायचं, असं त्यानं ठरवलं.

विद्यार्थी बरेच होते. ग्रामस्थ विद्यार्थ्यांपैकीं एकजण त्यांना रस्ता दाखवीत होता. त्या रस्त्यावर आणि घराशीं येतांच बुसिओलूच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला ! डोळ्यासमोर काजवे चमकूं लागले. पण आपण विचित्र वागूं लागलों तर इतरांना संशय येईल, असा विचार करून तो बाकीच्या विद्यार्थ्यांमागून जाऊं लागला. गुरुजींना खाटेला बांधून ठेवलं होतं, जखमांवर पट्ट्या लावल्यामुळं ते अगदीं केविलवाणे दिसत होते. विद्यार्थी क्रमाक्रमानं पुढं सरकून गुरुजींना पाहात होते आणि आपली हळहळ व्यक्त करीत होते. नंतर बुसिओलूची पाळी आली. तो गुरुजींना उद्देशून म्हणाला, "प्रिय गुरुजी, तुम्हीं मला पित्याच्या ठिकाणीं आहांत. मला तुम्हीं वाटेल तें सांगा. तुमच्यासाठीं मी सांगाल तें करीन."

त्यावर बिचारे गुरुजी म्हणाले, "वत्सा ! तूं आज्ञाधारक तर खराच. पण आतां करण्यासारखं कांहीं राहिलं नाहीं. तूं पुष्कळच प्रगति केलीस—माझ्या जिवावर खरोखरच तूं कल्पनेबाहेर प्रगति केलीस — पुष्कळच शिकलास."

गुरुपत्नी जवळ आली आणि म्हणाली, "पाहिलंत, काय बरळूं लागतात तें. पण तुम्हीं मनावर घेऊं नका. डोकं ठिकाणावर नाहीं त्यांचं."

पण बुसिओलूनं मात्र गुरुजींचं म्हणणं मनावर घेतलं नि निघायचं ठरवलं. तो पिएत्रु पावलूच्या खोलीवर गेला. त्याचा निरोप घेतांना म्हणाला, "अच्छा. मीं जातों. हें बघ, दुसऱ्याच्या जिवावर मी इतकं शिकलोंय कीं आतां इथं राहायची गरज नाहीं. मी आतां घरीं जातों."

त्यानं जलदीनं सामानसुमान भरलं आणि रोमचा रस्ता सुधारला.

*[अनुवादित]*

• • •

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अहा देश कसा छान
माझं हरपलं भान
कसा पिकला गहुंग हरभरा

# महाराष्ट्र देश सुंदरा




महाराष्ट्र ही काय चीज आहे?–आधीं महाराष्ट्र नांवाची चीज खरोखरच आहे का? कीं नकाशाच्या सोयीसाठीं आणि इतिहासाच्या सुवतीखातर भारताच्या मध्यावर ऐसपैस पसरलेल्या त्या भूमिभागावर ती चिठ्ठी डकवायची? त्या भागांतील लोक असे कीं त्यांच्यांत अडीचशे जाती आहेत, काळेगोरेपणाच्या मजेच्या छटा आहेत, नाका नेंडाचीं हरतऱ्हेचीं शिल्पें आहेत. देहाचे वेगवेगळे थाट आहेत; आणि बोलण्याच्याहि इतक्या परी आहेत कीं एकाला दुसऱ्याचें बोलणं परकें वाटावें; त्याचा अर्थ हे समजूं नये. असे हे लोक भंगलेले. एकदिलानें वागायला आणि एकसुरानें बोलायला त्यांच्याच आडकाठ्या आहेत.



अनुक्रमणिका

समाजशास्त्री, मानववंशशास्त्री, भूस्तरशास्त्री आणि तुमनेच शास्त्री यांनीं या मराठी कूटाचा खल केला आहे. यी शास्त्रांच्या झटापटींत विशाल मनांचा प्रत्यय आहे, तसा दुराग्रह आणि स्वार्थ यांचाहि नाच आहे. कोणाला आपली मिरासदारी टिकवायची आहे; आपल्या कुलंगा कोटाकिल्ला सांवळा टेवण्यासाठीं लढवायचा आहे. महाराष्ट्राला इतिहास आहे हें त्याचें भाग्य आणि दुर्भाग्य. या इतिहासाची किंमत महाराष्ट्राच्या भूगोलाला द्यावी लागली असा थेंका राजकरणाच्या बाजारांत उभा राहिला आहे. त्याला मुकाबला देण्यासाठीं जें एकरंगी लोकबळ हवें तें मोडकळीस आलेले आणि त्यांनीं पोखरलेले बुरमट वांच पाडूनच मिळेल. इतिहासाचा नाटकी टेकू देऊन त्याची रेंगा अमरांना लांबविण्याची क्लृप्तीहि अहिताची. महाराष्ट्राचा इतिहास हा बंडांचा इतिहास आहे. मराठी साहित्य ज्ञानदेवाच्या बंडांतून निघालें; मराठी राज्य शिवाजींच्या बंडांतून निपजलें. आजवर मराठी पाऊल पुढें पडलें तें असल्या निर्भय कर्तबगारीनेंच; खासगी नफ्यातोट्याच्या तडजोडी हिशोबानें नव्हे.

महाराष्ट्राला सह्याद्रीचा कणा आहे; माथ्याशीं सातपुडा आहे. निसर्गाचे सगळे ढंग त्यांत आहेत. सागराची फेंसाळ किनार ल्यालेली कोंकणपट्टी आहे; सह्याद्रीच्या अजस्त्र घाटांत गोदा–कृष्णेचें खोरें आहे; उत्तरेला तापी–पूर्णेचें आणि वर्धा–वैनगंगेचें अरुंद खोरीं आहेत लाल–काळ्या मातीचे खेळ आहेत; बोलके डोंगर, पूर्वेकडचे बरड माळ आणि डांग कारवारचीं निबिड अरण्यें आहेत. दुस्तर गड आणि सुंदर लेणीं आहेत. "राकट देशा, कणखर देशा, दगडाच्या देशा, नाजूक देशा, कोमल देशा, फुलांच्याहि देशा" अशी गोविंदाग्रज यांची आरती गायले. माणसेंहि तशींच आहेत–राकटहि आणि कोवळीहि. तीं वरीं वाईट आहेत. त्यांना हिंदी संस्कृतीचा वारसा आहे; तिलाहि त्यांनीं आपली छाप दिली आणि चैतन्य. पण त्यांच्या जीवनाची वेगळी घडण आहे. त्यांचे जुने जिव्हाळे आहेत तसे नवे उमाळे आहेत. हा मराठा जुना आहे तसा नवाहि आहे.... हा असा आहे....



# मुंबई ग नगरी, नगरी बडी बांका जशी रावणाची दुसरी लंका वाजतो ग डंका

मं. वि. राजाध्यक्ष

या मुंबईइतकी कीर्ति आणि दुष्कीर्ति फार थोड्या शहरांच्या नशिबीं आली असेल. कोणीहि उठावें आणि तिच्याबद्दल वांकडें बोलावें; पण जो तो तिच्यासाठीं हपापलेला! दूरच्या भावड्यांना मुंबईचीं खरीं-खोटीं वर्णनें ऐकून-वाचून आणि तिच्या निवडक स्थळांचीं चित्रें पाहून ती स्वर्गाची संक्षिप्त आवृत्ति-पण अधिक मसालेदार–असल्याचा साक्षात्कार होतो, व 'याचि देहीं याचि डोळां' ती 'पहावी' अशी तळमळ लागते. बाहेरगांवांहून मुंबईत येणाऱ्या आगगाड्यांच्या खिडक्यांशीं जे विस्फारलेले डोळे आणि उघडीं तोंडें दिसतात ते पाहून मला मुंबईकराला धन्य वाटलें. या स्वर्गाचा मी भाडेकरी. पण मुंबईला नरकाची उपमा देणारा नीतिबाज भेटला कीं, नाहीं म्हटलें तरी जरा खांदे पडतातच.

–तसें पाहिलें तर ही मुंबई म्हणजे पश्चिम हिंदुस्थानच्या कुशींतलें एक हाडकुळें बेट, पण त्याचें नशीब असें फळफळलें कीं अखख्या हिंदुस्थानची नाडी तेथें हातीं लागावी. –कोणी मागून येऊन तिखट झाली म्हणूनहि मुंबईनें कांहीं खोडाचा दुस्वास ओढवून घेतला. तिची आधुनिकता म्हणजे परंपरेचा अभाव; तिचा ताजेपणा म्हणजे पुराणपणाचा स्फूर्तिदायक आणि कुबट वास तिला नाहीं–असा त्यांचा खानदानी हिशेब. मुंबईला कधीं वाळवी लागलीच नाहीं–अशी तिची सदैव हालचाल होत राहिली!

येथें तीस लाख लोक. सगळे प्रमुख धर्म त्यांत आले–शाखाउपशाखांसह. भाषा म्हणे सदुसष्ट; त्यांतल्या कांहीं नवलाच्या म्हणून सोडून दिल्या तरी वीसएक भाषा अशा आहेत कीं ज्या बोलणारांची संख्या भरपूर. इतकें वैचित्र्य मुंबईंत आहे म्हणून तिला 'बकाली' असें कोणी हिणवतात; "अठरा पगड" जाती म्हणून नाक मुरडतात. आपलीच जात–किंवा पोटजात–श्रेष्ठ, तिला दुसऱ्याचा विटाळ नको, अशी या नाकांची ऐट. पुरें गांव नाहीं तरी निदान वस्ती अलग हवी. मुंबईतल्या 'खिचडी'त तें कसें जमणार? तसे या खिचडींतहि न मिळणारे खडे आणि गुठळ्या आहेत म्हणा!

मुंबईची गुलहौशीपणाबद्दलहि बरीवाईट ख्याति चालत आली आहे. ती फॅशन्सची गंगोत्री. मुंबईला आजचा ढंग वर्षा दोन वर्षांत इतर गांवीं पसरतो—किंवा पसरत असे असें म्हणावें; कारण आतां आपले चित्रपट हे साजशृंगाराचीं चालतीं बोलतीं विद्यापीठें झाले आहेत. त्याच्या पराक्रमानें चोळीची नवी आखुडाई अथवा बुशकोटाची ताजी ढिलाई मुंबईच्या डोळ्यांत भरते त्याच 'आठवड्यां'त कोल्हापूरच्या आणि बारामतीच्या हौसेलाहि बेचैन करते. वाग फक्त शिंप्याची. त्याशिवाय चित्रपटांच्या जाहिराती, आणि जाहिरातबाजी नियतकालिकें आहेतच. त्यांच्यावरून वेततां येतें. अर्थात् मुंबईची चैनबाजी–शान केवळ कपड्यांपुरती नाहीं; त्यांत अनेक तऱ्हेची चैनबाजी येते. म्हणून 'जिवाची मुंबई' करण्याचा परस्थाला इतका सोस लागतो. ही महानगरी, मोहमयी, मस्तवाल नगरी, तिच्या नादीं लागों नये असा पवित्र इशारा अनेकांनीं

अनुक्रमणिका

दिला. सुंदर खेड्यांतील निष्पाप माणूस मुंबईला येतांच कसा बिघडतो—या सोज्वळ बोधकथेचा व्यापार कित्येकांनीं केला आहे—पडद्यावर विशेष, कारण अंधारांत असले बोध विशेष ठसतात! हें बिघडवण्याचें कंत्राट मुंबईनें फार वर्षे सांभाळलें.

—पण मुंबई जरा हाताची सैल्च! छान-छोकी, टापटीप, थाटमाट तिच्या रक्तांत आहेत अर्थात् हे पैशाचे खेळ आहेत. पण पैसे गमवून कंगाल कळा आणण्याचें सुतकी कसब कांहीं टिकाणीं दिसतें तें तिच्यांत नाहीं. मुंबईत दररोज दिवाळी असा तिचा सनातन लौकिक; मग विशेष उत्सवानिमित्त झडणारी रोषणाई पाहाण्यासाठीं लोटणारी गर्दीहि पाहाण्यासारखी होते. खऱ्या मुंबईकराच्या जीवाला गर्दीशिवाय करमत नाहीं; पण शांतपणा प्रकृतीला हितावह या तात्त्विक पाठांतराची बूज राखण्यासाठीं तो सुटीच्या दिवशीं नेहमींची वहिवाटी गर्दी टाळून चौपाटीच्या अथवा जुहूच्या गर्दीच्या भोंवऱ्यांत भ्रमत राहातो. पाऊणशें शंभर वर्षांपूर्वीच्या 'मुंबई वर्णनांत'हि "अबब, काय हो गर्दी!" असे चमत्काराचे उद्गार आहेत. आतां लोकसंख्या कांहीं पटींनीं वाढली, वाहनें तर बेसुमार वाढलीं—तरी उद्गार तेच आहेत. तेंच इमारती, रस्ते, दुकानें इत्यादि वैभवाविषयीं. अर्थात् हे उद्गार तुलनेचे. रिप् व्हॅन विंकलप्रमाणें तेव्हां झोंपी गेलेला आज जागा झाला तर या विश्वरूपदर्शनाच्या धक्क्यानें तो कायमचा झोंपी जायचा!

मुंबईचें हें वैभव जरी गेल्या शेंदोनशें वर्षांतील असलें तरी ती कांहीं अगदींच कालची नाहीं. तिलाहि इतिहास आहे—कांहीं शतकांचा. तोही असा आहे कीं मागें जातां जातां पुसट होत गेला तरी निदान राजवटींची नांवनिशाणी ओळखतां येते. त्यामागील असा कीं पुराणें, काव्यें आणि व्युत्पत्तिशास्त्र यांचें पिठलें. देवदेवतांचा वास दिला कीं तें रुचकर होतें. धार्मिकांच्या मतें मुंबई धर्मलंड असली, तरी श्रीरामचंद्र मलबार हिलवर सीतामाईच्या शोधार्थ (दक्षिणेकडे जातांना) गेल्याची सुरस कथा ती अभिमानानें सांगेल; आणि वाळकेश्वर रामानें स्थापिलें व बाणगंगा ही त्याच्या बाणाची करामत हा पुरावा दाखवील. बोंबिल हा मत्स्य-विशेष खास मुंबईचा (कोणी मुंबई शब्दाची व्युत्पत्ती त्याच्यापर्यंत पोचवली आहे!) त्याच्या सुक्या रूपांतील उग्र गंध शाकाहाऱ्यांत अन्नद्वेषाची बाधा आणतो तर मच्छ्या मत्स्याहाऱ्याची क्षुधा प्रज्वलित करतो. ताज्या अवस्थेंतील त्याचा बिळबिळीतपणा मात्र कित्येक मत्स्याहाऱ्यांनाहि नकोसा वाटतो. त्याला जबाबदार श्रीरामप्रभूच कथा अशी आहे कीं लंकेचा सेतु बांधण्यासाठीं सर्व माशांनीं मदत केली; फक्त बोंबील अंगचुकार निघाला. तेव्हां क्रोध येऊन रामानें त्याला हातांत धरून चुरडलें आणि भिरकावून दिलें तो पडला मुंबईजवळ! अशा मुंबईच्या बोंबलाला श्रीरामाचा हात (आणि वास) लागला आहे! पांडवांचे (व्हा) पाय मुंबईच्या उपनगरांना लागले असावेत अशा अंदाजाला जागा आहे. प्रिन्सेस् डॉकच्या खालीं जंगल पुरलें असल्याचा सुगावा साठ वर्षांपूर्वीच लागला. धरणीकंपानीं मुंबईला जन्म आणि तिची घडण दिली. म्हणून ज्यां उद्योगी संशोधक तिचा क्रमवार इतिहास खणून काढतील हें कोणी सांगावें? सर्वगामी श्रीकृष्णाची एखादी लीला येथें घडली असेलहि!

आतां थोडा इतिहास. फार प्राचीन काळीं खुद्द मुंबई हिशेबांत नव्हती तरी तिचा शेजार मोठा मातबर होता. सोपारा, चौल, (घारा) पुरी, कल्याण इत्यादिकांचें नांव देशोदेशीं दुमदुमत होतें. हा सगळा अपरान्त प्रदेश. सम्राट अशोकाच्या आधिपत्याखालीं तो होता. या मौर्यघराण्याखेरीज शातवाहन, राष्ट्रकूट, चालुक्य, शिलाहार या घराण्यांनीं त्यावर कमीअधिक काळ



सत्ता गाजविली. तेराव्या शतकांत देवगिरीचे यादव येथें अवतरले. त्या कुळांतील बिंबराजानें १२९४साली माहीमला गादी स्थापली. ही खुद्द मुंबईच्या इतिहासाची निश्चित सुरवात. पाठारे प्रभू, पांचकळशी, भंडारी आणि पळशे ब्राह्मण या बिंबराजाच्या लवाजम्यांत—पैठणहून—आले म्हणतात. तोंपर्यंत मुंबईतील मुख्य वस्ती कोळ्यांची असे. "मुंबई" शब्दाच्या मूळ विषयीं संशोधकांत नेहमींप्रमाणें अनेक मतें आहेत. त्यांपैकीं एक मुंबा नामे कोळ्यांत तें मूळ पाहातें. (मुंबादेवीला फक्त अनुस्वार गहाळ झाला आहे!). असो. शतकभरानें मुसलमानी अंमल आला. आगली दोन शतकांनीं—१५३४ मध्यें पोर्तुगीजांनीं येथें पाय रोवला. ते या देशांत आले "मसाले आणि मंदिरें" (म्हणजे ख्रिश्चन कळपाची भरती) यांच्या शोधार्थ. पैकीं व्यापार त्यांना जमला नाहीं. पण जबरदस्तीनें त्यांनीं कळप मात्र फुगवला. साष्टींत तर उच्छाद मांडला





–विशेषतः जेझुइट पाद्र्यांनीं. १६६१ मध्यें पोर्तुगालच्या राजकन्येचें इंग्लंडच्या राजाशीं लगीन झालें तेव्हां आंदण म्हणून नवऱ्याला मुंबई मिळाली. पण वधूपक्षानें कुरबूर करून ती (म्हणजे मुंबई), नीट हातीं द्यायला चार वर्षें घेतलीं. मात्र हा पांढरा हत्ती पोसण्यांत अर्थ नाहीं हें जाणून तीन वर्षांत ईस्ट इंडिया कंपनीकडे राजानें ती लावून दिली. वर्षाला १० पौंड (म्हणजे दीडशें रुपये) या भाड्यानें! पुढें कंपनीनें ठाणें–सुरतेहून मुंबईला हालविलें. या इंग्रजांच्या मराठे आणि शिद्दि यांच्याशीं खटखटी झाल्या; पण ते कातडी बचावून राहिले. वेळ पाहून त्यांनीं नखें बाहेर काढलीं...पुढचा इतिहास पोराबाळांनाहि माहीत आहे.

मुंबईचा जुना भूगोल या इतिहासापेक्षांहि मनोरंजक आहे. इतके विलक्षण फरक अन्यत्र क्वचितच पडले असतील. मूळचीं सात बेटें; त्यांतील मधलें मुंबई. या बेटांमधून खाड्या होत्या. परळाहून 'मुंबईला' होडीनें जायचें; उतरल्यावर "पायधुणी;" असे स्थळनांवांचे अर्थ उलगडतात. धोबीतलावावर खरोखरच मुंबईचीं धुणीं होत. (त्याशिवाय तेथें फांशी



देणें व शिक्षेचे अन्य प्रकार लोकरंजनासाठीं उघड्यावर करीत). खाजणानें दुर्गंधी सुटे; रोगराई फार. साहेब टिकेना. गांवाला मुडदेघरं म्हणूं लागला. तेव्हां सुधारणेच्या मसलती होऊन, हळू हळू सात बेटांचें एकीकरण झालें. प्रथम वरळीला बांध घालून समुद्र रोखला. मग भरणी घातली. गांव अंगानें भरलें. साष्टी घट्ट करणें ओघानेंच आलें. १८०३ मध्यें शींव–कुर्ला आणि १८४५ मध्यें माहीम-वांद्रा हे रस्ते होऊन मुंबई-साष्टीचा पायीं व्यवहार सुरू झाला. मुंबइबेटांच्या दक्षिण भागांत खरोखरीचा 'कोट' होता आणि भोंवती खंदक. त्याला तीन दरवाजे होते आणि तेथें सक्त पहारा असे. १७१६ मध्यें पुरा झालेला हा कोट १८६२–६४ मध्यें पाडून टाकला. कोट गेला, फक्त त्याचें नांव–आणि चर्च गेट सारखें एखादें–अशीं भोकें राहिलीं आहेत. बॅकबेची भरणी पंचवीस–तीस वर्षांमागची. तिचें राजकारण गाजलें. मुंबईची भूक वाढतच होती. पांच वर्षांपूर्वी साष्टींतील मोठा लचका-जोगेश्वरी-ते-भांडूप–पचवून ती महामुंबई झाली; साष्टीचा उरलेला भागहि-वसईच्या खाडी-पर्यंतचा–तिच्यात सामील करावा अशी योजना आहे. गेल्या महायुद्धानें बहुतेक शहरांना सूज आणली, तशी मुंबईलाहि आणली. ती नंतर उतरेल असें वाटलें होतें पण तसें झालें नाहीं. पण मुंबईला खरी सूज चढली ती १८६४ च्या सुमारास. अमेरिकेंतील यादवीयुद्धामुळें इंग्लंडच्या बाजारांत हिंदी कापसाला तेजी आली. आणि मुंबईचें सोनें झालें. १८६९ मध्यें सुएज कालवा सुरू झाल्यावर मुंबई आणखी भरभराटली. पैसा वाढला, माणसें वाढलीं–म्हणून शहरहि पाय पसरूं लागलें. तें अजून पसरत आहे.

अशी ही सदा उफाड्याची नगरी. तिच्या अंगांचें जुजवी वर्णन करायचें म्हटलें तरी ग्रंथ होईल. सुरसपणांत त्याच्या तोडीला टिकणारी कादंबरी मिळावयाची नाहीं. ही मुंबई आपल्या कादंबऱ्यांत वारंवार येते, पण शोभा म्हणून–प्रेमाची अथवा बोधाची अथवा राजकारणाची शोभा वाढवायला. पूर्वी बाहेरगांवीं (कथेंतसुद्धां) प्रेम करणें अवघड जाई; मुंबईत तें सहज खपे. असा तिचा बदलौकिक. खरी मुंबई क्वचितच रंगविली गेली आहे. खेड्यांबद्दलच्या खोट्या कादंबऱ्या, तशाच मुंबईबद्दलच्या...

...पण तशी मुंबई एकरूपी' एकरंगी नाहीं. मलबार-हिल–मरीनड्राइव्हचें मिजासी ऐश्वर्य आणि परळ-कामाठीपुरा-धारावीचें भयाण दारिद्र्य या दोन टोंकांचा काय संबंध आहे? (अर्थात् कार्यकारणभावाचा सोडून!)...मध्यें गिरगांव-दादर-उपनगरें यांचें मिजासी दारिद्र्य आहे. त्यांत अनेक इयत्ता आहेत; थराला थर लागला आहे. पण तो 'लागला' आहे–दाटी-वाटीमुळेंच नव्हे तर मुंबईच्या प्रकृतीमुळेंहि. जुन्यानव्या दिल्लीसारखी येथें गरिबीश्रीमंतीची आणि जुन्यानव्याची फटकून वाटणी नाहीं. ताज-महाल हॉटेलच्या फूटपाथवर लोक झोंपतात; खोपटीं पलीकडे सारून बादशाही इमला उभा राहतो–विशेषतः उपनगरांत. हा सरमिसळपणा कीं नुसतीच गुंतागुंत? कोणाला त्यात



अनुक्रमणिका

अभिमान वाटतो, कोणाला धोका! मुंबईची सर्वधर्मपरिषद झाली आहे; गुण्यागोविंदानें लोक एकत्र काम करतात, पण, जमल्यास, अलग अलग राहतात. पारशी मूठभर तेव्हां ते 'कॉलनी' करून राहतात; पण 'हिंदु कॉलनी' हि आहे—आणि जातीपोटजातींच्या 'हाउसिंग सोसायट्या' आहेत! आपापल्या 'संस्कृती'चें डबकें, निर्धारानें राखीत आहेत. मुसल्मानांचे मोहोल्ले मध्य-मुंबईत आहेत. हिंदुमुसलमानांच्या दंग्यांत त्यामुळें रणभूमि सोयीस्करपणें आंखतां येई. तसे इतरत्र मुसलमान खूप आहेत; माहीम-वांद्याला त्यांची केवढी वस्ती आहे. पण दंग्यांत ते निर्धर्मी बनून तिऱ्हाईतपणें बातम्या वाचीत. खाटीकखाना वांद्याला पण कापाकापी भेंडीबाजारांत!



हे दंगेहि तेवढ्यापुरते. संपले कीं चार दिवसांत सगळें सुरळीत. पुन्हा गिरगांवचा हौशी ब्राह्मण भेंडीबाजारांतल्या मुसल्मानी हॉटेलांत मुर्गी खायला हजर! १८७४ त मुसल्मान—पारशांचा दंगा झाला होता म्हणे, आणि १९२१ त पारशी विरुद्ध हिंदुमुसलमान असा सामना झाला. पण हे अपवाद. 'सरकारमान्य' प्रतिस्पर्धी म्हणजे हिंदु आणि मुसलमान! गेले ते दिवस! मुसलमानांतहि शाखा आहेतच. मुंबईच्या 'चहाबाजी'चा जनक आणि आधार जो इराणी तो 'न हिंदुर्नयवनः' असा त्रिशंकुवत्. दंग्यांत कधीं त्याच्या यावनी वासामुळें तापून हिंदु त्याचे कप फोडत—पण त्याचा चहाचें बंत्र फोडण्याइतकी त्यांना उकळी येत नसे. मुसल्मान एकंदरीनें नोकरी—व्यवसायांपेक्षां धंद्यांत अधिक. आर्जवी चलाखपणामुळें धंद्यांतील त्यांची बरकत हटलेली नाहीं.

पारशी हे खास मुंबईचें पीक. मोठी मजेची जात. 'मजा' हा त्यांचा आवडता शब्द—त्याचा अर्थ फार व्यापक. खाण्यापिण्याचे शौकी, हौशी, मनमोकळे. एके काळीं मुंबईच्या शाळा कॉलेजांतून दंगामस्तीचा मान त्यांचा असे. आतां ते मवाळ झाले. बाहेर फार साहेबाळलेले, पण कुळाचारांत कर्मठ. संजाण ते नवसारी या गुजरातच्या पावलांत त्यांची धर्मभूमि—आणि सर्वस्व. मुळें तेथें. मुंबईत त्यांनीं अमाप पैसा कमावला—आणि मुंबईला त्यांनीं अमाप पैसा दिला. धर्मादायांत जातधर्म पाहिला नाहीं. आपल्यांतली गरिबी दुसऱ्यांना दिसूं नये म्हणून झांकली; मदत देऊन सांवरली. तसे यांचे सगळ्यांशीं संबंध खेळीमेळीचे. पूर्वीं क्रिकेटच्या चौरंगी सामन्यापुरती मैदानावर हिंदु-पारशी वैमनस्याची वार्षिक आवृत्ति निघे. विशेषतः हिंदु म्हणजे 'दक्षणी' "ताल्या"—पारशी हा "बावा". तंबूतंबूंत रणघोष उठत, जातीचीं वर्मे निघत. पण सगळें तोंडीं, कधीं हातघाईवर मामला आला नाहीं—असें 'लुटुपुटीचें' ठरे! या इवल्याशा समाजाचें पुढें काय होणार?

मुंबईकराला ख्रिश्चन म्हणजे सर्व ख्रिस्तधर्मी नव्हेत. गोरे तर नव्हेतच. ते सरसकट 'युरोपियन'. फक्त गोवेकर 'किरिस्तांव'. साष्टींतहि 'किरिस्तांव' आहेत—पण त्यांची भाषा (गोमंतक) कोंकणी नव्हे. थोडेसे नोकरीपेशांतले लोक सोडले, तर ते शेतकरी-बागाईतदार. 'गोंयकार' अनेक व्यवसायांत सांपडतात—मुख्यतः शिंपी, संगीत-वादक आणि मोठमोठ्या हॉटेलांतून वेटर. टॅक्सी-ड्रायव्हरच्या धंद्यांत त्यांचा मोठा भरणा असे; आतां शीखांची संख्या त्यांत वाढत आहे. चांगले कपडे शिवून घ्यायचे असले तर एखादा फर्नांडीस किंवा डिसूझा शोधला पाहिजे अशी मुंबईकरांची श्रद्धा. हॉकी फुटबॉल या खेळांत व अॅथलेटिक्समध्यें त्यांची मिरास मोठी; पण इतर खेळांत त्यांचें नांवहि सहसा ऐकूं येणार नाहीं. चिराबाजार—धोबीतलाव आणि वांद्रें या किरिस्तावांच्या मुख्य आळ्या. गोव्यांतील गांवकरी येथें 'कुडां' (क्लब) करून राहातात. दाई आणि 'आया' या व्यवसायांत त्यांच्या स्त्रिया फार. पारशी नाकावरून, किरिस्तांव एकंदर बोलण्याचालण्यावरून ओळखूं येतो; पण यहुदी-म्हणजे ज्यू—तसा वेगळा दिसत नाहीं. तो भायखळा-नागपाड्याकडे राहतो-व पुरा मराठी बनला आहे. कुलाबा जिल्ह्यांतील एकाद्या गांवाच्या नांवापुढें 'कर' जोडून त्याचें आडनांव होतें. एके काळीं मुंबईतील मराठी प्राथमिक शिक्षणाचा भार या समाजांतील स्त्रियांनीं वाहिला.

गुजराती हा, अर्थातच, मुख्यतः व्यापारीत आढळतो-किराणा मालापासून ते प्रचंड आयात निर्यातीपर्यंत. शेअरबाजार त्यांचाच. पण कायदा आणि वैद्यकी यांतील वरिष्ठ श्रेणींतहि गुजराती पुष्कळ आहेत. जुन्या मुंबईत त्यांची विशेष गर्दी काळबादेवी-भुलेश्वर भागांत आहे. उपनगरांतहि त्यांचे वास लक्ते म्हणजे सांताक्रूझ, विलेपार्लें (पश्चिम), मालाड, कांदिवली बोरिवली, आणि घाटकोपर. 'लोकल' गाड्यांतून, 'बाजारांत' जातां येतांना ते 'रमी' अथवा 'सात हाती' मन लावून खेळतात-आणि खेळत नसले कीं तेजीमंदीच्या गोष्टी बोलतात. अशा गोष्टींत फक्त 'श्रीमंत शेटिया'लाच रस असतो असें नव्हे, तर त्याच्या गरीब नोकरालाहि असतो.

मुंबईतील माटुंगा विभागाला 'माटुंगम्' म्हणण्याचा प्रघात तेथील मद्रासी गर्दीवरून पडला. इतर भागांतहि ते आहेत—पण तुरळक. त्यांचें 'सार्वजनिक' जीवन माटुंग्यांत. दाक्षिणात्य संगीत आणि नृत्य यांच्या जलशांना हजारांनीं लुंगी जमते. शिवाय स्त्रियांचीहि संख्या मोठी असते. मद्रासी हा हाडानें "अकौंटंट" आणि "टैपिस्ट"; फाड्फाड् इंग्रजी बोलतो—जरा तामीळच्या अंगानें, आणि गतीनें. मंठा कामसू आणि वरिष्ठांना संपूर्ण "स्याटिसफॅक्शन्" देणारा. म्हणून कचेऱ्यांतून आणि बँकांतून याची बीग वाढती आहे. मुंबईला त्यानें इडली-डोशाचें आणि काळ्या कॉफीचें व्यसन लावलें;



पण मुंबईचें कांहीं व्यसन त्यानें स्वतःस लावून घेतलें नाहीं. राजकारणाची चर्चा हें व्यसन त्यानें इडलीबरोबर आपल्या प्रांतातून आणलें असावें. त्याला आद्याक्षरांचा सोस असावा; एकेकाला चारपांच असतात. त्याचें "अंगवस्त्रम्" म्हणजे फक्त उत्तरीय; तें निर्मळ असतें, पण त्याला उघडें राहणें आवडतें. उघड्यानेंच तो 'बॉल-बॅडमिंग्टन्' खेळतो. हा त्याचा खास खेळ; त्यांत प्रत्येक बाजूला डझनभर गडी लुंगी आणि चित्त विचलित होऊं न देतां कसे उड्या मारतात हें चकित होत्साते प्रेक्षक डोळे भरून पाहतात. तसेच ते बघत राहतात, जेव्हां किंमती पोशाखांतील सिंधी ललना, आणि त्यांचे तेवढेच किंमती मर्दसंवगडी, रस्त्यावर उभे राहून कसल्याहि कळकट हातगाडीवाल्याकडून पाणी-पुरीसारखीं खाद्यें ग्रहण करतात तेव्हां. फाळणीनंतर मुंबईत सिंधी हजारांनीं आले. त्यांनीं येथील जुन्या व्यापारी जमातींशी मुकाबला दिला. कापडाचीं दुकानें, मिठाईचीं दुकानें, कॉलेजें उघडलीं, आणि शहरभर भडक रंग आणि उग्र वास उधळले. पेपरमिंट विकीत गाड्यांतून हिंडणारीं मळकट सिंधी मुलें पाहिल्यावर सिंधची दुर्दशा बोचूं लागते—पण एरव्हीं डोळ्यांपुढें नाचतात ते सिंधी पाहिल्यावर, निर्वासित ते कीं आपण असा संभ्रम मुंबईकराला पडतो. इतर प्रांतांतील लोकहि येथें आहेत, पण इतके डोळ्यांत भरत नाहींत.—शीख सरदारजी सोडून. त्याची उंची, दाढी आणि फेटा डोळ्यांत मावत नाहींत.

आतां आपला मराठी समाज. त्याचे सगळे बरेवाईट प्रकार मुंबईत सांपडतील. कांहीं मुंबईत मुरलेले—तर कांहींच्या मुद्रेवर सदैव भाव असा कीं आपण खरे कोंकणचे किंवा देशावरचे किंवा आणखी कोठचे तरी; फक्त पोटासाठीं येथें आहोंत—सबब निरपराधी! म्हणून असे लोक इतरांशीं पुरे एकजीव होत नाहींत. "मुंबईत पहाल तो आपल्याच चाळीत, क्वचितच शेजाऱ्याचें असें नांव माहीत"—इति माधव-जूलियन्. पण चाळ हेंच कारण नव्हे. अर्थात् शेजाऱ्यांविषयीं फाजील चौकश्या करण्याचा, आणि त्याच्या व्यवहारांत तोंड घालण्याचा स्वदेशी सद्गुण त्यांच्यांत नाहीं हें खरेंच आहे!—मात्र बहुतेक असे कीं शेजार आपल्या जातीचा पाहतील! —तत्वतः जातिभेदाचा बीमोड टाळ्या वाजवून मान्य करतील—पण—व्यवहार तेवढा मोकळा



नाहीं! जातीच्या संस्था पुष्कळ आहेत. सर्व मराठी लोकांची संस्था असली तरी तिच्या कार्यकर्त्यांची जातवारी तपासून कुरबूर होतेच—निदान कुजबूज. चाकरींत देखील ती दृष्टि आहे...कांहीं कचेऱ्यांत कांहीं जातींचीच माणसें आढळणार हें ठरल्यासारखें. मात्र प्रत्येक जात दुसऱ्या जातीविरुद्ध स्वार्थाची तक्रार तावातावानें करील! नव्या पिढीला विषाराची तेवढी बाधा झाली नसावी असें वाटतें—पण पंधरा-वीस वर्षांपूर्वी तेंच वाटत होतें.

या जातींची उडती तपासणीहि मनोरंजक ठरेल. गुण आहेत, गुणांच्या अतिरेकांतून कोठेंकोठें दोष उपजले आहेत. प्रत्येकीच्या चालीरीतींत, भाषेच्या लकबींत, वृत्तींत थोडा वेगळेपणा आढळेल. यांत परंपरेचा मोठा भाग आहे; ती नेहमींच जाणूनबुजून स्वीकारलेली असते असें नाहीं. माणसें कित्येकदां दिसतातहि निराळीं. मुंबईची हवा या वेगळेपणाला थोडीशी मारक आहे खरी—पण कित्येकजण तो हट्टानें टिकवतात. ब्राह्मण समाज तसा विविध आहे; पण इतिहासानें चित्पावनांना उठाव दिला, व ब्राह्मण म्हणजे चित्पावन असा कोता ग्रह निपजला. कित्येक चित्पावनांनाहि तो मानवला. इतिहास कोसळला तरी उठाव राहिला. अशी "सदाशिव पेठ" मुंबईतहि आहे माहीमपासून आग्नेयेला—दादर; माटुंगा...

बुद्धीला माशांचें खत गुणकारी ठरतें असा प्रवाद आहे. सारस्वत आणि कायस्थ-प्रभू मुली सुंदर असतात या समजामुळें इतर जातींतील होतकरू प्रेमी त्यांच्यावर प्रेम करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतात आणि मनांतल्या मनांत करतातहि. कायस्थ दादरला आणि ठाण्याला अधिक आढळतील. महाडच्या भागांत त्यांची धर्मभूमि; तेथील 'सोडा' (पेय नाहीं, तर सुकी मासळी!) हा प्रसाद. बाजीप्रभू, राम गणेश आणि चिंतामणराव देशमुख हीं त्रिमूर्ति. आपल्या इतिहासाचा या समाजाला सार्थ अभिमान आहे—आणि त्यांतूनच थोडा कडवटपणाहि आला आहे. गोड, नाजुक नांवें ठेवण्याची प्रथा कायस्थांनीं सुरू केली असें वाटतें. पाठारे प्रभू हा दुसरा प्रकार बराच निराळा आहे. ते पुरे मुंबईकर. ठाकुरद्वार, खार हीं त्यांची मक्का-मदिना. यांचीं आडनांवें तोंडांत घोळवावींत अशीं—विजयकर, नवलकर, धुरंधर, धैर्यवान, त्रिलोकेकर ब्रह्मांडकर अशी झेंप. या समाजांत स्त्रियांचें वजन मोठें. "किती असती चतुर पाकुपाक कुशल। तशा चित्रकला-पटु प्रभुनारी सकल." रांगोळ्या, भरतकाम इत्यादि चित्रकलेच्या 'स्त्रैण' विभागांत वर्षानुवर्षें— बाबलीबाय, सोकरबाय, लक्ष्मीबाय यांची कर्तबगारी गाजली आहे. "हजार पाकक्रिया" हें सुप्रसिद्ध पुस्तक एका पाठारेप्रभू भगिनीचेंच. त्यांतील 'हजार' हा शब्द अतिशयोक्तीचा नाहीं. एकंदरीत हा समाज भोजनाबाबत हौशी आणि कसबी आहे. परभी भाषा ठाकुरद्वारच्या आसपास कधीं कानीं पडते. ("आपले मामाला कनाय् सोकरी आलेय") 'संशयकल्लोळानें त्यांचा वेष उचलला, पण भाषा नाहीं. तिच्यासाठीं त्रिलोकेकरांचें 'हुंडा' नाटक वाचण्यासारखें आहे. स्त्रियांच्या जुन्या वेषासाठीं रा. ब. धुरंधरांचीं चित्रें पहावींत. जात म्हणून 'मराठे' हा शब्द थोडा अघळ पघळच आहे. 'घाटी' हाहि असाच एक शब्द. पटका, कोल्हापुरी 'पायताण' आणि अंदाजानें तिकडची वाटणारी बोली या आधारावर माणसाला सोयिस्करपणें घाटी म्हणावयाचें असा मुंबईचा शिरस्ता—अर्थात् गरीब माणसाला. 'कोंकणी' हा शब्द तसा वापरीत नाहींत. मुंबईच्या गिरण्यांत कोंकणचे स्त्री पुरुषच अधिक. ज्याला गिरणगांव असें नांव मामा वरेरकरांनीं गिरगांवला खिजविण्यासाठीं दिलें त्या परळ लालबाग भागांतील चाळींत हे कामगार राहतात. नाटकांची त्यांना फार आवड.



ऐतिहासिक नाटकांची गिरगांवातील सद्दी संपली, पण गिरणगावांत ती चालू आहे. भाऊच्या धक्क्यावरून बोटीनें गांवीं जातां येतांना त्यांना अनंत आपदा सोसाव्या लागतात—पण गांव या ओढीनें त्या सोसतात; मुंबईचा पोलिस हाहि बहुधा कोकणांतीलच असतो; 'सखाराम' हें त्याचें सर्वसाधारण नांव! 'भंडारी' कोंकणपट्टीचेच. मुंबईतील ताडीचा व देशी दारूचा धंदा एके काळीं त्यांच्या हातीं होता, आणि दर्यावर्दी म्हणून त्यांची ख्याति असे. कोळी हे आद्य मुंबईकर; मच्छीमारी-पलीकडे त्यांची फारशी महत्त्वाकांक्षा नसावी. त्यांच्यांत कर्तेपणा स्त्रीकडे; छानछोकी पुरुषाकडे अशी पांढरपेशाला विपरीत भासणारी वाटणी असते. किंबहुना 'कोळीण' सगळ्यांना ठाऊक; त्या शब्दाचें पुल्लिंग म्हणून 'कोळी' धरून चढवायचा! याशिवाय पांचकळशी (हे मुंबईच्या अगदीं जुन्या रहिवाशांपैकीं) चौकळशी, सोनार (म्हणजे दैवज्ञ), खत्री, कामाठी, इत्यादि कितीतरी आहेत. पण हा जाति-प्रपंच येथेंच आवरावा.

मुंबईचा दूधवाला विसरून चालणार नाहीं. उपनगरांत गोरेगांव येथें सरकारी गवळीवाडा झाला, आणि तेथून बाटलीबंद दूध शहरभर जाऊं लागलें, तरी दूधवाला 'भय्या' आणि 'वसईवाला' हा वसईपासून सफाळ्यापर्यंत कोणत्याहि गांवचा असेल, हिंदु किंवा ख्रिश्चन असेल—पण तो कावड वापरून तिच्यांतून जनत्यास थोडी भाजीहि आणेल, आणि चहाला 'शाय' म्हणेल. 'भय्या' हा तर विनोदाचा जुना विषय आहे—पण करुणेचाहि व्हावा. वेळींअवेळीं हंडे घेऊन तो लोकलगाड्यांतून पेंगत असतो; आणि रस्त्यानेंहि डोक्यावर हंडा घेऊन पेंगत चालतो—तोहि धांवल्यासारखा. त्याच्या हंड्यांतील दुधांत जातें त्याच्या निम्म्यानें पाणी त्याच्या अंगाला लागलें असतें तर त्याची कळा थोडी सुधारली असती. गोठ्यांच्या वळचणीलाच तो राहतो. ज्या म्हशींची उस्तवारी करतो त्यांच्या इतकीहि सुखसोय त्याला मिळत नसेल. प्रत्येकाची चूल निराळी; तुलसी-रामायणाचें सह-वाचन अथवा सह-गायन हाच त्याचा विरंगुळा, आणि त्याचें 'क्लब-लाइफ'. एक लोटा आणि किमान भांडीं ही त्याची दौलत. त्याचें खटलें उत्तरेंत



अनुक्रमणिका



जुन्या गोकुळाच्या आसपास असतें. उत्तर दिशेनें जाणाऱ्या कोणाहि भैय्याला तो हारतुऱ्याच्या सन्मानानें पुढाऱ्यासारखा गाडीपर्यंत पोंचवतो. आपणहि एका शुभ दिनीं असेच त्या दिशेनें जाऊं या आशेनें त्याचे डोळे अशा वेळीं लकाकतात.

मुंबईला अग्निमांद्याचें देणें असलें, तरी जिव्हालौल्याचेंहि आहे. खाण्याजेवण्याच्या अगणित तऱ्हा आणि सोयी आहेत. इंग्रजी सफेदपणापासून मोगलाई–पंजाबी सिंधी मसालेदारपणापर्यंत चवीच्या जाती आहेत; दहा रुपयाच्या डिनरपासून आठ आण्याच्या राइसप्लेटपर्यंत खिशाची सोय आहे. चिनी 'च्यॉव्–च्यॉव्', मद्रासी सारभातम्, मत्स्याहार, गुजराती रसोई, पारशी धनशाक, भंडारी गरम मसाला... हीं व आणखी कितीतरी पाकतंत्रें जारी आहेत. फराळाच्या दुकानांचे तेंच. इराणी, मद्रासी, उडपी या परस्थांचा पाहुणचार मुंबईकरांच्या अंगवळणी पडला आहे; स्वकीय आहेतच. "आरोग्य भुवनांची" सांथ कांहीं वर्षांपूर्वीं सुरू झाली. व्हिटॅमिन्सचीं कोष्टकें आणि नवीन नांवांचीं खाद्यपेयें आढळतात. कोटांतील ऑफिसांतून 'भट' (राजस्थानी ब्राह्मण) हा कारकुनशाहीचा विसावा.

मुंबईची हवा काय वर्णावी! कसल्याहि हवेची तरफदारी करणारा कडवा स्थानिक अभिमानहि तिला पुरा पडायचा नाहीं. नऊ-दहा महिने रात्रंदिवस उकडतें. दोन तीन महिने रात्रीं उकडत नाहीं. त्या मोसमांत मुंबईकर गरम कपड्यांना ऊन दाखवितो—अंगावर घालून. घामट शौक! लहानमोठ्या सुटींत तो लोणावळा माथेरान-महाबळेश्वरला खास जातो. रविवारीं जवळपास 'पिकनिक'ला जातो. तेथें एखादी झुळूक वांट्याला आली तर तिची गार आठवण पुढच्या पिकनिकपर्यंत पुरवून पुरवून वापरतो. मिश्र सहलींमुळें गारवा कमी होत असावा. म्हणून त्या सहली वाढत आहेत! ज्यांचें बिऱ्हाडबाजलें (जागेच्या अभावीं) लोकल गाड्यांच्या आंवाक्याबाहेर असतें ते वीक-एंडला आपल्या गांवीं इमानें इतबारें संसार करायला जातात. शनिवारीं दुपारीं सुटणाऱ्या एका चोंटीला "हजबंड स्पेशल" हें केविलवाणें नांव आहे.

गडकऱ्यांनीं इंदू-बिंदूला मुंबईतील दोन रेल्वेंची उपमा दिली आहे; आतां त्या रेल्वेंच्या लोकलगाड्या कोळशाऐवजीं वीज वापरत असल्यामुळें त्या उपमेचा रंग फिका पडला. उलटसुलट दिशेनें दिवसाला सातशें गाड्या धांवत असतात; लाखों लोक बसून, उभ्यानें, लोंबकळत प्रवास, तक्रारी आणि चर्चा करतात. बसगाड्याहि शेंकड्यानें आहेत. ट्रामगाड्यांतून (परवांपर्यंत कांहीं काळ) एका आण्यांत एक प्रवास होई (तो आठ मैलांचा का असेना!) त्या काढून टाकण्यासंबंधी दर वर्षी चर्चा होते.

मुंबईत हजारांनीं स्त्रिया नोकऱ्या करतात. त्यापैकीं बहुसंख्य मराठी. पंधरा वर्षांपूर्वींपर्यंत मास्तरीण अथवा नर्स याहून अन्य नोकरी करणारी मराठी स्त्री बोलण्याचा विषय होण्याइतकी अपवादात्मक होती. आतां किमान शिक्षण होऊनहि नोकरी न करणारी कुमारिका स्वतंत्र बुद्धीची वाटते!

मुंबईत साहित्य–संगीत नाट्याचे मोठे उत्सव होतात; त्यांत मोकळ्या रसिकतेनें स्त्रियाहि भाग घेतात. अंग चोरून खोट्या शालीनतेनें बसत नाहींत. अर्थात् 'दिखाऊ' स्त्रियांचा लफ्फेदार वर्ग आहेच— तो नेहमीं होता. पण त्यांचा पोकळपणा आतां तुलनेनें अधिक उघडा पडतो. नवेपणाचें पोशाखी सोंग, थिल्लरपणा, क्वचित् हीन रुची हे दोष तरुण मुंबईकरांत दिसतील; पण ते कांहींसे सगळ्या महाराष्ट्राचे आहेत. पण महाराष्ट्राचे दोष आणि गुण--यांचा वारसा स्वीकारूनहि मुंबईत आणखी कांहीं तरी आहे. नव्या पिढीनें पुष्कळ कोळीष्टकें झाडून टाकलीं आहेत. पुढची दिशा शोधण्याची धडपड आहे. हिरीरी आणि ताजेपणा आहे. मुंबईला संस्कृतीच नाहीं असा ज्यांचा आक्रोश त्यांच्या संस्कृतीपासून सुटली हें तिचें भाग्य! ती विविध आहे, जिवंत आहे. खुंटाला बांधलेली नाहीं. हीच तिची संस्कृति. ती मराठी संस्कृतीचाच भाग आहे--तिला दिशा दाखविणारी आणि चैतन्य देणारी आहे.



# काय बाई पुण्याची तारीफ
## लवंगा निघाल्या बारीक

ग. रा. कामत

पुणें हें महाराष्ट्राचें नाक आहे असें म्हटलें जातें. पुण्याच्या उच्छ्वासानें महाराष्ट्रांतल्या चैतन्याची साक्ष पटते. अर्थात् नाक म्हटलें म्हणजे तें चाफेकळीसारखेंच असलें पाहिजे असा नियम नाहीं. त्यामुळें महाराष्ट्राचें हें नाक नकटें आहे; किंवा कोरड्या, उबदार हवेंतसुद्धां त्याला सदोदित शीतबाधा झालेली असते हे आरोप ओघानेंच येतात!

पुणें हें इतिहासप्रसिद्ध शहर आहे आणि पुणेंकर हा अनेक अर्थांनीं पुराण पुरुष आहे! महाराष्ट्राची मान अभिमानानें ताठ रहावी असा इतिहास पुण्यांत घडला; आणि मराठ्यांच्या कर्तृत्वाविषयीं ज्या आख्यायिका परप्रांतांतून अजूनहि प्रचलित आहेत, त्यांची प्रेरणाहि पुण्यानेंच दिली. पुणेरी पगडीचा भार कांहीं काळ टेम्स नदीवरल्या महाभागांनाहि असह्य झाला होता. आणि शिवाजीनें सुरत लुटलें, त्यावेळीं उडालेल्या हाःहाःकाराची प्रचीति त्याच शहरांत भरलेल्या राष्ट्रीयसभेंत पुणेरी जोड्यानें आणून दिलेली आहे. काळाच्या महिम्यानें पुणेरी पगडीचा रंग पुढें पुण्यांतच विटला असला, तरी पुणेंकराचें डोकें अजून पूर्वीसारखेंच आहे. आणि पुणेरी जोडा इतिहासजमा होण्याचे दिवस आले असले, तरी स्वकीयांची आणि परकीयांची पूजा बांधतांना पुणेंकर कधीं अनवाणी दिसला नाहीं. मात्र पुण्याचें केवळ पगडी आणि जोडा यांनाच प्रतिष्ठा प्राप्त करून दिली असेंहि म्हणतां नाहीं. भामटेगिरीलाहि त्यानें कीर्तिशिखरावर चढवलें. पगडी किंवा जोड्याप्रमाणें भामटेगिरीची गांठहि नियतीनें या पुण्यपुरीशीं घातली आणि 'लवंगा बारीक निघाल्याची' नाजुक तक्रार करण्याचा बांका प्रसंग एका कवीवर आणून ठेवला!

ऐतिहासिक दृष्ट्या पुण्याचें स्थान अनन्यसाधारण असलें, तरी पुण्याची वसाहत तुलनेनें पुष्कळच अर्वाचीन म्हणावी लागेल.

जुन्नरसारखी महाराष्ट्रांतली अतिप्राचीन वसाहत पुण्याच्या परिसरांत आहे हें खरें; पण आजचें पुणें ही पेशवेकालीन करामत आहे. मुरार जगदेवानें मारलेली मेख उकरून काढून चालुक्य-राष्ट्रकूटांपर्यंत पुण्याचें उत्खनन करणें ही केवळ इतिहास-संशोधकांची करमणूक आहे! १७ व्या शतकांत निजामशाहींतल्या त्या बहाद्दर मराठ्यानें पुणें भस्मसात् केलें आणि त्यावरून गाढवाचे नांगर फिरवले. पण दादोजी कोंडदेवाच्या पंखाखालीं पुणें शहराचा आपल्या राखेंतून पुनर्जन्म झाला. शिवाजीच्या अधिवासानें ही भूमि पुनीत झाली आणि



स्वातंत्र्याच्या घोषणेनें तिच्यामधलें शौर्य जागृत झालें. पण शिवाजीसारख्या 'डोंगरी उंदरा'च्या कर्तृत्वाला हें मोकळें मुलखमैदान गैरसोयीचें. त्यामुळें शिवकालांत पुण्याचा महिमा पुण्यापुरताच राहिला. पुढें औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगलशाहीला बहामनी राज्याची अवकळा आली; मोगलांच्या कैदखान्यांत कर्तृत्वानें खच्ची झालेला मराठ्यांचा राजा निष्प्रभ ठरला; आणि शिद्द्यांच्या गोणत्यांतून वांचलेल्या पेशव्यांचें कर्तृत्व उदयास आलें, तेव्हां पुण्याचें नशीब उघडलें! दिल्लीच्या राजकारणांत मराठ्यांचें प्रस्थ वाढूं लागलें, तसें या शहरानें आपले हातपाय पसरायला सुरवात केली. पेशव्यांनीं आणि त्यांच्या प्रतिष्ठित सरदारांनीं पुण्याचा विस्तार केला आणि मोगलकालीन जुन्या 'पुण्या'चें, ब्राम्हस्तोम विधीनें धर्मांतर करून त्याला 'वार'करी बनवलें! वानवडी हा शिंद्यांचा तळ आणि होळकरांच्या छावणीचें ठिकाण हा तत्कालीन पुण्याचा विस्तार ध्यानांत घेतला, म्हणजे पुण्याची अलिकडली वाढ 'न भूतो न भविष्यति' अशा स्वरूपाची आहे असें वाटण्याचें कारण नाहीं. युद्धकाळांत देहू-खडकीचें महात्म्य वाढलें; आणि स्वातंत्र्योत्तर काळांत पुणें विद्यापीठ, नॅशनल केमिकल लॅबोरेटरी, खडकवासला मिलिटरी ॲकेडेमी, पेनिसिलिन कारखाना प्रभृति संस्थांमुळें पुणें शहराच्या वाढीला मोकळें रान मिळालें आहे.

गेल्या दोन महायुद्धांनीं, विशेषतः दुसऱ्या महायुद्धानें पुण्याचें स्वरूप पुरेपणीं अंतर्बाह्य बदलून टाकलें आहे. अग्निहोत्र मंदिरांत मंत्रघोष करणाऱ्या एखाद्या कर्मठ ब्राह्मणानें उठावें आणि गाफिलपणें शिखात्याग करून बूट-पाटलोणीच्या आधुनिक वेषांत इराण्याच्या हॉटेलांत बसून अभक्ष्यभक्षण सुरूं करावें असला विक्षिप्त फरक पुणें शहराच्या बाबतींत घडून आला आहे! 'म्युनिसिपालिटी' नाटकामुळें मान्यता पावलेली नगरपालिका अधिक कार्यक्षम झाली आहे, तिचें अस्तित्व जागजागीं जाणवूं लागलें आहे. पाठीला पाठ चिकटवून दाटीवाटीनें बसणारीं घरें आतां मोकळेपणानें एकमेकांकडे पाहूं लागलीं आहेत. रस्ता कोणता आणि गटार कोणतें याविषयीं संभ्रम निर्माण करणाऱ्या सुप्रसिद्ध बोळांनीं जुन्या परिस्थितीवर चक्क डांबर फासलें आहे. रस्त्यावरले दिवे शोधायला कंदिल घेऊन घराबाहेर पडण्याची आवश्यकता उरली नाहीं. रस्त्याच्या मध्यभागीं मख्खपणें बसून राहिलेलीं दैवतें निमूटपणें फूटपाथचा नियम पाळूं लागलीं आहेत. तो अतिविख्यात प्लेगसुद्धां केवळ पेन्शनरांच्या शिळोप्यासाठींच काय तो उरला आहे. डांस आणि हिंवतापाच्या मोहिमेविरुद्ध पुण्यानें कमालीचें यश मिळविलें आहे. उद्यानें, उपवनें शहराच्या सौंदर्यांत भर घालतात आणि विश्रांतीसाठीं आसुसलेल्या मनाला रमणीयतेची झुळूक देतात; किंवा या उपवनांतून पोसलेले ऐतखाऊ पशुपक्षी मुलांची करमणूक आणि इतरांचें वेळ घालवण्याचें साधन होऊं शकतात याचाहि शोध

अलिकडे पुण्याला लागला आहे! अनेक विनोदी लेखांना विषय पुरवणारी टांगेवाला ही इरसाल संस्था नामशेष होण्याच्या मार्गावर आहे; आणि जलदगति यांत्रिक वाहनांनीं कॅंप संस्कृतीला जवळ ओढून आणण्याचा घाट घातला आहे. चक्री पागोट्यांचा संकोच होऊन प्रसिद्धीस आलेली पगडी फक्त पुराण वस्तुसंग्रहांतच दिसणार कीं काय अशी जबर शंका येऊं लागली आहे; आणि रुमाल टोपींची मजल दरमजल करीत पुणेंकर आतां बोडक्यानें हिंडूं लागला आहे. खडबडीत रस्याबरोबर जोड्याचें माहात्म्य संपलें आणि गुळगुळीत डांबरी रस्त्यानें नाजुक चप्पलेला जवळ केलें आहे. पायांत जोडा घातला म्हणून धोंडे खाणाऱ्या स्त्रीची आठवण बुजत येते न येते तोंच सलवार-खमीजाच्या पंजाबी पावित्र्यांत एकादी धृष्ट पोरगी पेन्शनरांच्या काकदृष्टीला आव्हान देऊं लागली आहे! स. प. कॉलेजसमोर अभक्ष्य खाद्यविशेष पुरवणारें हॉटेल निघतांच आकाशपाताळ एक करणाऱ्या मंडळींच्या पेठेंतलाच मटण-दुकानदार आतां रोजीं २० बोकड लागतात असा हिशेब सांगूं लागला आहे! इतकेंच नव्हे, तर पुढील २५ वर्षांत महाराष्ट्रांत काय काय फेरबदल घडून येतील हें सांगतांना केसरीला केंस राखणारा संपादक मिळणार नाहीं असें भाकित श्री. मो. ग. रांगणेकरांनीं वर्तवलें होतें; पण काळानें ती अशक्य वाटणारी गोष्ट सुद्धां शक्य करून दाखवली आहे"!

पण पुणें बदललें यावर सहसा कुणाचा विश्वास बसणार नाहीं. कोणत्याहि बऱ्यावाईट सुधारणेचा स्वीकार करतांना पुण्यानें केली नसेल इतकी खळखळ पुण्याबाहेरचे लोक पुण्याविषयींचें मत बदलतांना करतील यांत शंका नाहीं. सुधारणा आल्या आणि गेल्या. पण पुणें पुणेंच राहिलें! आंग्ल संस्कृति केव्हांपासून वास्तव्य करून राहिलेली. पण पुण्यानें तिच्याकडे चक्क पाठ फिरवली होती. मग यक्षिणीची कांडी फिरल्यासारखा हा अद्भुत चमत्कार एकाएकीं कसा घडून येईल अशीच पुण्याबाहेरच्या मंडळींची शंका आहे. त्यामुळेंच पुण्याचा कायापालट झाला असेल कदाचित्, पण हृदयपालट होणार नाहीं असेंच त्यांचें मत असणार!

पुणें म्हणजे पेशवाई. पुणें म्हणजे पेन्शनरांचा गांव. पुणें म्हणजे कर्मठ ब्राह्मणी संस्कृतीचा बालेकिल्ला. पुणें म्हणजे बुरसटलेल्या सनातनी विचारांची गंगोत्री. आणि पुणें म्हणजे जीर्ण वस्तू, व्यक्ती आणि विचार यांचा अजबखाना! पुण्याइतकीच पुणेरी वृत्तीहि प्रसिद्धि पावलेली. अत्यंत स्वार्थी, अत्यंत स्वयंकेंद्रित आणि अत्यंत कद्रू. पुण्याबाहेर शहाणपण नाहीं आणि पुण्याबाहेर जग नाहीं. त्यामुळें दुसऱ्याविषयीं कमालीची तुच्छतावृत्ति हासुद्धां पुणेरी संस्कृतीचा अविभाज्य घटक आहे! पुणें आणि पुणेकरांविषयींचे इतरांचे हे समज—किंवा गैरसमज! पुणेकरांनींच ते निर्माण केले आणि वाढवले. क्वचित् प्रसंगीं तर इतरांच्या या समजुतींतून पुणेंकरांची करमणूक तर होत नाहीं ना असाहि भास होतो.

हें खरें असो वा खोटें असो, पुण्याचें महत्त्व त्यामुळें कमी होत नाहीं; आणि पुणेकरांची कामगिरीहि उपेक्षणीय ठरत नाहीं. पुण्याच्या



दगडालासुद्धां इतिहास आहे; आणि आपल्या इतिहासाचा जाज्वल्य (क्वचित् फाजीलहि!) अभिमान पुणेंकरांना आहे. शिवकाल किंवा पेशवाईचा जमाना बराच दूरचा म्हणून क्षणभर बाजूला ठेवला, तरी अव्वल इंग्रजींतहि पुण्याचें स्वत्व टिकून राहिलेलें दिसतेंच. साहेबाचा पांढरा पाय अगदीं सरतेशेवटीं पुण्यांत पडला, इंग्रजी वर्चस्वाखालून स्वदेशाची मुक्तता करण्यासाटीं ज्या नानाविध चळवळी सुरू झाल्या, त्यांचें उगमस्थान प्रायः पुणेंच होतें. पारतंत्र्याच्या धक्क्यामुळें आलेली ग्लानी आणि इंग्रजी राज्य व संस्कृति यांच्या निकट दर्शनामुळें वाटलेलें आश्चर्य यांचा पहिला झटका ओसरतांच 'असें कां झालें आणि पुढें काय!' हा विचार सुरू झाला. लहुजींच्या सरबत्तीनें साहेबांच्या तोफखान्याशीं मुकाबला करणें अशक्य याची प्रचीति रावबाजींनीं आणून दिलेली होतीच! आणि रावबाजींच्या जुलमी कारकीर्दीस कंटाळलेली जनता नुसत्या स्वराज्याच्या पवलानें बलाढ्य इंग्रजी सत्तेविरुद्ध सशस्त्र बंड करायला तयार होईल ही आशासुद्धां व्यर्थ होती. स्वराज्यप्राप्तीची तळमळ कितीहि वाटली, तरी साधनांचा निश्चित बोध होत नव्हता. त्यामुळें स्वकीयांच्या अवनतीची मीमांसा आणि परकी-

अलिकडे पुण्याला लागला आहे! अनेक विनोदी लेखांना विषय पुरवणारी टांगेवाला ही इरसाल संस्था नामशेष होण्याच्या मार्गावर आहे; आणि जलदगति यांत्रिक वाहनांनीं कँप संस्कृतीला जवळ ओढून आणण्याचा घाट घातला आहे. चक्री पागोट्यांचा संकोच होऊन प्रसिद्धीस आलेली पगडी फक्त पुराण वस्तुसंग्रहांतच दिसणार कीं काय अशी जबर शंका येऊं लागली आहे; आणि रुमाल टोपींची मजल दरमजल करीत पुणेंकर आतां बोडक्यानें हिंडूं लागला आहे. खडबडीत रस्त्यांबरोबर जोड्याचें माहात्म्य संपलें आणि गुळगुळीत डांबरी रस्त्यानें नाजुक चप्पलेला जवळ केलें आहे. पायांत जोडा घातला म्हणून धोंडे खाणाऱ्या स्त्रीची आठवण बुजत येते न येते तोंच सलवार-खमीजाच्या पंजाबी पावित्र्यांत एखादी धृष्ट पोरगी पेन्शनरांच्या काकदृष्टीला आव्हान देऊं लागली आहे! स. प. कॉलेजसमोर अभक्ष्य खाद्यविशेष पुरवणारें हॉटेल निघतांच आकाशपाताळ एक करणाऱ्या मंडळींच्या पेठेंतलाच मटण-दुकानदार आतां रोजीं २० बोकड लागतात असा हिशेब सांगूं लागला आहे! इतकेंच नव्हे, तर पुढील २५ वर्षांत महाराष्ट्रांत काय काय फेरबदल घडून येतील हें सांगतांना केसरीला केंस राखणारा संपादक मिळणार नाहीं असें भाकित श्री. मो. ग. रांगणेकरांनीं वर्तवलें होतें; पण काळानें ती अशक्य वाटणारी गोष्ट सुद्धां शक्य करून दाखवली आहे!

पण पुणें बदललें यावर सहसा कुणाचा विश्वास बसणार नाहीं. कोणत्याहि बऱ्यावाईट सुधारणेचा स्वीकार करतांना पुण्यानें केली नसेल इतकी खळखळ पुण्याबाहेरचे लोक पुण्याविषयींचें मत बदलतांना करतील यांत शंका नाहीं. सुधारणा आल्या आणि गेल्या. पण पुणें पुणेंच राहिलें! आंग्ल संस्कृति केंबुर्डें वास्तव्य करून राहिलेली. पण पुण्यानें तिच्याकडे चक्क पाठ फिरवली होती. मग यक्षिणीची कांडी फिरल्यासारखा हा अद्‌भुत चमत्कार एकाएकीं कसा घडून येईल अशीच पुण्याबाहेरच्या मंडळींची शंका आहे. त्यामुळेंच पुण्याचा कायापालट झाला असेल कदाचित्, पण हृदयपालट होणार नाहीं असेंच त्यांचें मत असणार!

पुणें म्हणजे पेशवाई. पुणें म्हणजे पेन्शनरांचा गांव. पुणें म्हणजे कर्मठ ब्राह्मणी संस्कृतीचा बालेकिल्ला. पुणें म्हणजे बुरसटलेल्या सनातनी विचारांची गंगोत्री. आणि पुणें म्हणजे जीर्ण वस्तू, व्यक्ती आणि विचार यांचा अजबखाना! पुण्याइतकीच पुणेरी वृत्तीहि प्रसिद्धि पावलेली. अत्यंत स्वार्थी, अत्यंत स्वकेंद्रित आणि अत्यंत कद्रू. पुण्याबाहेर शहाणपण नाहीं आणि पुण्याबाहेर जग नाहीं. त्यामुळें दुसऱ्याविषयीं कमालीची तुच्छतावृत्ति हासुद्धां पुणेरी संस्कृतीचा अविभाज्य घटक आहे! पुणें आणि पुणेकरांविषयींचे इतरांचे हे समज–किंवा गैरसमज! पुणेकरांनींच ते निर्माण केले आणि वाढवले. क्वचित् प्रसंगीं तर इतरांच्या या समजुतींतून पुणेंकरांची करमणूक तर होत नाहीं ना असाहि भास होतो.

हें खरें असो वा खोटें असो, पुण्याचें महत्त्व त्यामुळें कमी होत नाहीं; आणि पुणेकरांची कामगिरीहि उपेक्षणीय ठरत नाहीं. पुण्याच्या



दगडालसुद्धां इतिहास आहे; आणि आपल्या इतिहासाचा ज्वलंत (क्वचित् फाजीलहि!) अभिमान पुणेंकरांना आहे. शिवकाल किंवा पेशवाईचा जमाना बराच दूरचा म्हणून क्षणभर बाजूला ठेवला, तरी अव्वल इंग्रजींतहि पुण्याचें स्वत्व टिकून राहिलेलें दिसतेंच. साहेबाचा पाय अगदीं सरतेशेवटीं पुण्यांत पडला, इंग्रजी वर्चस्वाखालून स्वदेशाची मुक्तता करण्यासाठीं ज्या नानाविध चळवळी सुरू झाल्या, त्यांचें उगमस्थान प्रायः पुणेंच होतें. पारतंत्र्याच्या धक्क्यामुळें आलेली ग्लानी आणि इंग्रजी राज्य व संस्कृति यांच्या निकट दर्शनामुळें वाटलेलें आश्चर्य यांचा पहिला झटका ओसरतांच 'असें कां झालें आणि पुढें काय!' हा विचार सुरू झाला. लाडक्यांच्या सरबत्तीनें साहेबांच्या तोफखान्याशीं मुकाबला करणें अशक्य याची प्रचीति राघबाजींनीं आणून दिलेली होतीच! आणि रावबाजींच्या जुलमी कारकीर्दीस कंटाळलेली जनता नुसत्या स्वराज्याच्या परवलीनें बलाढ्य इंग्रजी सत्तेविरुद्ध सशस्त्र बंड करायला तयार होईल ही आशासुद्धां व्यर्थ होती. स्वराज्यप्राप्तीची तळमळ कितीहि वाटली, तरी साधनांचा निश्चित बोध होत नव्हता. त्यामुळें स्वकीयांच्या अवनतीची मीमांसा आणि परकी-

अनुक्रमणिका

यांच्या यशाच्या गुरुकिल्लीची शोधाशोध सुरूं झाली. सर्वसामान्य जनतेचें दारिद्र्य, दुःख, अज्ञान आणि नैराश्य मनावर ठसलें. समाजांतील फुटीर वृत्तींना प्रोत्साहन देण्याच्या व असंतोष माजवणाऱ्या जाचक रूढी नजरेंत भरूं लागल्या. स्त्री-शूद्रादिकांना जन्मभर दास्यांत व अज्ञानांत ठेवणाऱ्या धार्मिक समजुती वेडगळ वाटूं लागल्या. इंग्रजी संस्कृतीच्या तुलनेनें हे आणि यांसारखे दोष अधिकच विक्राळ स्वरूपांत उभे राहूं लागले. आणि स्वकीयांच्या दोषदिग्दर्शनाची एक फार मोठी लाट उसळली. परंतु रागाच्या तिरमिरींत स्वदोषदिग्दर्शन आणि इंग्रजांचें गुणसंकीर्तन करतांना थोडें तारतम्यहि सुटूं लागलें! त्याची प्रतिक्रिया अपेक्षित होती. आणि लौकरच ती झालीहि. पुढें या विचारप्रणालींतहि एककल्लीपणा शिरला आणि आपलें तें इथून तिथून सारें श्रेष्ठ असें प्रतिपादन करतांनासुद्धां तारतम्य सुटूं लागलें! मात्र या प्रतिक्रियेंतून आपला धर्म, आपली भाषा, आपला इतिहास यांविषयीं एक नवाच अभिमान सर्वत्र संचारला. जुन्याचें पद्धतशीर संशोधन सुरूं झालें आणि नव्याचा स्वीकार करतांना नाविन्याच्या झळाळीमुळें दिपून न जातां अधिक चोखंदळपणा दाखवला जाऊं लागला.

या क्रिया प्रतिक्रियेंतून नानाविध क्षेत्रांतल्या चळवळींना प्रारंभ झाला. शिक्षण, समाजसुधारणा आणि राजकीय चळवळ हीं तीन क्षेत्रें प्रमुख. पण त्यांच्या अनुषंगानें इतर अनेक प्रश्नोपप्रश्न यांत शिरले. या प्रश्नांचा सर्वांगीण विचार आणि ते सोडविण्यासाठीं भगीरथ प्रयत्न प्रथम पुण्यांतच सुरूं झाले. स्वजनहितबुद्धीनें वैक्तिक स्वार्थावर लाथ मारून अंगीकृत कार्याला जीवनसर्वस्व वाहणाऱ्या व्यक्ती किंवा आपापले चरितार्थाचे व्यवसाय संभाळून समाजकार्यांत हिरीरीनें भाग घेणारे कृतिशील पुढारी पुणें शहरांत जितके निर्माण झाले, तितके महाराष्ट्रांत इतर कुठेंहि झालेले दिसत नाहींत. लोकहितवादी, न्या. रानडे, डॉ. भांडारकर, सार्वजनिक काका, महात्मा फुले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, आगरकर, नामदार गोखले, महर्षि कर्वे, इतिहासाचार्य राजवाडे, ज्ञानकोशकार केतकर हीं त्यांतलीं कांहीं ठळक नांवें. या सर्वांची विविध क्षेत्रांतली प्रचंड कामगिरी ध्यानांत घेतली, तर एवढी थोर परंपरा बंगालसारखा एखादा अपवाद (पण तोहि फक्त कांहीं बाबतींतच!) वगळला, तर इतर कोणत्याहि प्रांताच्या किंवा शहराच्या वांट्याला आलेली नाहीं असें सहज म्हणतां येईल.

या दृष्टीनें पुणें हें महाराष्ट्राचें ज्ञानतीर्थ आहे. रमण्यांतील दक्षिणेला ग्रहण लागण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच पुणेंकरांचें लक्ष साहेबाच्या भाषेकडे वळलें. इंग्रजीला 'वाघिणीचें दूध' ही संज्ञा पुण्यानें दिली आणि हें दूध पाजून देशबांधवांना बलवान् बनवण्याच्या कामीं पुणेंकरांनीं पुढाकार घेतला. वेदमंत्र कानावर पडला तर शूद्राच्या कानांत शिशाचा रस ओतावा हा स्मृतिप्रणीत दंडक ज्यांनीं शतकानुशतकें ऐकला त्याच पुण्यांत अस्पृश्यांसाठींहि शाळा निघाली. स्त्रियांनीं घराबाहेर पडणेंहि जिथें थिल्लरपणाचें मानलें जाई, तिथें मुलींच्या शिक्षणाची सोय झाली. मुलांच्या मनांत राष्ट्रीय वृत्तीचें बीजारोपण व्हावें यासाठीं स्वतंत्र शिक्षणसंस्था निघाल्या. शारीरिक शिक्षण किंवा लष्करी शिक्षणाची प्राथमिक तयारी करून देणारीं विद्यालयें स्थापन झालीं. पहिलें बिनसरकारी कॉलेजहि पुण्यांतच निघालें! अनाथ विद्यार्थी-विद्यार्थीनींना आश्रय आणि शिक्षणाची सोय, परित्यक्त स्त्रिया आणि बेवारशी संतति यांना



आसरा, विधवांसाठीं शिक्षण, विधवाविवाहाचा प्रश्न इ. अनेक उद्योगांत पुण्यानें पुढाकार घेतला. स्त्रियांची दास्यांतून मुक्तता व्हावयाची, तर त्यांनीं आर्थिक स्वातंत्र्य मिळवलें पाहिजे ही घोषणाहि पुण्यांतच निनादली. संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन आणि संशोधन, मराठ्यांच्या इतिहासाचें संशोधन, रामायण महाभारताचें संशोधन असलीं प्रचंड कार्यें सुरूं झालीं. गणेशोत्सव, शिवजयंत्युत्सव यासारखे राष्ट्रीय उत्सव सुरूं झाले. केसरी, सुधारक, काळ यासारखीं वृत्तपत्रें निघालीं. भारतांतली पहिली औद्योगिक परिषद पुण्यांत भरली आणि स्वदेशीचा पुरस्कार सुद्धां प्रथम पुण्यांतच सुरूं झाला. वक्तृत्वोत्तेजक सभा, सार्वजनिक सभा,



अनुक्रमणिका

चित्रशाळा, भारत इतिहास संशोधक मंडळ, केसरी-मराठा संस्था, भांडारकर रिसर्च इन्स्टिटयूट, भारतसेवक समाज अशा कितीतरी संस्था स्थापन झाल्या. ज्ञानकोशाचें कार्य पुरें करण्यासाठीं डॉ. केतकरांना नागपूरहून चंबूगबाळें आवरून पुण्याकडे धांव घ्यावी लागली होती. यांतलें मर्म अत्यंत सूचक आहे. कोणतेंहि लहानमोठें समाजकार्य करण्यास पुण्याची भूमि अनुकूल होती. कारण जें पुण्यानें मानलें, तें अखिल जगतांत मानलें जाईल अशीच जणुं काय सर्वांची धारणा होती! पुण्यांत घडलेलें हें कार्य केवळ महाराष्ट्राच्या नव्हे, तर अखिल भारताच्या दृष्टीनेंहि अत्यंत महत्त्वाचें आहे.

पण एवढें प्रचंड कार्य अंवतींभंवतीं घडत होतें, म्हणून पुणेंकरांची वृत्ति आमूलाग्र बदलली असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. या नगरीचा महिमाच असा कांहीं विलक्षण आहे कीं, इथें एक लोकमान्य निर्माण होतांच, इथला प्रत्येकजण स्वतःला लोकमान्य समजूं लागतो! महाराष्ट्रांतलें सारें बुद्धिवैभव पुण्यांत एकवटलें आहें ही सर्वसामान्य पुणेंकराची समजूत—आणि तीमध्यें बरेंचसें तथ्यहि होतें!—त्यामुळें इथला प्रत्येकजण स्वतःला बृहस्पति समजतो आणि मतभेद व विरोध करण्यांत पुष्कळशी शक्ति खर्च करतो. पुण्यांतील कार्यकर्त्यांना पुण्याइतका कडवा विरोध इतरत्र कुठेंच झाला नाहीं! लोकहितवादींची चेष्टा त्यांच्या काळांत तर झालीच, पण अजूनहि त्यांच्या कार्याकडे पहाण्याची द्वेषबुद्धि निवळलेली नाहीं. महात्मा फुले यांचा त्यांच्या हयातींत छळ झालाच; पण त्यांच्या 'बहुजनसमाजा'ला अजूनहि बुधवार-चौकाची लक्ष्मणरेषा आंखून देणारे प्राध्यापक पुण्यांत आहेत! दयानंदांचें स्वागत पुणेंकरांनीं गर्दभानंदाच्या मिरवणुकीनें केलें. आगरकरांना ओंकारेश्वरावर नेऊन पोंचवलें. लो. टिळकांना ग्रामण्य प्रकरणीं तर नमवलेंच पण त्यांच्या मानपत्राला पुण्यांतच विरोध निघाला, इतकेंच नव्हे, तर याच शहरांत त्यांना अंडें मारण्यांत आलें होतें. इतिहासाचार्य राजवाडे त्यांना 'बाळू टिळक' म्हणत आणि त्यांच्या स्वराज्य संपादनाच्या कार्याला हंसत असत. "गोपाळ गोखल्याला अक्कल नव्हती; फक्त इंग्रजी काय तें बरं होतं त्याचं!" असें सांगणारे संस्कृतचे एक नामवंत प्राध्यापक कालपरवांपर्यंत पुण्यांत होते. आणि डॉ. केतकरांच्या कार्यापेक्षां त्यांच्या विक्षिप्तपणाच्या आणि खादाडपणाच्या आठवणी पुण्यांत मोठ्या चविष्टपणानें चघळल्या जातात! पुण्याची ही वृत्ति अर्वाचीन आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. शिवाजी महाराजांना राज्याभिषेकासाठीं उपाध्यायाञ्ची आयात परंप्रांतांतून करावी लागली, किंवा बाजीरावासारख्या समशेर बहाद्दराला मस्तानी प्रकरणांत पुणेकारांनीं शेणावरून ओढलें हा इतिहासहि इथें ध्यानांत ठेवावा लागतो!

भिन्नभिन्न मतप्रवाह आणि भिन्नभिन्न स्वरूपाचीं कार्यें, सर्वत्रच चालू असतात. पण त्यांना पुण्याइतकें कडवें, धारदार आणि आत्यंतिक स्वरूप कुठेंच प्राप्त होत नाहीं. या परस्परविरोधी देखाव्यांत पुणेकरांच्या बुद्धिमत्तेचा आणि चिकाटीचा जेवढा गौरव आहे, तेवढाच त्यांच्या हेकटपणाचा आणि तुच्छतावृत्तीचाहि गौरव आहे! पुण्यांत कोणत्याहि महत्त्वाच्या गोष्टीचें हंसूं होतें आणि कसल्याहि क्षुल्लक प्रश्नाला भलतेंच महत्त्व चढतें. लोकमान्यांच्या व्याख्यानाला जेवढी गर्दी जमली नसेल, तेवढी 'ब्रँडीच्या बाटली'च्या वादप्रसंगीं जमली होती. थोरल्या बाजीरावाचें सीमोल्लंघन आणि रावबाजींचा शिमगा पुण्यानें सारख्याच उत्साहानें साजरा केला. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या महान् घोषणेचा उद्गाता पुण्याचा; आणि स्वराज्यप्राप्तीनंतर राष्ट्रपित्याचा खून करणारा पुरुषहि पुण्याचाच! ज्ञानेश्वर-तुकाराम पुण्याच्या परिसरांत जन्मले आणि लावण्याछक्कडयांनाहि पुण्यांत राजमान्यता मिळाली आणि त्यांवरला कृष्णराव मराठ्यांचा उताराहि पुनः पुण्याचाच! बाजीरावाच्या उत्तर दिग्विजयाचा उत्सव जितक्या थाटामाटानें साजरा झाला असेल, तेवढ्याच थाटामाटानें नगराध्यक्षांची रेशनिंग कायद्याच्या खटल्यांतून मुक्तता झाली, त्याचा सोहळा पार पडला! सिंधुतीरावर संध्या करण्याची महत्त्वाकांक्षी कल्पना पुण्यांत निघाली आणि कमिशनर बर्व्यांचा निषेध करण्याची कृतघ्न कल्पनाहि पुण्यांतच निघूं शकली! पुण्याची ही तुच्छता

वृति इतक्या पराकोटीला पोंचलेली आहे कीं तिच्या तडाख्यांतून प्रत्यक्ष परमेश्वरसुद्धां सुटलेला नाहीं. देवालासुद्धां सरळ नांवानें हांक मारणें पुणेंकरांला साधत नाहीं. खुन्या, वाकड्या, भांग्या, मढ्या, सोट्या, पासोड्या, चिमण्या असलीं रंगेल, तामसी आणि चित्रविचित्र विशेषणें देवाच्या चरणीं वाहिलीं आहेत! पुणेंकरांच्या सहवासानें पुण्याची हवासुद्धां त्याच जातीवर जाते. गरीब आणि मध्यम वर्गीयांचें हें 'उटकमंड' कालपरवांपर्यंत प्लेग आणि हिंवतापाचें माहेरघर होतें!

पुण्याची हवा पेन्शनरांप्रमाणेंच विक्षिप्तपणालाहि मानवते. उपास करणारे, रस्ते झाडणारे, पत्रकें काढणारे, मीठलिंबापासून लंघन-एनिम्यापर्यंत आयुरारोग्य वाढवण्याचे उपाय शोधून काढणारे आणि माशी शिंकली तरी सभा भरवून व्याख्यान देणारे विक्षिप्त पुरुष पुण्यांतच फार उपजतात!

असल्या परस्परविरोधी आणि आत्यंतिक, विक्षिप्त आणि हेकट, दुराग्रही पण चिवट वृत्तीमुळें पुण्यांत मोठालीं कार्यें घडलींहि; आणि चांगल्या कल्पनांचें मातेरेंहि झालें! इथें ऐहिक सुखाकडे पाठ फिरवून निष्काम ज्ञानसाधना करणारे महापुरुष निपजले आणि तुटपुंज्या शिदोरीवर शाळाकॉलेजच्या पोरांसाठीं 'ग्रंथरचना' करून बंगले उडवणारे ज्ञानलवदुर्विदग्ध वीरहि उत्पन्न झाले. राष्ट्र उभें करण्याच्या उदात्त ध्येयानें शिक्षणसंस्था स्थापल्या गेल्या आणि झटपट विद्यालयेंहि निघालीं. एम्. ए. ची परीक्षा उतरतांच मुलगा सरकारी नोकरींत शिरून खोऱ्यानें पैसा ओढूं लागेल अशा सुखस्वप्नांत दंग असलेल्या आईला 'मी समाजसेवेला वाहून घेणार आहे' असें खडखडीतपणें बजावणारा बाणेदार पुरुष इथेंच निपजतो; आणि पदवीचें शेपूट चिकटतांच स्वार्थत्यागाचा आव आणून 'संस्थानी' राजकारणांत नाना उपद्व्यापांनीं हात ओले करून घ्यायचे हा देखावाहि आढळतो, "पुणेंकरांपुढें केवढीहि भव्य कल्पना ठेवा, ते तिचें दगडाविटांत रूपांतर करून दाखवतील" असें पुण्यांतलेच एक ज्ञानवृद्ध प्राध्यापक म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. संस्था आणि व्याख्यानांची निर्लज्ज चेष्टा पुण्याइतकी कुठेंच झाली नसेल!

पुण्यानें अटकेपार झेंडे लावले, दिल्लीपतीला कळसुत्री बाहुल्याची अवकळा आणून दिली, पण पैसा पाहिला नाहीं! पेशव्यांचीं कर्जें हा इतिहासांतला डोकेंदुखीचा भाग आहे. अर्वाचीन काळांतहि 'भारतीय अर्थ—शास्त्राचा जनक' पुण्यांतच निर्माण झाला; पण पुण्यानें तागडी संस्कृतीचा अंगीकार कधींच केला नाहीं. ज्ञानसाधना, स्वार्थत्याग आणि समाजाचें अध्वर्युपद यांची जातिवंत ब्राह्मणी परंपरा पुण्यानें मोठ्या निष्ठेनें अबाधित ठेवली; पण नंतरच्या काळांत या परंपरेंत जे घुसले, त्यांनीं कंजुष आणि कद्रूपणाचा अंगीकार केला. राजा उदार झाला, पण भिकाऱ्यानें फक्त टोपीच मागितल्याची जी कथा आहे, तसल्या हास्यास्पद गोष्टी पुण्यांत वारंवार घडत असतात. देणगी मागतांनाहि पुण्यातल्या संस्थांना कमालीचा संकोच वाटतो! आणा दोन पैसे वांचविण्यासाठीं जिमखान्याकडून फुले मार्केट-पर्यंत फेरफटका मारणारा पेन्शनर पुण्यांत नेहमीं आढळतो. पेशवे पार्कमधल्या ऐतखाऊ पशु-पक्ष्यांकडे अजून कुणाचें कसें लक्ष गेलें नाहीं आणि तिथल्या हरिणांमुळें चिवड्याची किती दिवसांची बेगमी होऊं शकेल याचें गणित



अनुक्रमणिका

कुणी कसें मांडलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें !

पुण्याच्या हवेंत खऱ्याखोट्या दारिद्र्याचा उग्र दर्प मिसळला आहे. अर्थकारणांत महत्त्वाकांक्षाच थिट्या आहेत. पै पैपासून मिळवावें आणि लाखापासून खर्च करावा या जुन्या म्हणीचा प्रथमार्ध पुण्यानें कडकडीतपणें पाळला आणि उत्तरार्ध मात्र मतलबीपणें टाकून दिला आहे ! पै पै वांचवायची आणि पेन्शनींत गेल्यावर बंगला बांधायचा ही आतां कर्तृत्वाची निशाणी होऊं लागली आहे. जेवणावळींपुढें राज्याचीसुद्धां तमा न धरण्याचा वारसा या शहराचा ! पण आतां साऱ्या आदरातिथ्याबद्दल सुद्धां तें प्रसिद्ध नाहीं ! अस्सल पुणेकरी वृत्तींत या दारिद्र्यभावनेमुळें निर्माण होणारे स्वभावदोष मिसळल्यामुळें पुण्यांतल्या संस्कृतींतहि वेगवेगळे थर उत्पन्न झाले आहेत. हवा खाण्याचा शौक करणाऱ्या परस्थांनीं वसवलेलें कोरेगांव पार्क, माजी सरकारी नोकरांनी आणि आजी स्वार्थत्यागी मंडळींनीं निर्माण केलेला डेक्कन जिमखाना आणि जुनें पुणें हे पुण्याचे तीन महत्त्वाचे भाग. कांहींच्या मतें पुण्याची सरहद्द बुधवार चौकांत संपते आणि कँप ही तर साहेबाच्या वास्तव्यामुळें निर्माण झालेली बहुरंगी, बहुढंगी, अनेक जिनशी आणि सवंगोलंकारी संस्कृति ! मोटार, बस, ऑटोरिक्षा आणि सायकल किंवा 'पैदल' असा या संस्कृतींतला वाहनभेद ध्यानांत घेतला कीं, त्यांतल्या अलिप्तपणाचें संपूर्ण चित्र उभें रहातें !



पुण्यांतली करमणूक हा तर स्वतंत्र करमणुकीचा विषय होईल. खर्च करणाऱ्या माणसाकडे इथें इतक्या चमत्कारिक नजरेनें पाहिलें जातें कीं तोहि पुण्यांत येतांच पुणेकर होऊन जातो. पुण्यानें राज्य केलें, रंगढंग केले, पण खऱ्या अर्थानें ऐश्वर्य भोगलें नाहीं. गेल्या शतकांतली शास्त्रीमंडळी रात्रीं मशाली पाजळून बावनखणींत जात किंवा क्वचित् प्रसंगीं 'माडीवर' च विद्यार्थ्यांना संथा देत असत ! पण हा उघडेवाघडेपणा पुण्यानें टाकून दिला; वैचारिक सोंवळेपणामुळें नव्हे, तर सोंवळेपणाच्या पारंपारिक कल्पनेमुळें. त्यामुळें पुण्यांतला रंगेलपणाही भूमिगत झाला आणि बाह्यतः कर्मठपणाचें बंड माजलें. बिनखर्चाच्या करमणुकी अस्तित्वांत आल्या. पांच पैशांत जिवाची मुंबई करणें हा पुण्याचा शौक ! एक पैशांत एक ध्वनिमुद्रिका ऐकण्यासारखी विचित्र करमणूक फक्त याच शहरांत आढळेल ! गुऱ्हाळाला 'रमणीय रसवंती' रेकॉर्डसच्या दुकानाला 'ललकार' अशीं नादमधुर, काव्यमय नांवें देऊन पुणेंकर आपली रसिकता दाखवतात. जोगेश्वरींतल्या रांगोळ्या पहायला हजारोंच्या संख्येनें लोटणारे आणि परप्रांतांतल्या पाहुण्यांना चुकीचे पत्ते सांगून स्वतःची करमणूक करतात. लग्न आणि मुंजी हे पुण्याचे प्रचंड धार्मिक समारंभ. एका मुहूर्तावर शेंकडेवारीनें कार्यें पार पडतात. वऱ्हाडांतली मुलगी आणि कर्नाटकांतला मुलगा, पण कार्य पुण्यांत. असा प्रकार नेहमीं आढळतो. अशा मंगलकार्यांत कांहींहि संबंध नसतांना शिरणें, पाहुणचार झोडणें आणि मिरवणुकींतल्या वाजंत्र्यांना चुकवून इकडील वरात तिकडे पांचवणें हा पुण्याच्या करमणुकींचा जगावेगळा प्रकार आहे !

मात्र दारिद्र्यामुळें पुण्याचें सौंदर्यहरण होऊं शकलें नाहीं. पै-पैसा गोळा होऊनच इथें हिमालयाएवढीं कार्यें उभीं राहिलीं. त्यांकडे दृष्टि गेली कीं माणूस आश्चर्यानें थक्क होऊन जातो. पुण्याला आज निनायकी स्थिति प्राप्त झाली आहे असें प्रत्येकजण म्हणत असतो. पण पुण्याचें हें वळण मात्र अजूनहि सुटलेलें नाहीं. आजमितीसहि पुण्याच्या रस्त्यांत एक ऐंशींच्या घरांत आलेला म्हातारा भेटतो. हवा सोसवत नाहीं, खाल्लेलें पचत नाहीं, पाय वळतात असल्या तक्रारी तो करीत नाहीं. रामायण संशोधनाचें कार्य त्यानें हातीं घेतलेलें आहे; आणि हें कार्य आपल्या हातून पुरें व्हावें यासाठीं तो म्हातारपणसुद्धां विसरून गेला आहे. आपला देश आतां स्वतंत्र झाला आहे आणि आपलें सरकार आपल्या कार्यानिमित्त लाखों रुपयांची उधळमाधळ करीत आहे हें त्याच्या खिजगणतींतहि नाहीं. दारोदार वर्गणी मागीत हिंडण्याचा त्याचा जुना खाक्या अजूनहि चालू आहे.

—या म्हाताऱ्याचें नांव श्री. आबा चांदोरकर ! पुण्यांतल्या साऱ्या वैशिष्ट्यांचें हें चालतें बोलतें प्रतीक आहे. असल्याच विक्षिप्त आणि कष्टाळु, निःस्वार्थी आणि आशावादी माणसांनीं पुण्याचें वैभव वाढवलें आहे ! आणि हीच पुण्याची खरी शोभा आहे !



# बळदंड लोकांचा देश

व्यंकटेश माडगूळकर

दक्षिण महाराष्ट्रांतल्या दक्षिण सातारा, सोलापूर या भागांत तुम्ही जाल तर तिथें पहाण्यासारखें कांहीं नाहीं. मनाला भुरळ घालणारा निसर्ग तिथें नाहीं. ऐतिहासिक आठवणींची गर्दी मनांत उसळेल असे किल्ले कोट नाहींत. तिथें पाहण्यासारखं एकच आहे आणि तीं म्हणजे तिथलीं माणसें, दक्षिण महाराष्ट्राचा विशेष अशीं बळदंड माणसें! मातीच्या रंगाचीं, दगडासारख्या कठिण अंगाचीं, घामाच्या वासानें घमघमणारीं हीं माणसें, तीं तुमच्या पांढऱ्या कपड्यांकडे पाहून बुजतील, आपणहून तुमच्याशीं बोलणार नाहींत, फार तर रामराम घालतील आणि आपल्या वाटेनं चालूं लागतील किंवा हातांतलें काम चालूं करतील. बस्! तुमचें गांव नांव, तुम्हाला मुलें किती, पगार किती ही चौकशी तीं करणार नाहींत. पण त्यांच्या शेजारी जाऊन तुम्हीहि बसाल मातींत, हंसऱ्या मुद्रेनें, 'काय पाटील?' म्हणून विचाराल तर प्रथम त्यांचा चेहरा बोलका होईल. 'हाय बरे' असा शब्द तोंडांतून बाहेर येईल. थोडी अधिक चौकशी कराल, त्यांच्या जनावरांचें, त्यांच्या पिकांचें कौतुक कराल तर तीं मोकळीं होतील. साहेब पांढरा कपडावाला असला तरी फार खळणा नाहीं असें त्यांना वाटेल. चांगली बोलाचाली होईल. आणि मग तंबाखूनें कमावलेल्या आवाजांत तो तुम्हाला एक हुमान म्हणजे उखाणा घालील.

"साहेब, तुम्ही शिकल्यालं ना?"

"हां."

"मग आमचा अडाण्याचा एक हिशेब करा."

"सांगा."

"सत्ताविसांतनं नऊ गेलं म्हंजे खालीं किती ऱ्हाल्यात?" एखादें शेंबडें पोरहि सोडवील असा हा हिशेब तुम्हांला वाटेल, कदाचित् या सोप्या हिशेबांत कांहींतरी तिढा आहे, हेंहि ध्यानीं येईल; पण तो काय असावा हें कळेलच असें नाहीं. तुम्ही गोंधळाल. एकदम उत्तर द्याल—

"सत्ताविसांतून नऊ गेले तर खालीं अठरा रहातील."

यावर हिशोब घालणारा गडगडून हंसेल आणि म्हणेल,

"साहेब, तुमी चुकलां.. अहो, सत्तावीस नक्षत्रांतलीं नऊ पडलीं तर खालीं ऱ्हायाचं काय, माती!"

गोष्ट खरी आहे! या सोप्या हिशेबाचें उत्तर कठीणच आहे. साताऱ्याच्या दक्षिण भागांत पाऊस नाहीं. असला तरी तो लहरी महमद आहे. मनाला आलें तर पडतो नाहींतर दोन दोन वर्षें कोरडीं जातात. शेतकऱ्यांची दाणादाण होते. गोरगरिबांचे हाल कुत्रा खात नाहीं.

एरवीं दंडेली करणारीं माणसें या पावसाच्या कडीं नमून असतात. तिथें सहसा पावसाला पाऊस सुद्धां कोणी म्हणत नाहीं. 'गडी' म्हणतात. पाऊस पडला नाहीं असें जेव्हां त्यांना सांगावयाचें असतें तेव्हां तीं म्हणतात, 'गड्यानें जरा ओढून धरलें आहे'. 'गड्यानें जरा डोळा वटारला आहे.' आणि सर्वांसहाणारीला कधीं पाऊस जमीन टोकीत आला तर, 'पाऊस आला' हें म्हणण्याऐवजीं तीं म्हणतात, "बरा बरा, आला हां गडी.' 'शाबास, शाबास, गड्यानं गर्दी दिली उडवून!'

या गड्यानें दक्षिण साताऱ्याचें सारें जीवन व्यापून टाकलें आहे. त्याची भेडसावणारी सावली सर्वत्र पडलेली दिसते. तिथल्या धाब्याच्या घरावर ती आहे, तिथल्या मळकट हिरव्या झाडांवर आहे. उजाड माळावर आहे, लोकांच्या तोंडावर आहे, मळक्या फाटक्या कपड्यांवर आहे. गुरांच्या अंगावर आहे. ती नाहीं असें ठिकाण नाहीं.

यामुळें हीं माणसें महत्त्वाकांक्षी नाहींत. दोन वेळां भाकरी खायला मिळाली कीं त्यांची महत्त्वाकांक्षा संपते. तिथें श्रीमंती आणि गरिबी जोंधळ्यानें मोजली जाते. 'त्या अमक्या तमक्याला काय झालें, तीन वर्षें पुरेल एवढी ज्वारी त्याला झाली आहे.' 'तो अमका तमका त्याच्यापाशीं आहे काय, खायला ज्वारी नाहीं घरीं!' असेंच लोक बोलतात. श्रीमंत होण्यासाठीं ज्वारीशिवाय आणखी काय असावें लागतें हें त्यांना माहीत नाहीं. आपलें गांव सोडून बाहेर पडावें, कांहीं कमवावें असें त्यांना वाटत नाहीं. फार झालें तर एखादा पोरगा उचल खाऊन गिरणींत काम करण्यासाठीं मुंबईला निघतो. तो निघाला म्हणजे घरांतलींच काय पण गांवांतलीं माणसेंही त्याला पोंचवण्यासाठीं गांव ओढा ओलांडून जातात. बायका गळा काढून रडतात, आणि पुरुषांचेंसुद्धां 'या पोराच्यानं आतां परदेश कसा कटेल' असें वाटून काळीज हलतें.

हीं माणसें दैववादी जरी असलीं तरी निराश नाहींत. जीवनाकडे पाठ फिरवून तीं बसत



अनुक्रमणिका



नाहींत. उलट तीं अधिक जिद्दीनें जगतात. हालांत ख्यालहि करतात. आपल्या एवढ्याशा जमिनीच्या तुकड्यांत हुरड्यासाठीं गुडदी ज्वारी टाकतात, भल्या सकाळीं आगटी पेटवून, दुधाळ हुरडा बायका व पोरांना खाऊं घालतात, आपण खातात. खिल्लारी बैलांच्या शिंगाना पितळी शेंव्या लावून आणि त्यांच्या पाठीवर रंगीत झुली घालून गाडी उडवीत जत्राखेत्रा करतात. तमाशाच्या कनातींत कनवटी सैल करतात. कुस्त्यांचा फड बघण्यासाठीं मोटेचा खोळंबा करतात. दर डोई रुपाया बळ गोळा करून लेझमीचा सराजम गांवांत ठेवतात. भजनाचा संच जमा करतात. एखादा कैकाडीबुवा गांवांत आला तर खुशाल कणग्या उपसतात आणि मग बायका जात्यावर गीत गातातः 'असा कसा ग कैकाडीबुवा, वेड लावून गेला गांवा!'

करमणुकीचा कुठलाहि प्रकार त्यांना वावडा नाहीं. त्यातल्या त्यांत करमणुकीचे मर्दानी प्रकार अधिक प्रिय. स्वभावतःच बलदंड असल्यामुळें क्रौर्याचें दर्शन होणाऱ्या खेळांत हीं माणसें अधिक रमतात. गांवांत वाघ घेऊन दरवेशी येतो. एरवीं, आठवड्याचीं अंडीं जमवून तेलमीठ आणणारा गडी पण गांवांत दरवेशी आला कीं, खुराड्यांतला तयार कोंबडा त्याला देतो आणि म्हणतो, 'खेळ झाला पाहिजे.' मग त्या दरवेशानें गांवांतल्या एखाद्या मोठ्या निंबाखालीं जायचें. निंबाच्या उंच डहाळीवर दोर फेकायचा. त्याच्या एका टोंकाला तें जिवंत कोंबडें बांधायचें आणि दुसरें टोंक गांवकऱ्यानें आपल्या हातांत धरायचें. दोन्हीकडे दोन काढण्या लावून दरवेश्यानें ढाण्या वाघ गाडींतून बाहेर काढायचा. वर टांगलेल्या कोंबड्याकडे बघून तो जिभल्या चाटतो, गुरकतो. इकडं गांवकऱ्यानें ओढून धरलेलें दोराचें टोक सैल करून कोंबडें. वाघाच्या नाकापुढें आणायचें आणि वाघानें झेप घेतली कीं दोर खालीं ओढायचा. कोंबडें बोंबलत असतें, वाघ झेपा घेत असतो आणि लोकांचें कडें खिदळत असतें. शेवटीं ओरडून ओरडून कोंबड्याचा आवाज बंद झाला आणि वाघ पिसाळून गुरकूं लागला कीं, पुनः दोर सैल करून कोंबडें त्याच्या नाकापुढें आणायचें आणि तें वाघानें झेपेसरशीं मुरगाळलें कीं, लोकांनीं 'भले शाब्बास' म्हणून आवाज द्यायचा. असा प्रकार.

ताकतवान् माणसाचे सारे गुण, सारे अवगुण या माणसापाशीं असतात. आणि ही ताकत त्याच्यापाशीं परंपरेनें आली आहे. या लोकांनीं मराठेशाहींत तरवार गाजवली आणि जमनीत [illegible] आणि गटें नाचवलीं. हरेक गांवांत पोरगा फलटणींत आहे असें अभिमानानें सांगणारीं पांचपंधरा घरें निघालीं नाहींत तर नवल. सरकारी पेनसलीवर गूळचणाती खाणारे सुभेदार, हवालदार गांवोगावीं दिसतात. रजेवर आलेल्या पोरानें दिलेला खाकी रंगाचा लोकरी गंजिफराक घालून मोट हाकणारे बाप दिसतात, आणि फलटणींत असलेल्या दादल्याचे कपडे पार्सलनें घरीं आल्यामुळें कुंकवाजागीं कपाळ गोंदणाची हिरवी टिकली राहिलेल्या जवान बायाहि दिसतात.

महत्वाकांक्षांना पारखा झालेला, हालांत ख्याल करणारा, परंपरेनें आलेली ताकत टिकवून असणारा हा दक्षिण साताऱ्यांतला माणूस भडाभडा बोलणारा नाहीं हें मी मघांच सांगितलें आहे. त्याला आपल्या भावना बोलून व्यक्त करणें जमत नाहीं. घरांत संतापला तर तो रानांत जाऊन बाभळीची गांठ कुऱ्हाडीनें चुरा

करील, खूप झालं तर तो आपल्या मळ्यांतलीं ओटाभर गाजरें खांदून आणून तुमच्या सोप्यांत मुकाट्यानें टाकून निघून जाईल. भावनांना शब्दरूप देणें त्याला जमत नाहीं. त्यासाठीं त्याला कांहीं तरी कृति करावी लागते. जड धोंडे उचलून उगींचच इकडे तिकडे टाकावे लागतात; पायांवर डोकें ठेवावें लागतें. पोरा-विषयींचा राग व्यक्त करण्यासाठीं स्वतःच्या गुरांना धोपटावें लागतें; किंवा तुमच्या विष-यींचें प्रेम व्यक्त करण्यासाठीं तुमच्या वाईटावर असलेल्या माणसाला बडवावें लागतें. आणि त्याचे हर्ष, खेद, राग, लोभ पुष्कळ वेळां परा-कोटीचे असतात. बायकोनें ताजी भाकरी करून घातली नाहीं म्हणून तो कांहीं न बोलता तिच्या डोक्यांत प्रहार घालतो आणि त्यामुळें डोकें फुटून ती मेली म्हणजे, मुकाट्यानें जाऊन पोलिस ठाण्यावर हजर होतो. त्यांच्या वैराचा शेवट बहुधा कुऱ्हाडीच्या घावानें होतो. आणि स्वतः सर्वस्वीं नागवला गेला म्हणजे आपला लोभ खरा आहे, याचें समाधान त्याला मिळतें.



हा माणूस वीस वीस मैलाची पायी रपेट करतो आणि तशी ती करण्यांत आपण कांहीं विशेष केलें आहे असें त्याला वाटत नाहीं. पाठीशीं गाठोडें टाकून तो आपला चालतो. कारण त्याला मोटारीला चार आणे देणें परवडत नाहीं. नाण्याला महाग असल्यामुळें तो तें जपतो. बंदा रुपाया तो सहसा मोडणार नाहीं. कुणी देणेकरी आला तर तो चक्क सांगेल, 'होय, तुझे दोन आणे द्यायचे आहेत; पण त्यासाठीं रुपाया मोडूं काय? सुट्टे आले म्हणजे देईन.'

वराचसा आडमापपणा असलेल्या या माणसा-पाशीं दिलहि मोठा आहे. ताकदीनें जबरदस्त असलेलीं माणसें दिलानें मोठीं असतातच कारण तोहि ताकदीचाच भाग आहे. आणि तसा हा गडी भाविकहि आहे. शनिवारीं भल्या सकाळीं आंघोळी करून तो मारुतीला कोल्यानें पाणी घालतो. शनिवार पाळतो. गळ्यांत माळ घालतो आणि 'खात' नाहीं. पंढरीची वारी धरतो. पंचपदी म्हणतो. आपल्याच देशवाला असा श्रीधरस्वामी, त्याचें कवित्व ऐकून तो डोलतो. तुकाराम, ज्ञानबाराया या संतांठायीं त्याचा भोळा भाव असतो.



सौंदर्यदृष्टीचा अभावहि त्याच्यापाशीं नाहीं. बेंदूराचा सण आला म्हणजे तो आपल्या गाई-बैलांचीं शिंगें हिंगुळानें रंगवतो. त्यांना आरशी लावलेल्या झुली घालतो. त्यांच्या कपाळावर गोंडे सोडतो, पायांत तोडे घालतो, फार काय सांगावें, त्यांच्या वेसणी सुद्धा तो रंगवतो. रंगाचें वेडच त्याला असतें. तो गेरूनें नेसतें धोतर रंगवील. शाईनें पटका रंगवील. हुरमूज कावेनें बैलगाडी रंगवील. चाबकाच्या दांड्याला हिरवा रंग देईल. कपाळाला गुलाल लावील. सौंदर्याच्या बाबतींत त्याच्याहि वर ताण त्याची बाईल करील. सुया सोसून ती आपलें गोरें अंग हिरवें गोंदून घेईल, मारवग हिरवें दिसावें म्हणून मेंढराच्या लेंड्यांनीं वर सारवील. शाडूनें सारवलेल्या घराच्या भिंतीवर कावेनें पंजे उठवील. बांगडीच्या फुटक्या कांचा बसवून भिंतींत चंद्रसूर्य काढील. जमिनींत धामुके, चिनी मातीच्या भांड्याचे तुकडे बसवून पानें फुलें काढील. रंगीबेरंगी बांगड्यांच्या कांचा समईच्या ज्योतीवर वाकवून गुंफलेलीं तोरणें चौकटीला लावील. घरांतलीं पितळी भांडीं रोजच्या रोज लखलखीत करून त्यांची सुरेख मांडणी करील. नक्षीदार मडक्यांच्या झकास उतरंडी रचील. शेरडीच्या गळ्यांत हुंडमण्यांच्या, कवड्यांच्या माळा घालील. कोंबड्यांच्या पायांत पैंजण घालील. जुन्या लुगड्याचे रंगीबेरंगी तुकडे लावून वाकळा शिवील. छे, या बाबतींत ती आपल्या भरताराला फार उजवी असते!

दक्षिण साताऱ्याच्या भागांत माणसाखेरीज प्राण्यांसारखें कांहीं नाहीं असें मी म्हटलें, पण तें तितकेंसें खरें नाहीं. तिथलीं खिल्लारीं जनावरें कशीं देखणीं आहेत. वाटेंत जर एक खिल्लारी खोंड आणि एक देखणी बाई चालली असली तर बाईकडे न बघतां तुम्ही खोंडाकडे बघत रहाल! खरसुंडी गांवाला नाथाची जत्रा असते तेव्हां असलीं हजारों जनावरें बाजारांत येतात. बघणा-राची नजर दिपते. तुम्ही धन्यापाशीं जाऊन सहज चोकशी करा,

"काय सांगितलं खोंडाचं?"

तो मळमळी सदरा आणि भोसला पटका गुंडाळलेला धनी म्हणेल,

"रुपये बारासें."



तुम्ही म्हणाल,

"कांहीं बाबची व्याजवी भाषा बोला."

"बोला तुम्हीच."

"रुपये सातसें देतों."

यावर तो पड्डा गुर्मीत म्हणेल,

"मेंढ बकासं वेऊन खावा याव त्याचं. सातसें रुपये तिकडे पडतं असला खोंडें बघायला!"

जशीं खोंडें तशाच त्यांच्या आया. एक गाय पाळून तिनें दिलेल्या खोंडावर कित्येक जण माड्या बांधतात. आणि कृष्णाकांठचीं बकरें? त्यांच्यावरच मांड ठोकून मराठ्यांनीं अटकेपार झेंडे लावले. मेंढरांचे कळप बघाल तर तुमचे डोळे निवतील. या मेंढरांची लोकर काढून विणलेली घोंगडी पांघरा, ऐन आषाढाचा पाऊस अंगावर घ्या. पाण्याचा थेंब नाहीं अंगाला लागायचा! आणि या मेंढरांच्या धन्यानीं तोंडची भाकरी घालून पाळलेलीं धनगरी कुत्रीं, तुमच्या जर्मन शेपर्ड डॉगच्या तोंडांत मारतील!

दक्षिण साताऱ्याकडून तुम्ही उत्तर साताऱ्यांत आला तर फारसा फरक जाणवणार नाहीं. धान्या-ऐवजीं तिथें तुम्हाला कौलावर बसावें लागेल कारण तिथें पाऊस जरा कमी डोळे वटारतो.



अनुक्रमणिका

ज्वारी बाजरीच्या पिकापेक्षा तिकडे हळद भुई-मुगावर जोर जास्ती. कुऱ्हाडी नेहमीं शेंदट-लेल्या. गुन्हेगारीचें पीक जपानी भातशेती-पेक्षां जास्ती. रामोशी मांग ही अस्सल गुन्हेगार जात दक्षिण महाराष्ट्राच्या दऱ्यांखोऱ्यां-तच पैदा झालेली; पण इथें इतरांपुढें ती जातहि फिकी पडली. घराण्याचा वेडा अभिमान, नीति अनीतिच्या कडक कल्पना, शिक्षणाचा अभाव यामुळें पिवळ्या वर्तमानपत्रांना सनसनाटी बातम्या इथून ढिगांनीं पुरवल्या जातात.

रामदासी संप्रदायीचें मुख्य पीठ सज्जनगड साताऱ्यांतच आहे. कऱ्हाडला कृष्णा कोयनांचा संगम आहे. 'कऱ्हाड नगरी, कृष्णा हो तीरीं, सखू सून भाग्याची खरी' ती संत सखू इथलीच.

पूर्वी दक्षिण महाराष्ट्राकडे पाहातांना संस्था-नांचा पिवळा रंग डोळ्यांत अधिक भरत असे. औंध, सांगली, मिरज हीं ब्राह्मणी संस्थानें आणि कोल्हापूर, फलटण, जतसारखीं मराठा संस्थानें. औंधकरांनीं व्यायाम, शिक्षण स्वदेशीचा प्रचार हिरहिरीनें केला. संस्थानच्या आधारानें कलावंत उभे राहिले. ही गोष्ट सर्वच संस्थानांच्या बाबतींत आहे. 'रामपंचायतन' रंगविणारा मित्रा सुतार औंधकरांनीं 'रोज पांच रुपये आणि तूप साखर चपाती हा शिधा' देऊन ठेवून घेतला होता. भरमाप्पा कोष्टयाळकर, चिमणाजी पाथरवट असले मूर्तिकार तिथें होते. चितान्यांचें तर एक घराणेंच औंधाला आहे. त्यांचें आडनांवच चितारी! बंडोबा चितारी हा गोल सदरा घालणारा माणूस त्या काळीं मुद्दाम कॅमेरा चालवायला शिकला होता. बाळासाहेब पंत महाबळेश्वरीं गेले कीं तो त्या प्रवासाची फिल्म तयार करीत असे.

दाजी गुरवासारखा मृदंगिया, अंतुबुवा जोशी, कल्लुबुवा जोशी सारखे गवई औंधमध्यें झाले. सातवळेकरांचा 'पुरुषार्थ' तिथेंच जन्मला.

''वसवली सांगली, चिंतामण रायें चांगली' असें प्रभाकरानें सांगलीविषयीं म्हटलें आहे. पटवर्धनांचा मूळ पुरुष हरभट, याचा नातू पांडुरंग गोविंद. या पांडुरंग गोविंदाचा धाकटा मुलगा म्हणजेच हा चिंतामणराव. ब्रिटि-शांच्या छत्राखालीं त्यानें सांगली संस्थानचा कारभार १८१८ पासून १८५१ पर्यंत चालविला. हल्लीं सांगली ही हळद मिरचीची बाजारपेठ आहे आणि तिथें विलिंग्डन कॉलेज आहे. कांहीं चांगले पहिलवानहि आहेत.

यानंतर मिरज (धाकटी पाती आणि मोठी पाती), मालोजीराव नाईक निंबाळकरांचें फलटण, जत असें करीत सातारा सोडून कोल्हापूरकडे आलें कीं, थोडका बदल दिसतो. साताऱ्याच्या माणसांना मातीचा, घामाचा वास आहे, इकडच्या माणसांना तमाखूचा आणि गुळाचा वास आहे. साताऱ्यांत असलेला ब्राह्मण—ब्राह्मणेतर वाद इकडे जास्ती तिखट होतो. ब्राह्मणी संस्थानिकांचा दबदबा या मराठी राज्यांत नाहींसा होतो आणि 'बामन' ही शिवी होते. गुळाच्या ढेपी व्यापाऱ्यांना घालण्यापुरता का होईना पण शहराशीं संबंध असल्यामुळें



+ = प्रतिस्पर्धी

कपड्यालत्त्यांत, बोलण्याचालण्यांत नाहीं म्हटलें तरी शहरी साफसफाई डोकावते. भाषेंत कानडी हेल येतात. ज्वारीची भाकरी आणि मिरची ह्या सातारी आहाराची जागा इथें भात आणि मटण घेतें. पंढरीची माळ इकडे दिसत नाहीं त्यामुळें लोक सरास 'मांस' खात असतात. साताऱ्याच्या माणसापेक्षां कोल्हापुरी माणूस जास्ती गुलछबू आहे. बाबा ठेवणें आणि 'दारवा' पिणें हा प्रकार इकडे थोडा अधिक आहे.

वाड्यावरचें (म्हणजे राजवाड्यावरचें) रहाणें पाहिल्यामुळें इकडची बरीच मंडळी तंग सुरवारी आणि बाहेर खिसे असलेले शिकारी कोट घालतांना दिसतात. वेड्या-वांकड्या मुंडाशाऐवजीं त्यांच्या डोक्यावर कोल्हापुरी फेटा दिसूं लागतो. अंगांत सा रे ग म प ध नि सा अशीं बटणें लावलेले लांब कोट दिसूं लागतात. संस्थानी वातावरणामुळें बरेच वाद त्यांना माहीत असतात. त्याच्या बोलण्यांत 'आकणी पुलावा,', 'शिक्कार', 'विंचेस्टर रायफल' असले शब्द वारंवार येतात.

'ज्याच्या मनगटांत नेट असेल त्यानें रेटावें' हा न्याय कोल्हापुरी माणसालाहि माहीत आहे. दक्षिण महाराष्ट्राच्या माणसाचा बलंदडपणा हा तिथेंहि दिसतोच. साताऱ्याच्या माणसाला जशी सुरवातीला शिवी घातली नाहीं तर वाक्याला जोर आला नाहीं असें वाटतें तसें इथल्या माणसालाहि वाटते. सातारी माणूस 'बाईला' म्हणतो तर हा 'आईला' किंवा 'रांडच्या' म्हणतो इतकेंच. प्रतिस्पर्ध्याला हीन लेखायचें तर सातारी माणूस जसा त्याला नपुंसकलिंगी संबोधतो तसा कोल्हापुरी माणूस त्याची 'पायतणासकट किंमत' विचारतो! सातारी 'भड्व्या'चें इथें 'भाड्या' होतें. बाकी माणूस तोच.

सातारी रताळें, सातारी जर्दा सातारी कंदी पेढे जसे प्रसिद्ध आहेत तसा कोल्हापुरी फेटा, कोल्हापुरी पायताण आणि कोल्हापुरी विनोद प्रसिद्ध आहे. कोल्हापुरी विनोदाचा हा मासला पाहा,

(१) "आनी रं?"
"आनी गेली तानीकडं!"
(२) कुटं रं?"
"हं, हुटं रिसाल्यांत."
(३) पायताण रं?"
"पाय ताणायला सवड न्हाई."
(४) काय राव?"
"कौराव का पांडाव?"

उदाहरणें देऊन स्पष्ट केल्यावर कोल्हापुरी विनोदाविषयीं आणखी कांहीं लिहायला पाहिजे असें मला वाटत नाहीं.

'कोल्हापूर हे कलेचें माहेरघर आहे. आणि हाही महिमा संस्थानी राजवटीचाच. गल्लोगल्लीं इथें चित्रकार आहेत.

चित्रपट व्यवसाय हा नाशिकला जन्मला पण वाढला कोल्हापुरांतच. सिनेमा धंद्यांत जेवढे पोस्टर पेंटर्स आहेत त्यांतले शेकडा ऐंशी कोल्हापूरांतले निघतील!

असें हें कोल्हापूर.

—आणि असा हा बलदंड लोकांचा देश, दक्षिण महाराष्ट्र!



अनुक्रमणिका



# हवा थंड आहे तया बेळगांवीं वर्षें बहू त्वां सर्वें बाळगावीं

पु. ल. देशपांडे

हवा थंड आहे तया बेळगांवीं
वर्षें बहू त्वां सर्वे बाळगावीं ॥

बालपणीं भूगोलाच्या मास्तरांचा एक आवडता प्रश्न असे—'काय? कोठें? कशाविषयीं प्रसिद्ध?'—आणि मग डार्डानेल्स–जिब्राल्टर—ब्रिस्टॉल वगैरे नामावळी कोष्टकवार भरावी लागत असे. बेळगांवच्या बाबतींत काय?—कोठें? व कशाविषयीं प्रसिद्ध याचें उत्तर कुठल्याहि एका चौकटींत बसवणें अवघड आहे. मराठी संस्कृतीचें बेळगांवी स्वरूप अत्यंत विलोभनीय आहे. मराठी इतकी सुंदर दिसतांना इतरत्र क्वचितच आढळेल. ती इथें गोमंतकीय रसिकतेचें लेणें ल्याली आहे. तिच्या बोलण्यांत कानडी स्वरांचा लाडिक हेल्काबा आहे. तिनें कोंकणी कष्टाळूपणा घेतला आहे (खंवटपणा टाकला आहे!) –देशावरच्या मराठ्यांचा 'हुंबपणा' टाकून दिलदारी स्वीकारली आहे. लिंगायत व्यापाऱ्यांच्या जोडीला बाजारपेठेंत मराठी अंगडीहि आहेत. वर्षानुवर्षें मराठा लाइट इन्फंट्रीचा प्रमुख तळ असल्यामुळें अनेक इंग्रजी अंमलदार दरकदारांच्याप्रमाणें पाद्री आणि मिसीबाबा संस्कृतीच्या सहवासांत बेळगांवच्या ह्या संस्कृतींत पाश्चात्य संस्कृतीनेंहि 'सेंट' मिसळलें आहे. स्वातंत्र्याची पहांट फुटण्यापूर्वी क्यांपांतल्या ग्लोब सिनेमांत सोजिरांच्या समवेत चित्रपट पहाणाऱ्या (?) अर्धांग्ल युवतींप्रमाणें मधून मधून सराफ-कत्ते-बिच्चू-किणूर-बेलंगी असल्या शहापुरी आडनांवाच्या तरुणी माफक धिटाईनें आपल्या 'मूंबय'च्या 'कझिन्' बरोबर त्या थिएटरांतल्या 'बार' मधील (आतां कै.)–पेयाचा अस्वाद घेतांना आढळणें दुर्मिळ नव्हतें. किंबहुना कॉन्व्हेंट्स व पाद्रीबाबांनीं चालवलेल्या शाळांत शिकून सफाईनें इंग्रजी बोलणाऱ्या मराठी मुलींची संख्या पुण्यापेक्षां बेळगांवांत अधिक आढळेल!

विविध संस्कृतींच्या ह्या मनोहर मिलाफांत ठसठशीत रंग मात्र मराठी संस्कृतीचा. गांवाची ठेवणच अस्सल मऱ्हाटी आहे. सूळदाळ, सुळेभावी असल्या भयंकर नांवांचीं स्टेशनें ओलांडून गाडी जेव्हां बेळगांव स्टेशनांत शिरूं लागते तेव्हां प्रथम दर्शन होतें तें बेळगांवच्या किल्ल्याचें. बेळगांव शहरानें दगडी चिलखत घातल्यासारखा हा किल्ला उभा आहे. सर्व किल्ल्यांच्या इतिहासाप्रमाणें हस्तें परहस्तें तो किल्ला शेवटीं मराठ्यांच्या ताब्यांत आला. सध्यां किल्ल्यांत रेखीव रस्ते—उपवनें आणि बड्या हुद्देदारांचे बंगले आणि कचेऱ्या आहेत.

बेळगांव स्टेशनांत उतरल्याबरोबर काळेनिळे सूट घालून हातांत बास्केटें किंवा व्हायोलिनचीं खोकीं घेतलेले गोंयकार किरिस्तांव आणि फुलाफुलांच्या छापील कापडाचे झगे घातलेल्या आंजेला आणि माटिल्डा ह्या त्यांच्या पोशाखामुळें डोळ्यांत भरतात आणि बोटांच्यांतील 'सुकटा'च्या दर्पामुळें नाकांत भरतात. तेवढ्यांत टळकवाडीहून मुंबईच्या पाहुण्यांना उतरून घ्यायला आलेल्या अप्सरावत् युवती पोशाखापेक्षांहि बांध्याच्या ठसठशीतपणानें अधिक लक्ष वेधून घेतात. ह्याच गर्दींत चौकड्यांचा रुमाल, भिकबाळी, भस्म, शिल्कशर्ट—त्यांतून दृश्यमान होणारी चांदीची लिंग–पेटी, [illegible]च्या ब्राऊन रंगाचा कोट, गुबगुबीत काळ्या बोटां[illegible] सोन्याचे सल्ले, मातट रंगाचें धोतर आणि टणटणीत पायताणें अशा थाटांत एका हातांत पत्र्याची ट्रंक आणि—'हें आमचं आई हो–म्हातारं शिंचं–वाट चुकतं कीं काय बगा' म्हणत दुसऱ्या हातांत आपल्या म्हाताऱ्या 'अव्वा'चा हात धरून ब्याळगांवला आलेले एखादे बसाप्पा दोड्डुणवारहि आढळतील. शिवाय [illegible]–लोणावळ्या स्टेशनवर नेहमीं आढळतात तशीं पारशी कुटुंबेंहि–एक म्हातारी–तीन मुली–एक तरुण आणि एक डोळे-कान-नाक किंवा किमानपक्षीं ह्यांतील एक तरी अवयव उडवणारा [illegible] मिचकावणारा 'बावा' एवढें 'युनिट' घेऊन मुंबईच्या कॉलेजांतून सुटींत आलेल्या आपल्या [illegible]कसचं नाहींतर शिरीनचं स्टेशनांत वात्सल्यभरानें स्वागत करतांना आढळतील. त्याच गर्दींत पांचसात सुभेदार मेजर–एखादा कर्नल आणि नव्या रंगरूटांची एखादी तुकडीहि दिसते. डोळ्यांना हीं विविध दृश्यें दिसत असतांना कानांवर '[illegible] डब्यांत बसलसंय रे मेल्या–' हा मालवणी तुकडा पडेल—'एन हेळ–निष्कारण गडबड याक् माडती



रे ?' असा मराठी गंगडेपणा त्यालेली कानडी दटावणी ऐकायला मिळेल—आणि भाग्य जोरदार असेल तर शहापूरच्या मुलींचं कमालीचं गोड मराठी ऐकण्याचाहि योग येईल. त्या गोडव्याला उपमा द्यायचीच तर ती शहापुरी कडबोळ्यांची —पण कडबोळें देखील शहापुरी मराठींत 'कोडबोळें' होऊन अधिक लडिवाळ बनून येतें.

बेळगांव शहराची रचना तर अतिशय मोहक आहे. निसर्ग ह्या शहरावर प्रसन्न आहे. महाराष्ट्र म्हणजे झाडी-मंडळ हें विधान मान्य करायचें असेल तर बेळगांवासारखें झाडीमंडळांच्या कोंदणांत वसलेलें गांव दाखवणें मुष्किल होईल. वस्तीचे विभाग अगदीं ठळक—जुनें बेळगांव आणि तिथल्या चोगार वेस—काकती वेस; गोवा वेस वगैरे—गोमांतकांतून येणाऱ्यांच्या—आणि कोल्हापूर निपाणीकडून येणाऱ्यांच्या स्वागताच्या वेशी. पलीकडे सांगलीकर पटवर्धनांचें 'शहापूर'—वास्तविक एका रेल्वे-लाइननें हें गांव बेळगांवापासून निराळें केलें. परंतु परवां विलीन होईपर्यंत बेळगांवच्या उपनगरासारख्या ह्या शहरांत स्वतंत्र संस्थानी राजवट होती. शहापूर हें व्यापारी गांव—सराफ मंडळींची पेठ मोठी. त्याचबरोबर कोष्ट्यांची, विणकरांची वस्तीहि दाट! शहापुरी लुगड्यांची ख्याति थोर, परंतु शहापुरांतल्या असंख्य गल्ल्यांतून कोष्ट्यांबरोबरच शिंपकरांची आणि सुवर्णकारांचीहि अनेक गुणी कुटुंबें नांदलीं. व्यापाऱ्यांनीं इमानी व्यापाराबरोबर गोव्याशीं संधान बांधून चोरट्या आयातीवरहि बरकत केली. सावकार मंडळी हे शहापूरचीच—शाकाहारी सारस्वत कुटुंबं ही शहापूरचीं—जातीची 'खासियत'. वैष्णव संप्रदायिक सारस्वतांनीं बडोद्याप्रमाणें शहापुरांतहि गोपीचंदन महाग केलें—आणि कर्नाटकी वैष्णवांचा कडवेपणा न घेतां भाविकतेचा मात्र स्वीकार केला. अजूनहि पर्तगाळ—चित्रापूर मठांचे शंकराचार्य ह्या मंडळींकडून निर्धास्त पाद्यपूजा करून घेतात. शहापूरकर मंडळींच्या श्रीमंत मंडळींनीं टळकवाडी वसवली आणि बेळगांवांत प्रॅक्टिस करणाऱ्या डॉक्टरवकिलांनीं त्याला साथ दिली. टळकवाडी नांवाविषयीं विद्वानांत दुमत आहे. कांहींचें म्हणणें प्राचीन काळीं गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं गंगाधरराव देशपांड्यांनीं ज्यावेळीं गांवांत कॉंग्रेस आणलें तेव्हां टळकवाडीचें नांव टिळकवाडी होतें. परंतु इंग्रज सरकार त्या नांवाखालीं वस्ती करूं देणार नाहीं म्हणून कुण्या धूर्त अधिकाऱ्यानें प्लाट पाडतांना टिळकवाडीची टळकवाडी केली.




टळकवाडी हेंच नांव रूढ झालें आणि 'कॉंग्रेसची विहीर' तेवढी राहिली. कॉंग्रेसची विहीर, टेक्निकल इन्स्टिट्यूट, राणी पार्वतीदेवी कॉलेज, ला कॉलेज—आणि कॉंग्रेस रस्त्यावरून संध्याकाळीं फिरायला जाणें हीं टळकवाडीचीं वैशिष्ट्यें आहेत. वर उल्लेखिलेल्या संस्थांचा, घरांचे पत्ते मागतांनाहि फार उपयोग होतो. टळकवाडी संस्कृतींत जिमखाना संस्कृतीचं व धंतोली संस्कृतीचें मिश्रण आहे. परंतु बैठक बेळगांवी आहे त्यामुळें तिथल्या डौलाला पक्क्या वास्तूंचा आधार आहे टळकवाडीपलीकडे वडगांव ही कुरुंदवाडकरांची धाकटी पाती. पटवर्धनांचें हें चिमुकलें संस्थान आहे—त्यांत पुन्हां दोन तीन वाटण्या आहेत. त्यामुळें इथले राजे आळीपाळीनें गादीवर बसत. विलीनीकरणानंतर त्या चिमुकल्या गादीची गादी, उशी आणि चादर अशी वांटणी झाल्याचें ऐकिवांत आहे.

टळकवाडीवरून कॉंग्रेसरस्त्यानें शहराच्या दिशेला येऊं लागलें कीं डाव्या बाजूला 'कॅम्प' विभाग लागतो. इथें वाटेंत सैनिकांनीं बांधलेलें शंकराचें मंदिर आहें. तरुणतरुणींच्या फिरण्याच्या कार्यक्रमांतला हा एक टप्पा! वृद्ध मंडळी थोडी अधिक चालून येतात. कारण चालणें हें त्यांचें साध्य आणि साधन असतें. कॉंग्रेसरस्त्यानें हिंडणाऱ्या तरुणांचें साधन चालणें असलें तरी साध्य निराळें असतें.

खुद्द बेळगांव शहर हें बाजारपेठेमुळें आणि गल्ल्यांमुळें प्रसिद्ध! बेळगांव शहरांत तसें इतिहास-प्रसिद्ध असें कांहीं विशेष नाहीं. प्रेक्षणीय स्थळांत फार तर 'बारा गडगड्याची विहीर' घालतां येईल. परंतु बेळगांवचें नांव हिंदुस्थानच्या नकाशावर गाजवलें गंगाधरराव देशपांड्यांनीं! गंगाधररावांनीं टिळकांचा संदेश बेळगांवांतून साऱ्या कर्नाटकाला आपल्या व्याघ्रवाणीनें ऐकविला. बेळगांवांतल्या साहित्य-संगीत-कलांची वृद्धि इथल्या डॉक्टर मंडळींच्या हातांत आहे. गांवाची हवा उत्तम असल्यामुळें बेळगांवांतल्या डॉक्टर लोकांना फुरसद असावी!

बेळगांव शहरांत वावर मराठी भाषेचाच आहे. बरेच व्यापारी कानडी आहेत परंतु दुकानाच्या पाट्या मराठींत आहेत. किंबहुना अधूनमधून येणाऱ्या कानडी नाटक-कंपन्या आपल्या नाटकांची जाहिरात मराठींतून करतात. गांवांत म्युनिसिपालिटी असूनहि गांव स्वच्छ आहे. ड्रेनेज नसल्यामुळें ती सफाई बहुधा डुकरांकरवीं होते. गल्ल्यांचीं नांवें मजेदार आहेत. आणि तीं तशींच ठेवलीं आहेत. गांधळी गल्लीला नेहरू रोड वगैरे नांवें दिलीं नाहींत. वसवण गल्ली—समादेवी गल्ली—रामदेव गल्ली—कंबळ गल्ली वगैरे ठोक नांवें चालू आहेत.

गाण्याचा षोक मगळ्या गांवाला आहे. इथें माप मोजून पडतें. मोगूबाई, मेनकाबाई शिरोडकर वगैरे गायिका पूर्वी बेळगांवच्या होत्या म्हणतात. शिवरामबुवा वझे—वेंकटेशबुवा कागलकर, विठ्ठलराव कोरगांवकर वगैरे मंडळींनीं लोकांचे कान तयार केले आहेत.

त्याशिवाय स्त्रीपुरुषांचीं संमिश्र नाटकें बेळगांवांत नेहमीं होतात—थोडक्यांत म्हणजे पुण्याला होणाऱ्या सर्व सांस्कृतिक आणि अन्य चळवळी येथें होतात. ह्या संस्थांखेरीज आंतरराष्ट्रीय पातळीवर रहाणाऱ्या मेसॉनिक् लॉज्, थिऑसॉफिकल लॉज—रोटरी क्लब ह्याहि संस्था ह्या गांवांत 'मौजूद' आहेत. हिंडलग्याचा तुरुंगही आहे.

त्याशिवाय इथें रेसकोर्स आहे. परंतु तिथें शेवटला घोडा केव्हां पळाला हें निश्चित सांगणारीं मनुष्यें आढळत नाहींत. हल्लीं पोटाचे व्यायाम घेणारी मंडळी तिथें पळायला येतात.

परंतु बेळगांव म्हटल्यावर कानडी-मराठी वाद, गंगाधरराव देशपांडे, लोणीतूप यांच्याहि आधीं जर काय आठवत असेल तर ती थंड हवा!! दुर्दैवानें पाण्याची टंचाई आहे. त्यामुळें उन्हाळ्यांत ह्यापेक्षां चांगलें असें एकदम म्हणणें अवघड जातें. परंतु चार पाऊस झाले कीं पुढल्या टंचाईपर्यंत बेळगांवची हवा स्वर्गीय असते. पावसाळ्यांत गारठा अधिक असतो. परंतु दसऱ्यापासून त्या हवेला उन्माद चढतो. मग हें प्राचीन वेणुग्राम फुलतें.





# त्या निजल्या ना तशाच घाटाखालीं कोंकणच्या चवदा ताकी

**मंगेश पाडगांवकर**

सावंतवाडी, वेंगुर्लें, कुडाळ, शिरोडें, मालवण...कोंकणचा हा बहुतेक भाग मीं याचि डोळां पाहिलेला आहे—दर दहा मैलांवर भाषा बदलते असें म्हणतात. पण हा बदल ढोबळ नसतो. तो इतका सूक्ष्म असतो कीं जाणकारहि सावध नसेल, तर त्याच्या नजरेंतून सुटावा. सावंतवाडी वेंगुर्ल्यांचा माणूस 'खंय गेलय रे?' असें विचारील तर मालवणचा 'खंय गेल्लस रे' असा प्रश्न करील. शब्दोच्चारांतले हेलहि इथें कमी, तिथें थोडे अधिक असें जाणवेल. 'करूंचा आसा झाल्या कर' असें शेणवी म्हणेल, तर 'करांचा आसल्यार कर' असें वाक्य बारदेसकर उच्चारील. पण हा फरक जो तरबेज माणूस असेल त्यालाच जाणवेल. अन्यथा वाडीपासून आजगांवपर्यंत—त्याहिपुढें मांजऱ्यापर्यंत भाषा एकच. घार कितीहि उंच उडाली तरी तिच्या नजरेंतून भक्ष्य सुटणें कठीण त्याचप्रमाणें इथल्या माणसांच्या उच्चारांतून बारीकसाहि अनुस्वार सुटणें कठिण. जेवण्यांतून मासळी आणि बोलण्यांतून अनुस्वार सोडून देणें अस्सल कोंकणी माणसाला जमायचें नाहीं. नव्या पिढींत नऊवारी पातळाची जागा पांचवारीनें घेतली आहे. फेटे गेले, पागोटींहि जात चाललीं—तबल्यावरच्या वाटोळ्या काळ्या शाईप्रमाणें डोक्याच्या मध्यभागीं असलेला केसांचा वाटोळा घेर आणि त्यावरून रुबाबदारपणें रुळणारी शेंडी जाऊन तिच्या जागीं उग्र तेलाच्या सुगंधानें घमघमणारा तिरपा भांग आला आहे! तात्पर्य, संस्कृतीचें वाटोळें वळण जाऊन त्याजागीं तिरपें वळण आतां रूढ झालें आहे! हें सोडलें तर, या प्रदेशांतल्या निसर्गाप्रमाणेंच आचारविचार, भाषा, पोषाख, जाती, धर्म कर्मकांड या सर्वांत सारखेपणा आहे. थोडासा एकसुरी सारखेपणा आहे असें म्हटलें तरी चालेल. 'डाळीचा सांबारां' सावंतवाडीचें असो किंवा शिरोड्याचें असो, त्याच्या करण्याच्या पद्धतींत किंवा रुचींत थोडासुद्धां फरक जाणवायचा नाहीं.

डाळीच्या सांबाऱ्याप्रमाणें किंवा बांगड्याच्या कुसविरीप्रमाणें या सर्व पट्ट्यांतली संस्कृति बरोबरशी एकसारखी आहे असें म्हणावेसें वाटतें! इथला एखादा विभाग जरी डोळ्यांपुढें ठेवला तरी, तो या सर्व पट्ट्याच्या दृष्टीनें प्रातिनिधिक ठरावा.

मूठभर जोंधळे हातांत घेऊन ते कोंबड्यांच्या पुढें भिरकवावे त्याप्रमाणें इथलीं घरें भिरकवल्यासारखीं वाटतात. पांचसहा घरें जवळ जवळ कां आणि एकाद दुसरें त्यांच्यापासून असें दूर फेकलेलें कां याचा उत्तर एकच आणि तें म्हणजे योगायोग. नाहीं म्हणायला एक सूत्र या सर्वांतून जाणीवपूर्वक गुंफलेलें आहे : आणि तें म्हणजे, ब्रामणांच्या घरांच्या पुंजक्यांत किरिस्तांवाचें किंवा कुळवाड्याचें घर घुसून उभें राहिलेलें आढळणार नाहीं. गावीत लोकांचा प्रश्नच नाहीं. त्यांचा गावीतवाडा निराळाच असायचा. सगळ्या गांवांत मुसलमानांचीं पांचसात घरें असायचीं—पण स्वाभाविकच त्यांच्या घरांचा पुंजकाहि वेगळाच पडायचा. आजूबाजूला अर्थातच मालवणी भाषा; पण इथें पिढ्यान्‌पिढ्या स्थायिक झालेल्या यवनबंधूंना मात्र अभिमान उर्दूचा! या उर्दूचें नांव उर्दू, पण घडण—तिचा आत्मा मात्र अस्सल मालवणी. एक मुसल्मान दुसऱ्या मुसल्मानाला विचारील : "फजरकू उठ्या तो पायान् चलून सावंतवाडीक कब पोचेगा रे?" आणि दुसरा उत्तर देईल : "हॅं! मियां एकदां गेलंय होता तो सवेरेकू अगदीं फाटफटेक पोच्या" अशा तऱ्हेनें आपलें भाषिक वैशिष्ट्य या घरांनीं जोपसण्याचा प्रयत्न केलेला आढळून येईल. मालवणी भाषेचे शब्द आणि हेल घालून त्यांनीं उर्दूला समृद्ध वेगळेंपण प्राप्त करून दिलें आहे!

जातिधर्माच्या नांवाखालीं कधीं दंगेधोपे झाल्याचें ऐकिवांत नाहीं. गांवावर कसलेंहि संकट आलें कीं सगळे भेद क्षणभर विसरून माणसें एकत्र येतात. खंड्या [illegible]कराच्या घराची शाकारणी असली कीं पिंपळामागच्या घरांतला पावलू आणि फ्रान्सिस त्याच्या घरावर [illegible]रून कौलें लावतांना हटकून दृष्टीस पडावयाचे. इथें [illegible] तीव्र आहेत; पण जातिवैर नाहीं.

घर या वस्तूची इथली व्याख्या अगदीं सोपी, सरळ आहे. चार भिंती, वर लाल नळ्यांचें छप्पर, एकादी खिडकी, इतकें असलें म्हणजे पुरे! एवढी सामग्री उपयुक्ततेच्या सर्व सीमा सांभाळते. मातीच्या भिंती बांधणें ज्यांच्या उत्पन्नांत बसत नाहीं ते सुकलेल्या झावळ्यांच्या भिंती उभारतात. पावसाळ्यांत थोडा त्रास होतो; पण माणूस आहे तिथें दुःख आहे, त्रास आहे. हें दुःख सोसलें पाहिजे हें इतक्या स्वाभाविकपणें इथल्या माणसांना कळलेलें असतें कीं ते श्वासोच्छ्वास करण्या इतक्याच सहजतेनें तें सोसतात.

लाल चिरेबंदी घर हें प्रादेशिक [illegible]यांत मोठें खुलून दिसतें. फड्‌दिशीं त्यामुळें प्रादेशिक वातावरण तय्यार होतें! पण प्रत्यक्ष या भूमीवर मात्र मातीच्या खडबडीत भिंतींचीं घरें दिसतात. लाल चिरेबंदी घर असण्याचा मान एकाद्या गब्बर वकिलाचा, जमीनदाराचा, नाहींतर इन्फ्लुएंजावर मलेरियाचें औषध ठोकून देऊन रोगी चक्क बरे करणाऱ्या डॉक्टरचा.



खिडक्या या हवा येण्यासाठीं असतात हें तात्त्विक दृष्ट्या अजून इथें मान्य [illegible] नाहीं! सहसा मोठी खिडकी ही चुलीच्या डोक्यावरच असायाची. धूर बाहेर नेणें हें तिचें काम. प्रकाश येण्यासाठीं कौलांचा भांग मध्येंच विस्कटून तिथें एक कांचेचा चौकोनी तुकडा बसवलेला असतो. घरांचे दरवाजे माणसांत नम्रता शिकवणारे. वांकून चाललें नाहीं, तर डोक्याला टेंगूळ हें ठरलेलें. बरें, डोक्याचें टेंगूळ चुकवलें तरी उंबरठ्यांची उंची ही उपेक्षणीय असें मानण्याची सवय ज्यांच्या पायांना जडलेली आहे

ते टेंच लागल्याशिवाय पुढें जाणेंच शक्य नाहीं. घरासमोर तुळस, आजूबाजूला माड, एकादें फणसाचें झाड असा एकूण परिसर.

या घरांचे दरवाजे टेंगणे असले तरी या घरांच्या आतिथ्याला मात्र बुटकेंपण अजूनहि आलेलें नाहीं. दोन युद्धें आलीं गेलीं आणि दारिद्र्य गवताऐसें उदंड माजलें. असें सारें होऊनहि इथली आतिथ्याची उमेद कधीं खुरटली नाहीं, कद्रूपणानें तिला घेरलें नाहीं. कांहीं नाहीं तरी गुळाचा खडा आणि पाणी कधीं चुकलें नाहीं. दोन दिवस रहाण्यासाठीं आलेल्या अतिथीला



'वांगड्याच्या झगझगीत सांबारां' आणि 'इसांची हळदीचीं पाना घालून केलेली शाक' एवढा पाहुणाचार नक्कीच मिळायचा.' 'निस्त्यानाची' टोपली घेऊन येणाऱ्या बाईला: "ह्यां बत्र द्रस्तुल्या. चार आण्याचे पैसे फाल्या घेऊन जा." असें सांगून का होईना, पण पाहुण्यासाठीं घरांत मासळी ही घेतली जाणारच; आणि हें सारें करतांना हिशोब नाहीं; आजच्या चांगुलपणा उद्यां सोयीस्कर भावानें वटवण्याची वृत्ति नाहीं. एखाद्या कुळवाड्याच्या घरांत देण्यासारखें कांहींच नसलें, तर कमींत कमी माडावर चढून तो एकादें 'आडसार' नक्कीच काढून देईल. बुटक्या दरवाजांच्या या घरांतलें हें आतिथ्य उंच उंच आभाळालाहि लाजवूं शकेल.

गोव्याइतका सुंदर नसला तरी इथला निसर्ग निश्चितच विलोभनीय आहे. पाऊस भरपूर त्यामुळें दृष्ट लागावी असा हिरवागार रंग. हिरवा, पिवळा आणि लाल या रंगांची उधळण इथें ठसठशीतपणें जाणवावी. हिरव्या झावळ्या. हिरवीं पानें, फळांच्या कच्चेपणांतलें तें आंबट चिवट हिरवेंपण—माडांच्या झाव-ळ्यांच्या आश्रयाला रहाणारे सापहि हिरव्या रंगाचे! हें हिरवेंपण पक्वतेच्या सीमेवर येऊन पोहोंचलें कीं, हळूहळू लालपिवळें, लोभसवाणें, खुणावणारें होऊं लागतें. इथली मातीहि लाल. परीटघडीच्या शुभ्रपणाला कधींहि न जुमानणारी, दाट हिरव्या झाडींतून तांबडीं वळणें घेत भटकणारी. लाल मातीच्या या वाटा निश्चित स्थळींच नेऊन पोंचवतात; पण इतक्या लहरी-पणें कीं, या निश्चितपणाच्या चाकोरीचा काच मनाला जाणवूं नये! त्या वाटा चपळ होतात. त्यांना अंत असूनहि त्या अनंत हुलकावण्या देणाऱ्या होतात. त्या लाल मातीच्या उनाड वाटा हिरव्या झाडीला हुलकावणी देत देत डोंग-राच्या मागें लपलेलें निळें आकाश शोधायला निघतात!

हिरव्यागार पानांनीं दाट लगडलेलीं झाडें पावलापावलांवर भेटतात. लालभडक फुलांचे गोंडे सावरणारी जास्वंदी इटकून सर्वत्र दिसा-यची. मुठाच्या डोंगरावरच्या 'काजरोव्हाळ' या भागांत तर सगळीं झाडें काजूचीं. पिकलेल्या बोंडूची रास हवेंत उग्रमादक वास उधळीत या झाडांच्या पायशीं पडलेली! डुकरांना हें खाद्य विशेष आवडतें, विशेष मानवतें. डुकरें पाळ-णाऱ्या किरिस्तांवांच्या बायका संध्याकाळच्या वेळीं टोपल्या घेऊन 'काजऱ्याव्हाळांत' जातात. त्या टोपल्यांतून, जळणासाठीं काटक्या आणि डुकरांसाठीं हे बोंडू भरून आणतात. लहान असतांना मी वाटेवर उभा राहून आमच्या



घरामागें असलेल्या पावलूच्या बायकोला विचारीत असे:—

"फिलुल्या, टोपलेंतून काय आणतात गो?"

"बोंडू यू रे ते."

"कि याक ते?"

"आमचीं डुक्रां खातूत रे ते."

"माका भाषा मारतय् गो? बोंडूचो तुमी सोरो करतात!"

"ना रे! तुकां कोणीतरी फकांड सांगलें."

या भागांतले किरिस्तांव गोव्याची कोकणी आणि मालवणी कोकणी यांचें मिश्रण करून कोंकणी भाषा बोलतात. त्यांचे उच्चारहि बरेचसे गोव्यांत बोलल्या जाणाऱ्या कोकणीला जवळचे असतात.

माड हा इथल्या झाडांचा राजा. सर्व झाडां-च्यावर डोकें काढून, तपःसाधनेला जातांना वाटेंत थबकलेल्या शंकरासारखा हा उभा! तो अवलिया. तो जमिनीला खिळलेला असला तरी सारखें वाटत असतें, रात्रींच्या वेळीं सगळें जग गाढ झोपल्यावर हा आपल्या लांबच लांब टांगा टाकून दूर कुठें तरी भटकून येत असला पाहिजे! कोकणी माणसाच्या जीवनांत जन्मा-पासून तों थेट मृत्यूपर्यंत हा माड कृपेची सावली करीत उभा असतो!

वेळेवरच्या पांढऱ्या शुभ्र वाळूंत किलकिल्या डोळ्यांनीं पिवळें ऊन पात पडलेलीं काळींकुट्ट होडकीं... नदीच्या पाण्यांत आपलेंच रूप नार्सि-ससप्रमाणें न्याहाळणारीं सुरूचीं झाडें... पौर्णि-मेच्या शांत रात्रीं मंदपणें सळसळणाऱ्या माडांच्या झावळ्यांमागें उभा असलेला चंद्र... हें जग रंगगंधांचें आहे; आंब्याच्या, काजूच्या मोहोरानें घमघमणारें आहे; सह्याद्रीच्या कडेकपारीइतकें तें उग्रकठोर असलें, तरी इथें उमलणाऱ्या फुलांइतकेंच तें कोमलसुंदरहि आहे.

निसर्ग सुंदर आहे म्हणून इथलीं माणसें कलाप्रेरणेनें धुंद होणारीं आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. तरीं हीं माणसें कष्टाळू आहेत. आळस त्यांना फारसा ठाऊक नाहीं. एकदां कामाला लागलीं कीं वाघासारखीं काम करतील. पण सौंदर्यानें वेडें होणें, कलेच्या प्रेमासाठीं जीवन बरबाद करून घ्यायला तयार होणें हें या माणसांच्या हिशोबांत कधीं बसेल असें वाटत नाहीं. एकादा दुसरा अपवाद याला अर्थातच आढळेल.

दशावताराचे खेळ ही या भूमींतली खास अशी नाट्यपरंपरा—आतां हळू हळू हा प्रकार मागें पडत चालला. तरुण मंडळीचें त्याच्याकडे फारसें लक्ष उरलें नाहीं. त्यांच्या आवडी निव-डीहि बदलल्या. पण एके काळीं दशावतारांचे



खेळ पहात असतांना रात्र संपून पहांट केव्हां झाली हें सुद्धां समजत नसे. खेळ संपल्यावर रसिक आश्चर्यानें म्हणतः "कोणी कधीं वराडलो तां सुधां कळूंक नाय!"

जन्माष्टमी किंवा दत्तजयंती आली कीं हा नाटकांचा हंगाम विशेष जोरांत सुरू. त्याच्या अगोदर बाबलो मळेकार लांब केस वाढवून, आधींच काळे कुळकुळीत असलेले ओठ अधिक जोरांत विड्या फुंकून अधिक काळे करून वेत गांवांत वसू सोडलेल्या बैलासारखा हिंडतांना दिसायचा. त्याच्याकडे द्रौपदीचा पार्ट असे. विडीचें त्याला जबरदस्त व्यसन होतें. स्टेजवर उभें राहिल्यावर, ही द्रौपदी दहावीस वाक्यानंतर चक्क स्टेजच्या मागें जाऊन विडीचे चार सणसणीत दम मारून येत असे. कधीं कधीं ही अर्धी विझवलेली विडी कानाला लावून ठेवूनहि ही द्रौपदी स्टेजवर प्रवेश करीत असे. परंतु हें पहाणाऱ्या लोकांना मात्र यांतलें कांहींच खटकत नसे. द्रौपदीचें काम जर थोडें मिळमि-ळीत वाटलें तर प्रेक्षकांपैकीं एकादा ओरडून सांगत असे, "बाबल्या, भोसडीच्या जा रे, विडी ओढून ये मेल्या" आणि मग बाबल्या मळेकर ऊर्फ द्रौपदी पडल्या फळाची आज्ञा घेऊन कानाला हात घालीत स्टेजवरून मागच्या बाजूला जात असे.

या दशावतारांत काम करणारीं माणसें मोठीं कल्पक होतीं यांत शंकाच नाहीं. हीं पात्रें स्टेज-वर स्वयंस्फूर्तीनें बोलत. कपडे टांगण्याच्या खुंटी-प्रमाणें कुठला तरी एक विषय सर्वतान्हेचीं विषयावरें टांगण्यासाठीं त्यांना लागत असे!! तोंडाला रंग फासून एकदां का हीं पात्रें त्या पेट्रोमॅक्सच्या झगझगीत प्रकाशांत येऊन उभीं राहिलीं कीं रंगदेवता त्यांना सपशेल प्रसन्न होत असे. त्यांतहि आधीं जर नाटकांतल्या धर्म-राजाला एकादा दुसरा ग्लास माडी मिळण्याची सोय झालेली असली तर कांहीं पुसूं नका! या काम करणाऱ्या नटवर्गाकडे धीटपणा होता, विल-क्षण उत्साह होता, तल्लख हजरजबाबीपणा होता. स्टेजवर उभे राहिल्यावर ते अक्षरशः नाट्य निर्माण करीत असत. भीम आणि दुर्योधन यांच्या युद्धांत महाभारतकालीन नव्हे, तर आधुनिक काळांतील अगदीं ताजें बैमनस्यहि पेट घेत असे.

...पेट्रोमॅक्सचे झगझगीत दिवे पेटत आहेत. जनताजनार्दन अधून मधून विड्या ओढीत, शेंगदाणे खात, चकित आणि तन्मय होत्साता प्रयोग पहात आहे. स्टेजवर लावलेले आंब्याचे टाळ मोठ्या मजेंत वाऱ्याच्या झुळकीबरोबर झुलत आहेत. भीम आणि दुर्योधन यांचा प्रवेश मोठ्या रंगांत आला आहेः

**दुर्योधन** : भीमा मेल्या, तूं माका गजाली सांगूं नकोस.

**भीम** : या दंडांत जोबर ताकद आहे तोंवर दशदिशा जरी अंगावर कोसळून पडल्या तरी मियां ऐकाचंय नाय्.

दुर्योधन : मेलो रे येवून. जळ्ळां मेल्यांचा तोंड !

भीम : दुर्योधना, माय××, तुकां खुरखुरीच आयली आहे तर होवून जांवदे.

दुर्योधन : (काम करणार : बावू खवणेकर –हाटेलवाला) मेल्या भीमा, गेलो म्हयनोभर तुयां माझ्या दुकानांत उधार चाय पिवून गेलंय; तूं माकां शिकयुतलंय् ?

दुर्योधन आणि भीम यांची चांगलीच जुंपते. चिडलेला बावू खवणेकर ऊर्फ दुर्योधन भीमाच्या चक्क छातीवर [illegible] मागून मोठमोठ्यानें हुकूम येतो : "अरे, मेल्या दुर्योधना, पडान् घे, पडान् घे."

—पण दुर्योधनाला कांहीं ऐकूं येईल तर शपथ ! महिनाभर उधार प्यालेल्या चहाचे पैसे भीमाकडून वसूल केल्याशिवाय तो त्याला सोडायलाच तयार नसतो. प्रेक्षकवर्गहि चिडतो; पण दुर्योधनावर नव्हे, भीमावर ! "मेल्याच्या आंगांत नाय ताकद; पण मेल्याक भीम होवूंची लज्ज !"

असें हें जीवन, अशीं हीं माणसें. धूर्त तरीहि निष्कपटी; हिशोबी—तरीहि प्रेमळ, आतिथ्यशील. देवदेवस्कीं यांच्या मनावर चांगलीच स्वार झालेली. गांवांत जितकीं झाडें, जितके देव, तितक्या यांच्या देवता––सर्व्हिसची मोटारसुद्धां वाटेवर थांबून तिथल्या देवाला नारळ फोडल्याशिवाय पुढें जाणार नाहीं; "सायबा, हो नाल तुकां दितसंव तो मान्य करून घे, आणि आमका सुक्षेम घेवून जा !" अशी प्रार्थना केल्यावरच ड्रायव्हर चाक हातांत धरणार ! गांवच्या गोंवेंदाच्या आंगावर येतें, देव त्याच्यांत उभा रहातो असें कळलें कीं त्या अशिक्षित कुळवाड्याच्या घरीं, एरव्हीं सोवळ्याओवळ्याचें स्तोम माजवणाऱ्या ब्रामणांची सुद्धां गर्दी ! डागलेल्या बैलासारखें हां––हूं करीत तो एकादा नारळ, एकादी गरगरीत कोंबडी, आणि चार आण्याचे पैसे एवढ्यावर भूत––भविष्य––वर्तमान यांचें सर्व रहस्य तर सांगणारच, पण शिवाय भूतपिशाच्चबाधाहि उतरवणार ! या अद्‌भुत दैवी सामर्थ्यावर दोन वेळचें जेवण आणि संध्याकाळची माडी त्याला सहज सुटूं शकते.

देवदेवस्कीइतकेंच या माणसांना कोर्टकचेरीचें वेड. साप वेडूक गिळतो तसा वकील यांची संपत्ति गिळत असतो; पण तरीहि यांचा कैफ कधीं उतरत नाहीं. शेतांतली मेर एक इंच मागें असावी कीं पुढें एवढ्यावरून हे सरळ कोर्टात जातील. पिढ्यान्‌पिढ्या दावा चालवण्याची यांची हिंमत. शेवटीं जरी घरदार गेलें, दोन वेळच्या अन्नाची पंचाईत झाली तरी कोर्टातला दावा मागें घेण्याची गोष्ट नको. "मी मरान् पण तुकां राड करान" ही म्हण इथेंच कां जन्मली हें यावरून सहज कळतें !

दुसऱ्यांच्या भानगडींत इथल्या माणसांना भारी रस ! हीं लकडीकुलंगडीं विड्यासारखीं तोंडांत ठेवून चघळायला त्यांना कसें, बरें वाटतें ! कोणाची काय भानगड आहे, कोणाचें कसलें बिंग आहे हीं गांवांतलीं हरतऱ्हेचीं विविध, खाजगी वृत्तें यांच्या खिशांत सदा भरलेलीं. बरें, आपल्यांतला एकादा माणूस जर दैवाच्या कृपेनें वर चढला, उच्च पदस्थ झाला तर चुकून देखील हे चार शब्द त्याच्याविषयीं चांगले बोलणार नाहींत ! गुरांच्या प्रदर्शनांत जर शेजाऱ्याच्या बैलाला बक्षीस मिळालें तर त्या बैलाच्या शेपटीला चौवीस केस असण्याऐवजीं बावीसच केस आहेत असें म्हणून ते त्याची आत्मसंतुष्टपणें टिंगल करतांना दिसतील !

शिवी घातल्याशिवाय वाक्य सहसा पुरें होणार नाहीं ! इथल्या माणसांचें सर्व शहाणपण त्यांच्या म्हणींत आढळतें. बऱ्याचशा म्हणी चांगल्यांचे अश्लील असतात. इथलीची सभ्यता मिरवणाऱ्यांना त्या झेपण्याजोग्या नाहींत.



तसा हा माणूस साधा आहे. भात आणि 'निल्लाकाचां मांदरां' एवढें मिळालें कीं तो कुठेंहि सुखी होऊं शकतो जगाचें ओझें उगीचच डोक्यावर घेऊन तो मस्तक शिणवण्याचा प्रयत्न करणार नाहीं ! बड्या चौघांच्या बैठकींत कसलीं खलबतें चाललीं आहेत यापेक्षां देवळामागच्या सोनाराची बायको पिंपळामागच्या बामणाबरोबर विशेष सलगीनें वागते ही बातमी त्याला अधिक महत्त्वाची वाटते !

हाताचीं पांच बोटें सारखीं नसतात त्याप्रमाणें गांवांतलीं सगळीं माणसें सारखीं नसतात हें धरून चाललें पाहिजे. बाहेरून जरी हीं माणसें फणसासारखीं कांटेरी असलीं तरी अंतर्यामीं तीं रसाळ असतात. कोंकणी पायवाटांसारखींच हीं करकरणारीं असलीं तरी चिवट, विलक्षण मजबूत असतात. दगडधोंडे, कांटेकुटे, खांचखळगे, डोंगरनाले तीं सहज पार करून जातात. जीवनावर प्रेम करणारीं हीं माणसें आहेत.

• • •



# सोबित सुंदर नंदनवन हें गोमंतक ताचें नांव हेवटेन दोंगर तेवटेन दोंगर पांचवें पांचवें रान

बा. भ. बोरकर

गोवा म्हणजे सौंदर्याची धुंदी. भावनांची वेहोषी, कलेचा कैफ. साऱ्याच स्थिर-चराला येथें कैफाचें पाजन आहे. इथली माती लाखेसारखी तांबडीगुंज. झरे आणि पाट सदान्‌कदा आरसपानी आणि आपल्याच नादांत. घनदाट अरण्यराजींत हिरव्या मस्तीचे अष्टोत्तर विलास आणि चित्रविचित्र पत्रींत बहुढंगी कतरण. डोंगरमाथ्यावर कुठें तांबड्या पिवळ्या बोंडूनीं लगटलेलीं काजूचीं ठेंगणीं ठुसकीं झाडें तर कुठें भूमींतून छपन्न धारांनीं उसळलेलीं बांबूचीं हिरवींगार कारंजीं. उतरणीवर थंडाव्यानें थबथबणारीं पोफळीचीं गर्द कुळागरें. त्यांत फळाफुलांचे नाना वास गोटून ठिबकत असलेले. झावळ्यांत पाचेचें पाणी. आंत ऊनच चांदणें होऊन सुखावलेलें. खालीं तळजमनीवर जिकडे तिकडे शेतखांचराचे कुणगे. त्यांत भांगरसाळी आणि कुंकुमसाळी सोनकेशरी सुस्तीनें आळोखे पिळोखे देत असलेल्या मध्येंच एकादा तांबडा भडक रस्ता अजगरासारखा मोड घेत चाललेला. त्याच्या आजूबाजूला लेकुरवाळ्या आंब्याफणसाच्या आळी किंवा भिरंडीखण्टीचीं झाडें. कुठें विस्मयाचे डोळे विस्फारीत एकादें तळें आकाश लपेटून बसलेलें तर कुठें एकादा बांधाचा फांटा उगीचच वांकड्या तिकड्या पावलांनीं शेतांतून सहलीला निघालेला. आणि त्याच्यावर आकाशाची निळाई पिऊन झिंगलेले दिगंबर पुरुष माड जटांचे पदर झाडीत उभ्याउभ्याच घुमत असलेले.

इथला सारा आसमंत असा हा धुंद आहे, उत्कट आहे, रसरशीत आहे. अशा या धुंद परिसरांतून कधीं शेलाट्या मत्स्यगंधा माथ्यावरून सागरांतली चांदी मिरवीत रस्त्यांतून सताल हेल घालीत जातात तर कधीं मदिरेचे घट वाहणाऱ्या मदिराक्षी घटांतल्या मदिरेप्रमाणेंच अंगांतल्या मदनाचा दर्पहि उधळीत असतात. कुठें माडावर 'शेव' घालणारा भंडारी एकाद्या मधुर कोंकणी प्रेमगीताचे आर्तालाप घेत असतो तर कुठें एकादा फातरफोड्या कुणबी आपल्या कुणबाऊ बोलींत चालतां चालतां भावगीताचे चरण रचीत असतो.

गोव्याचा हा चिमुकला प्रदेश नकाशांत पाहिल्यास एकाद्या शिंपलीसारखा किंवा भातुकलींतल्या सुपलीसारखा दिसतो. क्षेत्रफळानें आणि लोकसंख्येनें आपल्याकडच्या अर्ध्या जिल्ह्याएवढा फार तर भरेल. पण शिंपली मोत्याची आहे आणि तिच्यावर अशी अद्भुत नक्षीची कारागिरी आहे. शेंकडों वर्षे तिच्यांतलीं मोत्यें जगभर विखुरलीं आहेत पण वरचेवर नवीं नवीं मोत्यें तिच्यांत पैदा होतच आहेत.

...च्या मानानें हा प्रदेश पुष्कळच सुपीक आणि समृद्ध आहे. जमिनीच्या नांगरणीला समुद्राच्या नांगरणीची जोड आहे. त्यामुळें जीवनकलह तेवढासा तीव्र नाहीं. हवा इतकी सुखकर आणि निरोगी कीं रोगाचे जंतु फार काल तेथें टिकूंच शकत नाहींत. अर्थात् तंट्याबखेड्यांना तेथें वाव नाहीं. तशाच कांहीं कारणावरून अधून मधून कलह पेटलाच तरी तो बरडाच्या आगीप्रमाणें लगेच विझतो. सौंदर्याला चटावलेलें तेथलें मानवी मन हिंसेला पाठमोरें होतें आणि परस्पर विश्वासावर मान टाकून सुश्रांत असतें. प्रेम आणि कौतुक मिळालें कीं त्याच्या सुखाला सीमा उरत नाहीं. तेवढें मिळालें कीं आपल्याच नादांत तें निमग्न असतें आणि कलेचा फसला तरी चाळा करीत राहाण्यांत गुंगून जातें. असल्या या सौम्य सुंदर परिसरांत रौद्र दैवतेंहि सौम्य होतात. इथें आल्याबरोबरच दुर्गा शांत झाली आणि महारुद्र मंगलेश (मंगेश) झाला.

गोव्याच्या या छोट्याशा प्रदेशांतली सगळी पैदाइश छोट्या घाटाची आहे. वस्तुजात असो कीं व्यक्तिजात असो, सगळ्यांची चण जात्याच लहान. फुलें, फळें, गुरेंढोरें, सांवजेंपांखरें, जीव जिवाणू सगळ्यांची जातडी छोटी. माणसेंहि तशींच. पण रेखीव आणि नीटस. फुलें लहान पण वासानें घुसमुसणारीं. फळें एवढींशींच. पण स्वादानें लज्जतदार आणि रसानें थबथबलीं. मा... किरकोळ पण त्यांनीं पुरुषार्थाचे विक्रम केले नाहींत असें एकांहि क्षेत्र आढळावयाचें नाहीं. अपवाद असा एकच. शरीरबलाचा विक्रम तेवढा सामान्यतः त्यांना झेंपत नाहीं. तो भाबडा, स्वप्नाळू, अल्पसंतुष्ट, इंद्रियलोलुप, गाफील आणि सुस्त दिसतो. त्याच्या अंगीं कांहीं विशेष कर्तृत्व असेल असेंहि वाटतहि नाहीं. पण हाच गोवेकर जेव्हां तापत्रयानें पोळतो, अनुतापाच्या आसवांनीं भिजतो आणि खारट तुरट अनुभवांनीं ढवळून निघतो तेव्हां त्याच्या या अजब मातीचें विलक्षण अत्तर एकाएकीं त्याच्या गात्रांगात्रांतून कारंज्याप्रमाणें उसळी घेतें आणि मग हाच सुस्त सुखासीन जीव कलेच्या किंवा जीवनाच्या एकाद्या क्षेत्रांत प्रति... पराक्रमाचा एकादा अपूर्व चमत्कार लीलेनें करून जातो.

सर्व इंद्रियांचें मूळ माणसाच्या रसनेंत आहे म्हणतात हें गोवेकराच्या बाबतींत तरी अक्षरशः खरें आहे. पहांट झाली तशी त्याची पहिली काळजी कोणती म्हणाल तर आज 'निस्त्यास'



काय मिळेल आणि कसें मिळेल ही. ओळखीचा माणूस दिसला कीं 'आज कितें मेळें ?' किंवा 'आज कितें खालें ?' ह्या प्रश्नानें त्याच्या संभाषणाचा श्रीगणेशा सुरू होतो. चांगला मासा दिसला तर त्यासाठीं पोवान (गिनी) मोजायलाहि तो कमी करीत नाहीं. त्या दिवशीं आपण खास ...कम केला असें त्याला मनापासून वाटतें. दिग्विजय केल्याच्या दिमाखांत हातांतली

अनुक्रमणिका

गांथनी झेलवीत तो घरीं येतो, ती उजू करायची घाई लावतो, ती कशी रांधावी, कशी तळावी याचं साग्रसंगीत वर्णन करतो, तिचा मनसोक्त आस्वाद घेता यावा म्हणून कामाच्या घाईत असलेल्या अल्पशा ओळखीच्या पांथस्थालाहि अत्याग्रह करून पक्तीला ठेवून घेतो आणि असली ही अपरूप मासळी पैदा करण्यांत आपण केवढी लढाई मारली आणि मोटमोठ्या मातबरांना कसें खालीं पहावयास लावलें याचें चटकदार वर्णन करीत घांसा घांसाबरोबर तिची चव वाढवीत असतो. मोठमोठ्या वकिलांनीं हौगाए नहींत अशीं महत्वाचीं कामें या मासळी-मुळें गोव्यांत सहज होऊन जातात. खटले जिंकले जातात, मुली उजवल्या जातात, गलटें निस्तरलीं जातात, एवढेंच काय, तुरुंगवासांतून प्रत्यक्ष महा-परमेश्वराच्या पहिल्या अवताराची इतकी जागृत उपासना आणि अशी षोडशोपचार पूजाअर्चा नेमनिष्ठेनें करणारा अन्य प्रदेश या उभ्या भारतवर्षांत कुठें तुम्हांला सांपडायचा नाहीं! ही मत्स्यभक्ति या लोकांच्या रोमारोमांत अशी कांहीं भिनली आहे कीं सुंदर स्त्रियांचीं वर्णनें करतांना देखील त्यांना 'नगल्या–बेंरल्यां' च्याच उपमा सुचतील. साध्या बोलण्यांतच नव्हे तर काव्यांत देखील तो या मासळीचें गुणवर्णन करण्यांत रमून जातो. 'बांगडा' आणि 'पेड' यांच्या लग्न समारंभाचें रसभरीत लोकगीत गोव्याच्याच प्रदेशांत निर्माण होऊं शकतें.

> बांगडो न्हवरो, पेड व्हंकाल,
> सुंगट करवलि नाच रे पालवा !
> सांगाळयाच्ये केल्यो घार मेढी
> लेपांची केली चुडी रे पालवा,
> बाळ्यांचे केले दोर...

केवळ मासळीच्याच बाबतींत नव्हे तर खाण्याच्या सर्वच प्रकारांत तो रसिक आहे. कल्पक आहे. म्हणजेच खवय्या आहे. खादाड नव्हे. खाणें थोडें आणि मचमच फार असा त्याचा स्वभाव. खाण्याप्रमाणें बोलण्याच्या कामां-तहि त्याची जीभ मोठी पटाईत असते. त्याच्या मनांत पांचहि इंद्रियांच्या इतक्या असंख्य प्रतिमा सारखी गर्दी करीत असतात कीं बोल-ण्यासाठीं तो सदैव अधीर असतो. बोलणें हा त्याचा खास छंद आहे. तेथले पिंपळाचे पार, दुकानाचे ओटे, तिठ्या, चावडींचे सोपे आणि देवळांचे सोपे नेहमींच तुम्हाला अशा गोष्टी-वेल्हाळ माणसांनीं गजबजलेले दिसतील.

गोव्याचा माणूस हा मूळतः कुळवाडी आहे.



घरसंसारी आहे. घराची ओढ त्याला सोडतां सुटत नाहीं, गोवेकर मग तो लहान, मोठा, गरीब श्रीमंत कसाहि असो त्याला खास स्वतःचें असें घर असतें. पोटापायीं परगांवीं जावें लागलें तरी घरांत दिवा लागला पाहिजे म्हणून तो पदराला खार लावतो, सणासुदीला घरीं जाण्या-साठीं जीव टाकतो, तें साधलें नाहीं वर्षांतून एकदां तरी गांवची वारी करतो आणि अंत-समयीं आपला देह तेथेंच पडावा अशी कुल-देवतेची करुणा भाकतो.

ह्या गृहभक्तींतूनच त्याची कुळनिष्ठा निर्माण झाली. गोव्यांत कुटुंबालाच कुळ म्हणतात असें नव्हे तर व्यक्तीला देखील तेंच संबो-धन वापरतात. शेत कसणाऱ्याला कुळवाडी, स्वतःच्या दैवताला भजणाऱ्याला 'कुळावी', मूळ आदिवास्याला 'कुळंबी', माहेराला 'कुळार', स्वैपाकाच्या भांड्याला 'कुळणें', संसारोपयोगी झाडांच्या उटावळीला 'कुळागर', गांवची बांधावळ मांडून ती सांभाळणाऱ्याला 'कुळकर्णी' अशीं नांवें देऊन त्यानें आपल्या ह्या कुळनिष्ठेचा गौरव केला आहे. कुटुंब वा कुळ म्हणजे केवळ मी, माझी लाडकी आणि माझे नागले असा आपल्या पुरता संकुचित खेळ नव्हे याची गोवेकराला जाणीव आहे. कुटुंब वा कूळ म्हटलें कीं त्यांत भाऊ, चुलत भाऊ, चुलतचुलत भाऊ, त्यांच्या बायका, मुलें, एखादा दुसरा आश्रित, नोकर चाकर, आणि पिढीजाद ऋणानुबंधांचे धागेदोरे.

हा सहृदय साम्यवाद हल्लीं हल्लींपर्यंत गोव्यांत इतका भरभराटींत होता कीं शंभर शंभर कुटुंबांचीं गृहराज्यें तिथें परवांपरवां-पर्यंत नांदलेलीं दिसलीं. आज तीं धडाधड कोसळत आहेत आणि तरीहि आपली ही कुळ-निष्ठा टिकविण्यासाठीं कुटुंबांतले लोक घरें वेगळीं झालीं तरी दिवाळीचे दिवे एकत्र दाख-वून घेतात, गणेशचतुर्थीचा सोहळा एकत्र येऊन साजरा करतात आणि एकाद्याच्या घरीं लग्नकारण असलें तर त्या दिवशीं तरी कुटुंबांतलीं लहानथोर सर्व माणसें एकत्र भोजन करतात.

आपल्या कुटुंबाचा हा नकाशा पुढें ठेवू-नच गोमंतकाचा आपल्या गांवाची बांधावळ घातली. त्याच्या घराला देव्हारा होता. त्याच धर्तीवर त्यानें गांवाला देऊळ उभारून दिलें तें गांवच्या मालकीचें आणि गांव त्याच्या मालकीचा. गांवची संस्कृति, धनदौलत, ऐश्वर्य, कलाकौशल्य सर्व कांहीं तेथें जमायचें. तेथेंच पूजाअर्चेच्या धर्मपरंपरेचें जतन व्हायचें, भटाभिक्षुकांना आश्रय लाभून संस्कृत विद्येची जोपासना आणि उपासना चालायची. कथा-कीर्तनानें कष्टी कुळवाड्यांना आणि बालकानुलांना संस्कार मिळायचे. सण उत्सव आणि तिथीवारी यांच्यामुळें सामाजिक सद्गुण पोसले जायचे. जत्रांमुळें व्यापार उद्योग आणि हुन्नर यांना उत्तेजन मिळायचें. नाटकांमुळें कला आणि ज्ञान लोकसुलभ होऊन काबाडकष्ट करणाऱ्यांच्या जिण्यांत आनंद खेळायचा. गायन, वादन, नाट्य, स्थापत्य वगैरे कलांना आणि हस्तकौशल्याच्या नाना कसबांना बिदागी मिळायची. कौतुक व्हायचें. अतिथि अभ्यागतांची सोय व्हायची. गांवजेवणें आणि देवकार्यें यांच्यामुळें गोरगरि-बाला गोडधोड खायला मिळायचें आणि ताप-त्रयानें पोळलेल्याला समाधान लाभायाचें. गांवचे कलह मिटायाचे तेहि इथेंच आणि पोरांना दोन अक्षरें लागायचीं तींहि इथेंच. आमचीं हीं देवळें म्हणजे सर्व शुभसंस्कारांचे म्यूझियमच. या देवळांतील उत्सव-समारंभाच्या सौंदर्यविधानानें गोव्याच्या लंपटतेला सात्त्विकतेची सद्गति मिळाली. या देवळांचें गोवेकराला नुसतें वेड आहे. फिरंग्यांनीं मोडलेल्या देवळांचा इतिहास वाचला म्हणजे गोव्यांत घरें अधिक होतीं कीं देवळें अधिक होतीं असा प्रश्न पडतो. फिरंग्यांनीं पहिलीं देवळें मोडल्यावर गोवेकरांनीं जीं नवीं देवळें बांधलीं त्यांचा इतिहास पाहिला कीं ती कथा ताजमहाला-पेक्षांहि अधिक करुण आणि उदात्त वाटते. गोवें कलाभूमि आहे, क्रांतिभूमीहि आहे. पण सर्वप्रथम ती देवभूमि आहे आणि म्हणूनच ती कलाभूमि आणि क्रांतिभूमि होऊं शकली आहे. या सर्व संस्कारांमुळें गोवेकर संस्कारी झाला आहे. हातघाईवर येणें त्याला रुचत नाहीं. दुसऱ्याचें मन तोडणें त्याच्या जिवावर येतें. जिथें तिथें तो जुळवून घेतो, जीवनांत जें जें कांहीं आलें त्या सर्वांत संगति घालतो. सहिष्णु तेनें आणि गोडी गुलाबीनें आयुष्य गोड कर-ण्याची साधना करतो आणि जीवनाच्या आणि कलेच्या आनंदात मस्त रहातो. ● ● ●

अनुक्रमणिका



# विना कपाशीनें उले त्याले बोंड म्हनूं नहीं

सोपानदेव चौधरी

पुणें हें महाराष्ट्राचें नाक असल्यामुळें प्रसिद्ध तर नाशिक हें शूर्पणखेचें नाक कापल्याबद्दल प्रसिद्ध! प्रभुरामचंद्राच्या वास्तव्यामुळें पवित्र झालेल्या या क्षेत्रांतील जलस्थलकाष्ठपाषाण या सर्वांना देवत्व प्राप्त होणें साहजिक आहे. नाशिकच्या गोदातीरावर एकाद्या देवाची टेंच लागणेंही स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें टेंच लागून कोसळतांना दुसऱ्या देवावर डोकें आपटून मोक्ष नसला तरी कपाळमोक्ष होणेंही सहज शक्य आहे. 'पायांखालीं आला तो दगड अन् डोक्यावर बसला तो देव!' असें सात्विक समाधान करीत गोदातटाकीं हिंडावें लागत असे. तीं बारीक सारिक देव-दैवतें आतां सिमेंटच्या कोब्याखालीं भूमिगत झालीं आहेत.

क्षेत्राबरोबर क्षेत्रोपाध्येही आले आणि दंतकथाही आल्या. त्यामुळें रामकुंड, सीताकुंड, लक्ष्मणकुंड, शूर्पणखा वध असलीं अनेक स्थळें आणि स्थानमहात्म्याचीं स्तोत्रें गाऊन भाविकांकडून द्रव्य संपादन करणारे भिक्षुकही तिथें भरपूर आहेत. सिंहस्थ पर्वणी आल्यावर तर न्हाव्या-भटांची भरपूर धन झालेली आहे. बदलत्या काळाबरोबर सिंहस्थांतील सिंहाची आयाळ गळून पडली, दांत आणि नखें पूर्वीइतकीं समर्थ राहिलीं नाहींत. खुद्द या क्षेत्राचें दैवत श्रीरामचंद्रप्रभू देखील हरिजनांच्या मंदिरप्रवेशानंतर तितकेसे पाक राहिले नाहींत असाही हलक्या आवाजांतील दावा अधूनमधून कानावर आदळतो. हिंदुंच्या या धर्मक्षेत्रामध्यें ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं भूतदया आणि स्वधर्मबुद्धि या दोन्ही दगडींवर पाय ठेवून बरेंच कार्य केलें.

बदलत्या काळाबरोबर अर्थात नाशिकही बदललें. सकाळीं कर्मधर्मकृत्यें करणारे यात्रेकरू सर्वधर्मसंग्राहक चिवडा खाण्यासाठीं सायंकाळीं नाशिकच्या घाटावर त्याच उत्साहानें जमूं लागले आहेत. आध्यात्मिक रामाप्रमाणेंच आधिभौतिक चिवडा आणि द्राक्षें यांनीं नाशिकचें नांव अखिल भारतांत नेलें. नाशिकच्या प्रेक्षणीय स्थळांमध्यें रामशेज आणि चामर लेण्याचा डोंगर, दुसऱ्या बाजूला पांडवलेण्याचें डोंगर, त्र्यंबकेश्वरचा ब्रह्मगिरी, तिथला गोदावरीचा उगम अशीं निसर्गानें सौंदर्याचा वरदहस्त देऊन पाठविलेलीं रम्य ठिकाणें आहेत त्याच प्रमाणें चार छत्रांच्या देवळांत छत्रपति होऊन राहिलेले शिवशंकरही आहेत. त्यांच्यापुढें अष्टदिशांचें धावे दणाणून टाकणारी, पोर्तुगीजांकडून जिंकून आणलेली महाप्रचंड नारोशंकराची घंटा आहे. नारोशंकरी घंटेच्या आवाजानें भाविकांमधील भक्तीचा उमाळा बांध फोडून बाहेर पडतो हें खरेंच, परंतु त्या आवाजापासून स्फूर्ति घेऊन पोर्तुगीजांचें धाबें दणाणून टाकणारा जनतेचा प्रचंड प्रतिसाद केव्हां निघेल? हा विचारही मनाला अस्वस्थ करून जातो. डुमडुम [illegible] खणखणत खग ये अशा रुद्रदेवतेपुढील या महान् घंटानादाची उपमा एखाद्या टणटणीत आवाजाच्या स्त्रीला देण्यांत येते हें त्या घंटेचें दुर्दैव होय. परंतु महान् गोष्टींची चेष्टा क्षेत्राशिवाय अन्यत्र क्वचित् आढळेल. म्हणूनच पवित्र देवस्थानांच्या भिंती गुप्त रोगावरील अक्सीर इलाजाच्या जाहिरातींनीं बरबटलेल्या आढळतात.

भिक्षुकांच्या तावडींतून भाविकांची सुटका व्हावी म्हणून संत गाडगेबाबांनीं गोदातीरावर डोंगर पोखरून मंदिर, धर्मशाळा उभी केली. समाजविकास योजनांचे प्रचंड कागदी डोंगर पोखरून उद्घाटन समारंभाचा उंदीर बाहेर काढण्याच्या या दिवसांत तज्ञांच्या सल्ल्याचा अर्धा कपटाही हातांत न घेतां संत गाडगे बाबांनीं केलेलें हें कार्य लोकविलक्षण आहे.

जनतेचें मत भाबड्या रूढीप्रियतेकडून डोळस समाजसुधारणेकडे वळविण्याचें कार्य नाशिक येथील अनेक साहित्यिक, राजकीय समाजकारणी अशा धुरिणांनीं केलें. खुद्द शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनीं आपलें लक्ष गोंधळलेल्या धर्मक्षेत्रांतून काढलें विरोधकांशीं कुरुक्षेत्र मांडलें. आणि स्वतःच्या उदाहरणानें ऋषिविद्येकडून त्यांनीं कृषिविद्येंत लक्ष घातलें. असल्या बंडखोरांची परंपरा नाशकांत जुनी आहे.

लावणी वाङ्मयांतील शृंगारांतून स्वातंत्र्य-देवतेच्या [illegible] पागळा गोविंद कवि प्रतिभेच्या पायानें स्वातंत्र्यदेवीच्या मंदिराची वाट झपाट्यानें काटीत मरणानंतरही चिरसौंदर्याचें अमृतकवच धारण करून महाराष्ट्राचा स्वातंत्र्य शाहीर होऊन बसला. नदीकांठावर परलोकांत मानाचें स्थान मिळविण्यासाठीं निवृत्तीच्या जपमाळा ओढीत बसलेल्या तरुणांच्या हातीं स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं काडतुसांच्या माळा देऊन त्यांच्या जीवनांत खऱ्या अर्थानें 'राम' आणला.

इहलोकीचें सौंदर्य ओळीओळींतून [illegible] करून सांगणारे कविश्रेष्ठ रे. नारायण वामन टिळक हे नाशिकचेच. सर्व सुखावर [illegible] सोडून पतिबरोबर खडतर हालअपेष्टा सहन करणाऱ्या जानकीचा आदर्श मातोश्री लक्ष्मीबाई टिळकांच्या स्मृतिचित्रांतून दिसला. आणि महाराष्ट्रानें "साहित्य लक्ष्मी" म्हणून त्यांना गौरविलें; हा ही मान नाशिकचाच. तेजस्वी कवींची परंपरा नाशकांत अखंडित आहे. महाराष्ट्र शारदेला आकाशपुष्पाचं लेणं चढविणारी आमच्या कुसुमाग्रजांची प्रतिभा नाशकांतच बहरली. काव्याप्रमाणें गद्यांतही नाशिक मागें नाहीं.



साहित्य क्षेत्राप्रमाणेंच कला-क्षेत्रांची गंगोत्री नाशकांतच! भारतांत चित्रपट कलेला जन्म दिला तो दादासाहेब फाळक्यांनीं! आधुनिक शास्त्रीय संगीताचें पुनरुज्जीवन करणारे महर्षि

पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांनीं आपली कला-साधना वाहिली ती नाशिकच्या प्रभू रामचंद्राच्याच चरणीं !

साहित्य संगीताप्रमाणेंच नाट्याचाही उल्लेख करावासा वाटतो. रंगभूमीचा जन्म सांगलीस झाला असला तरी तिचें बारसें नाशिक शहरीं झालें आहे. कै. अनंत वामन बर्वे यांनीं त्या काळीं "रंगभूमि" नांवाचें मासिक अत्यंत कष्टानें चालविलें आणि रंगभूमीचा पाळणा हालविला.

व्यापारांतही नाशिक जिल्हा मागें नाहीं. मालेगांवी खावळेल आणि मालेगांवी लुगडीं चहुंकडेच जातात. पिंपळगांव बसवंतच्या द्राक्षांना काबुली अंगूरांइतकीच मागणी आहे. येवल्याचे रेशमी शालू शाहीर पठ्ठयांनीं देखील गाण्यांत ओढले आहेत. सिन्नरची विडी सर्वतोमुखीं झाली आहे. खुद्द नाशिकचे बाटदार तांबे रहिवाशांना व प्रवाशांना प्राचीन काळापासून पाणी पाजीत आले आहेत. या सर्व मालाची खरेदी पेशवाईत चांदवडी टांकसाळींतून निघालेल्या नाण्यानें असे, आज नाशिकच्या सिक्युरिटी ...ल्या नोटा या कामीं येतात.

...वरी ओलांडल्यानंतर कादगा, गिरणा बोरी, या नद्यांना भेट देत देत तापीतीरावर पोंचलें कीं खान्देश येतो.

उत्तरेच्या बाजूला सातपुडापर्वत आणि दक्षिणेकडे सामळ्याचे डोंगर या दोन्ही पहाडडोंगरांच्या कुशीमध्यें पूर्व खान्देश वसलेला आहे. या दोन्ही पर्वतडोंगरावरील आकाशाची कमान पाहिली म्हणजे खान्देश जणुं तट्ट्याच्या दमणींत बसला आहे असें वाटते. खान्देश हा खानाचा देश म्हणावे तर तेथें तसा कांहीं इतिहास घडलेला दिसत नाहीं. नाशिराबाद, एहलाबाद, मसुराबाद या पुरतीच खानेसुमारी बाद केली तर खानाचा कांहीं संबंध येत नाहीं. साल्हेर मुल्हेर किल्ले इतिहासाच्या अभ्यासूंना टांचणासारखे उपयोगी पडतात एवढेंच काय तें. पौराणिक महत्व मात्र या कान्हबाईच्या देशाला अर्थातच कान्हदेशाला भरपूर आहे. एकलव्यानें इथेंच धनुर्विद्येची तपस्या केली. त्या एकलव्य खेड्याचा 'एकलग्न' असा मंगल अपभ्रंश झाला. महा भारतकाळीं भीमानें बकासुराला इथेंच बुकलून ठार केलें. बकासुराच्या वास्तव्याला येथें एकच पुरावा कीं, वर्षानुवर्षे दैनंदिन गाडाभर अन्नाची राईसप्लेट महाराष्ट्रांत या संपन्न भूमीखेरीज अन्यत्र कुठेंही



मिळणें मुष्किल होतें. बकासुराच्या वधस्थानीं (पद्मालयाला) तेथील खडकावर पडलेल्या गारगोट्यांच्या छिटा बकासुराच्या भाताचीं शितें म्हणून दाखविण्यांत येतात. इतक्या पौराणिक शिळ्या भाताच्या गारगोट्या होणें साहजिक आहे ! त्याशिवाय एके काळीं या देशांत पाणी होतें असें दिसून येईल. आच्छोदक (आसोदा), कच्छोदक (कासोदा) आम्रोदक (आमोदा), उदकाच्या आश्रयाला गुरेंवासरेंही भरपूर असलीं पाहिजेत म्हणूनच पाण्यानें समृद्ध असलेल्या या भागांत लेवापाटीदारांनीं वस्ती केली असली पाहिजे. त्यांतूनच दुधाइतक्या गोड खानदेशीचा जन्म झाला. (भाषा पंडितांनीं चूक-भूल द्यावी घ्यावी.) खानदेशी खेड्यांतून हिंडतांना कानावर पडणारी मराठी ओवी या भाषेचा साज घेऊन आली.

वाटच्या वाटसरा काय पाहत् खेड्याले ।
सोन्याचे कुलूप माझ्या भाऊच्या वाड्याले ॥

वरच्या ओवींतील श्रीमंती खानदेशी शेतकऱ्याच्या घरांत उण्या अधिक प्रमाणानें अद्याप सांपडते. खानदेशी जो भाऊ गरीब असेल परंतु त्याच्यांत दरिद्र मात्र नाहीं.

खान्देशी मळ्याचें सौंदर्य आणि ...ाड्यांची संपत्ती पाहून कोंकण्या शेतकरी तर चकावूनच जाईल ! लोंगरांना अंगाखांद्यावर घेतलेल्या कर्दळी पाहिल्या म्हणजे "लेकुरवाळी रंभा उभी" राहिल्यासारखें पाहणाराला वाटतें. शेतकरी श्रीमंत असो वा खाऊन पिऊन सुखी असो. त्याच्या घरांत माणसापेक्षां शेतमळ्यांतील मालानेंच जागा व्यापलेली दिसेल ! भिंतीशीं गव्हा-ज्वारीचीं पोतीं, राहिलेल्या जागेंत कांद्याच्या बोऱ्या, वरती तुळईवर लसणाच्या जुड्या टांगलेल्या, जोडीला हलणारा पाळणाही तिथेंच लटकलेला ! ओसरीवर भुईमुगाच्या शेंगा. अंगणांत लाल मिरच्या वाळत टाकलेल्या.

खान्देशी शेतकऱ्याच्या जीवनाची चाल त्याच्या पुढच्या ठेलाऱ्या बैलासारखीच संथ—पण तितकीच डोलदार ! कामाच्या बाबतींत तर जणुं वाघ ! तरी पण विनोदबुद्धीचें त्याला वावडें नाहीं. एकद्या शेतकऱ्याच्या वीतभर वाढलेल्या दाढीवर शहरी सोकाजीनें चेष्टा केलीच तर आमचा जी भाऊ चटकन् म्हणेल—"अहो भाऊ ! तुमच्यासारखी चिकणचोपडी दाढी करून येथें दाखवूं कोणाला ? या नाङ्गा बैलांना का म्हशींना ?"

कांहीं कारणानें एकादी स्त्री उपाशी असेल आणि तिच्या मैत्रिणीनें तिला विचारलें "काले बहीन जेवनं खानं ?" तर ती ठेकर देण्याचा अभिनय करून म्हणेल "हव्वा" मैत्रीण म्हणेल "काय खाल्लं वेहव्वा ?" "दूध अन् दैव्वा, मडकेभर शाक, वटभर कडी, दुरडीभर भाकरी, दर चांदकी, त्याच्या वरहे दु मनी अन् सग्गी माय असती करच्यान्हो खाय म्हनती !"

कृषिकांच्या या देशांत भारताचा पहिला कृषिपंडित खान्देशी निघाला यांत नवल नाहीं. यावल तालुक्यांतील व्यंकटराव पाटलांनीं हा मान पटकाविला आहे.

खान्देशाच्या खेड्यापाड्यांत नवचैतन्य निर्माण केलें. पू. साने गुरुजींनीं !

व्यापाऱ्यांच्या बरोबर पंडितांचीही गर्दी ! अमळनेरच्या प्रताप शेटजींनीं देशोदेशींचे विद्वान् अमळनेरच्या तत्त्वज्ञानमंदिरांत वेंचून आणले. भारतीय तत्त्वज्ञानाचा इथें सांगोपांग अभ्यास झाला. धुळ्यांत श्री. नानासाहेब देवांचें समर्थ वाङ्मयावरील प्रचंड संशोधन करण्यासाठीं उभारलेलें 'वाग्देवता मंदिर'! समर्थ वाङ्मयाचा असला खरा उपासक अन्यत्र क्वचितच् आढळेल !

महाराष्ट्राचे जनाखर्च अन् साहित्य एरंडोल येथील कागदावरच लिहिले गेले आणि एरंडोली न्याय आमच्या खान्देशांतच रूढ झाला.

एके काळीं गडकऱ्यांचा सकाळच्या अभ्यासांत धुळें, अंमळनेर, एरंडोल, पाचोरें अशीं नांवापुरतीच आलेलीं गांवें आतां स्वतंत्र वैशिष्ट्यानें चमकूं लागलीं आहेत. केशवसुत इथें एके काळीं गिरणातीरावर शाळामास्तर लागून रमले होते. फैजपूर व मेहुणबारे या गांवीं त्यांनीं वास्तव्य केलेलें आहे. बालकवींची प्रतिभा जळगांवच्या शाळेत कविसंमेलनांतच जन्मास आली. धरणगांवच्या विनायक कवींची कविता याच खान्देशांत दुमदुमली. बहिणाबाईच्या वेड्या-वाणीला मराठी रसिकांनीं डोक्यावर धरलें.

• • •




निरंजन कृष्ण

मराठवाडा हें मराठीचें माहेर. भाषेचें आणि संस्कृतीचेंहि. त्यामुळें या प्रदेशांत संशोधकांना व्यायाम फार. खणावें तितकें थोडें. पाळेंमुळें कुठवर गेलेलीं आहेत याचा निश्चित बोध होत नाहीं. ख्रिस्तपूर्व काळीं पैठणमधील वणिग्जन परदेशाशीं व्यापार करीत असा एखादा जरतारी धागा हातीं लागतो आणि घामाघूम झालेल्या संशोधकांचे हात आणखी शिवशिवतात !

पण पैठणचें सूत केवळ कोष्ट्यांशींच जमतें असें नव्हे. भरजरी पैठण्यांनीं पैठणची कीर्ति त्रिखंडांत पोंचवली हें खरें पण पैठण हें विद्येचें फार मोठें केंद्र. उत्तरेंत काशीचा जो महिमा, तोच दक्षिणेंत पैठणचा. संन्याश्यांच्या मुलांना उपनयन संस्काराचा अधिकार आहे कीं नाहीं याचा धर्मनिर्णय करून घेण्यासाठीं निवृत्ति-ज्ञानदेवांना आळंदीहून पैठणला जावें लागलें होतें; किंवा शिवाजीच्या राज्याभिषेकासाठीं काशीहून आलेले गागाभट्टहि मूळचे पैठणचेच. विद्येच्या क्षेत्रांत पैठणचा अधिकार इतका मोठा. देवगिरीचें माहात्म्य वाढलें यदुवंशाच्या राज्यांत. तत्पूर्वी प्रतिष्ठा हेंच राजधानीचें शहर होतें. पण इथें केवळ प्राचीन संस्कृत विद्येचेंच अध्ययन झालें नाहीं. अपभ्रंश भाषांनाहि राजाश्रय मिळाला. हालाच्या सप्तशतीचा उल्लेख या संदर्भांत करतां येईल. गुणाढ्याच्या बृहत्कथा तर खुद्द पैठणच्याच.

अजिंठा आणि वेरूळच्या चित्र आणि शिल्पकृती हा मराठवाड्याचा आणखी एक मोठा वारसा. आतांआतां कालपरवांपर्यंत स्वगृहींच वनवासी झालेल्या या कलाकृतींनीं आतां अखिल जगताचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतलें आहे.

ज्या प्रदेशांतला साधा निर्जीव दगडसुद्धां सजीव झाला, तिथल्या शब्दालासुद्धां नवेंच चैतन्य प्राप्त झालें असल्यास नवल नाहीं. मराठी ग्रंथरचनेचा प्रारंभ मराठवाड्यांतच झाला. आद्यकवींचें वास्तव्य याच भूमींतलें. 'अमृतातेंहि पैजा' जिंकणारा ज्ञानेश्वरांचा 'मऱ्हाटाचि बोल' इथल्या श्रोत्यांच्या कानीं प्रथम पडला. त्या ज्ञानियांच्या राजाच्या गळ्याला लागलेल्या अज्ञानवृक्षाची मुळी तोडण्यासाठीं पुढें सरसावलेले एकनाथ याच प्रदेशांतले. दासोपंत आणि कृष्णदयार्णव हे मराठींतले आणखी दोन प्रमुख कवी मराठवाड्यांतलेच.

मुसलमानी सत्तेचें पाऊल दक्षिणेंत पडण्यापूर्वी यादव वंशाचें राज्य या भूमीवर होतें. त्यांतला अखेरचा राजा रामदेवराय 'सकळ कलां'चा रसिक होता आणि 'न्यायानें क्षितीचें' पालन करीत होता अशी माहिती ज्ञानेश्वरांनीं पुरवली आहे. या राजाच्या पदरीं अमात्य म्हणून असलेल्या हेमाडपंतानें मोडी लिपीचा प्रसार केला आणि वास्तुशिल्पाचा एक विशिष्ट प्रकार रूढ केला. हेमाडपंती वास्तुशिल्प हा खास मराठी प्रकार अजूनहि ख्यातनाम आहे.

चौदाव्या शतकाच्या प्रारंभीं यादव साम्राज्याचा शेवट झाला आणि मुसलमानी सत्तेचें बीजारोपण या भूमीवर झालें. मुसलमान एकदां जो देवगिरीवर चढून बसला, तिथून खालीं उतरायला त्याला कित्येक शतकें लागलीं. पेशव्यांनीं अनेकदां निजामाला हात बांधून शरण आणलें, पण मुसलमानी पकड कायमची नष्ट झाली नाहीं. सरतेशेवटीं स्वातंत्र्योत्तर काळांत या भूमीचा गजेंद्रमोक्ष झाला!

इस्लामचें संकट केवळ राजकीय नव्हतें. 'अग्रतः चरतोः वेदान् पृष्ठतः सशरं धनुः' ही आर्यांची रीत. इस्लाममध्यें ती नेमकी उलटी झालेली. त्यामुळें इथली विद्या, परंपरा, संस्कृति, सर्वांनाच इस्लामनें ग्रासलें. प्रगति आहे तें संभाळणेंसुद्धां मुष्किल होऊं लागलें. मग पिढी दरपिढीनें त्यांचें जतन करणें दूरच राहिलें. मुसलमानी सत्ता उलथून टाकणारें मराठी राज्य सध्यांच्या महाराष्ट्रांत उदयास आलें आणि मराठी संस्कृति व तिच्या विकासाचें क्षेत्र साहजिकच बदललें. मराठवाडा सर्वतोपरीनें मागें पडला आणि इंग्रजी अमदानींत महाराष्ट्रानें केवढी तरी आघाडी मारली, तरी मराठवाडा मागासलेलाच राहिला !

[illegible]च्या शतकांत निजामी अंमल दुःसह नव्हता. [illegible] निजामाचे प्रधान मुख्यत्वें हिंदू आणि इतर सरकारी खात्यांतूनहि बहुंशीं हिंदूंचा भरणा असे. पण गेल्या शतकाच्या अखेरीस खालसा हद्दींत जातीय दंग्यांनीं डोकें काढलें आणि त्यांचा परिणाम इथल्या सत्ताधीशांवरहि झाला. हिंदूंची पद्धतशीर नाकेबंदी सुरू झाली. पण तिथलें प्रमुख संकट भाषेवरलें होतें. मराठी शाळा काढण्यास तिथें बंदी नव्हती; पण अशा शाळांनी ग्रँट मिळत नसे. शालोपयोगी पुस्तकें आणि अगदींच निरुपद्रवी वृत्तपत्र सोडलीं, तर इथें महाराष्ट्रांतून येणाऱ्या पुस्तकांना व [illegible] मज्जाव होता. हिंदूंच्या सार्वजनिक उत्स[illegible] बंदी होती. धार्मिक, सामाजिक आणि [illegible]णिक स्वातंत्र्यावर अशा प्रकारचे जाचक निर्बंध आल्यामुळें मराठवाड्यांतलें मूळचें मागासलेंपण वाढीला लागलें. राज्यकर्त्यांची मर्जी संपादन करण्यासाठीं स्वत्व सोडणारा आणि भाषा, वेष आणि आचारविचार याबाबतींत इस्लामी संस्कार उचलणारा वर्ग शहरांतून निर्माण होऊं लागला. मराठी वळण टिकलें खेड्यांत आणि बाद तेंहि मुख्यत्वें स्त्रियांनीं टिकवलें. हैद्राबादी किमाम ओटीपर्यंत आला, तिथून आंत शिरणें मात्र त्याला साधलें नाहीं !

मराठवाडा समृद्ध नसला, तरी दुष्काळीही नाहीं, त्यामुळें सरकारी नोकरींतून उच्चाटण झालें, तरी मराठी माणूस उपाशी राहिला नाहीं. किंकर्तव्यमूढ स्थितीमुळें [illegible] आळशी बनला आणि जुलमी राजसत्तेच्या दडपणामुळें तो सदैव भित्रा राहिला आणि त्याच्या महत्त्वा[illegible] पूर्णपणें खुरटल्या. तो सर्वस्वी दैवाधीन झाला! वाढणाऱ्या [illegible]वर कधींच तजेला [illegible] नाहीं, तशी मराठवाड्याची स्थिति झाली.

पण आतां मराठवाड्याचें नशीब उघडलें आहे. सात वर्षांपूर्वी त्याच्या मानेवरलें निजामी जूं खालीं उतरलें आणि आतां तर तो महाराष्ट्राशीं संलग्न होण्यासाठीं उंबरठ्यावर उभा आहे.




पु. भा. भावे

अरे मुंबईच्या पारव्या! मी काय सांगतों तें ऐक! हा बघ शरद्‌ऋतूचा प्रारंभ झाला आहे. गोव्यापासून गोंदियापर्यंत महाराष्ट्राचीं सारीं आकाशें आतां नितळ पडलीं आहेत. नद्यांचें पाणी निवळलें आहे. रानें आणि शेतें हिरव्या रंगानें मुसमुसून डोलत [illegible] वाऱ्याच्या सुगंधित लहरी वळसे घेत [illegible] तेथें खटाववाडींतल्या वळचणीं-[illegible] तूं काय करीत आहेस? भुलेश्वरांत फेकले जाणारे कोरडे दाणे टिपण्याचा तुला कंटाळा नाहीं का आला? परळच्या ट्रॅम नाक्यावरून तुला दिसतो तो महाराष्ट्राच्या आकाशाचा केवळ एक भाग आहे. आणि हा भाग पहा कसा गिरण्यांच्या धुरानें काळवंडून गेला आहे. वऱ्हाड नागपूरचा कापूस हा ह्या गिरण्यांचा प्राण आहे. तर मग तूं त्या विदर्भाच्या आकाशांतून कां एकदां फेरफटका मारून येत नाहींस?

भिऊं नकोस माझ्या पांखरा, भिऊं नकोस! विदर्भांतील पेटत्या उन्हाच्या कित्येक कहाण्या तूं ऐकल्या असशील. पण ग्रीष्मांत निखाऱ्यांचा वर्षाव करणारें नागपूर वऱ्हाडचें आकाशहि आतां ह्या सुंदर शरदाच्या किमयेनें पार पालटून [illegible] आहे. तुझ्या कोमल पंखांची लव मात्र तुला आतां सुखकारक होईल. इतकें शीतल असलेल्या मद्यासारख्या वायुमानानें विदर्भाचा अवकाश आज भरून गेला आहे. म्हणून म्हणतो, पसर पंख आणि पिवळ्या [illegible] भरलेल्या ह्या निळ्या आकाशांत कर उड्डाण!

...इगतपुरी, नासिक, मनमाड, चाळीसगांव, जळगांव आदि नगरें केव्हांच मागें पडलीं. लोहमार्गाची दिशा धरून चल असाच पुढें! हें बघ भुसावळ, वरणगांव आणि बोदवडहि मागें गेलें. समुद्र किनारीच्या पांखरा! मुंबईचा दमट ओलेपणाहि केव्हांच संपल्याचें आतां तुझ्या ध्यानांत आलें असेल. येथून आतां कोरडं वायुमान सुरू झालें! हे पहा आपण पश्चिम वऱ्हाडच्या परिसरांत येऊन पोहोंचलों! ही तूं आतांच मागें टाकलीस ना, ती मलकापूरची नळगंगा नदी! आहे कीं नाहीं छान नांव? हें नांव तुला एकदम प्राचीन काळांत नेऊन सोडतें कीं नाहीं? अशाच डौलदार नांवाच्या आणखी दोन नद्या ह्या मलकापूर तालुक्यांत आहेत. एकीचें नांव ज्ञानगंगा आणि एकीचें नांव विश्वगंगा! केवढीं मोठालीं नांवें आहेत! हीं नांवें ऐकून असे वाटतें कीं जणू आपण रुक्मिणी - शिशुपालाच्या काळांत वावरतों आहोंत! पण [illegible] हाग पडलेल्या एखाद्या पल्लेदार नांवाच्या पाटलासारखीच ह्या नांवांची अवस्था आहे! ह्या नळगंगा नदींत वाहतं पाणी तुला कुठें दिसतें आहे का पहा! आत्तां कुठें पावसाळा संपतो न संपतो तोंच ह्या नदीची दशा झाली आहे. लवकरच हिला खाडे पडतील. मग राहील नुसती वाळूची नदी. ती सिरच्या वाळत घालायला आणि टरबुजं लावायला पुढें कामी पडेल! हें मलकापूर तर कायं धुळीचं आगरच आहे. मूर्तिजापूर, धामणगांव, शेगांव, वऱ्हाडच्या मधल्या पट्ट्यांतलीं सगळींच गांवं हीं अशीं आहेत. उन्हाळ्यांत धरणीला शोष पडला म्हणजे तर कांहीं विचारूं नका! उन्हाच्या सपाट्यानं आधींच वैराग झालेला "निसर्ग" ह्या धुळीनं माखला म्हणजे फारच मलूल दिसूं लागतो. जळत्या शेगडीची उपमा इथें अगदीं राखेच्या शेवटच्या कणापर्यंत लागूं पडते. तेव्हां मुंबईच्या नितळ वायुमानाला सरावलेल्या पाखरा, हे दिवस दिवाळीचे आहेत हें खरेंच बरें आहे. नाहींतर नारींच्या ह्या वऱ्हाडचें सपाट रूप पाहून तूं घाबरून गेला असतास. एकूणच, यामळी आणि आंबा हाच इथला "निसर्ग" आहे. तुझ्या डोळ्यांना समुद्र, खाड्या, डोंगर आणि डोलणारे माड ह्यांची सवय आहे तेव्हां हा प्रदेश तुला ओकाबोका वाटला तर मला मुळींच नवल वाटायचं नाहीं. समुद्राचं अफाट पाणी पहायची तुला सवय आहे. इथें मलकापुरांत तुला पाण्याचं दर्शन घ्यायचं असलं तर खोलच खोल विहिरींत गिरक्या घेत जावं लागेल. इथं पाण्यांच्या पुन्हां दोन तऱ्हा—खारं आणि गोड! समुद्राजवळीकडे कुठं खारं पाणी असतं हें तूं कधीं ऐकलं होतंस का? पण वऱ्हाडांत पुष्कळ ठिकाणीं हा प्रकार आहे. डोळे फिरविणाऱ्या विहिरी आणि मचूळ पाणी!

वऱ्हाड कापसाचा आणि ज्वारीचा प्रदेश आहे. तुला ज्वारीच्या आणि कापसाच्या शेतांत मधूनच बारीक पिवळ्या फुलांच्या मुठी उधळल्यासारख्या वाटतात. तीं तुरीचीं फुलं. कपाशीचीं बोंडं फुटलीं म्हणजे शेतांत लाह्या फुटल्याचा देखावा दिसतो. मग मलकापूरचा शेतकरी निघतो खामगांवच्या बाजारीं! ह्या कापसानंच वऱ्हाडला एके काळीं गबर केलं होतं. वऱ्हाडी माणसाच्या मोकळ्या हाताला आणि उदार वृत्तीला पहिला आधार आहे त्याच्या


श्री होनाजी, नागपूर

परंपरेचा आणि दुसरा आधार आहे त्याच्या पैशाचा! वऱ्हाडचा माणूस डोक्यानं थोडा कच्चा असतो, असा महाराष्ट्राच्या अन्य भागांत प्रवाद आहे! पण भुलेश्वरच्या भोळ्या पांखरा! आजच्या जगांत सरळपणालाच खुळेपणा म्हणतात, आणि औदार्यालाच मूर्खत्वाची पदवी देतात त्याला काय करायचं? तूं मुंबईचं हस्तरोख जग बघितलं आहेस. त्या मानानं इथलीं माणसं भोळ्या मनाचीं आहेत. त्यांच्या कपड्यांवरूनहि इस्तरी फिरलेली नाहीं आणि



अनुक्रमणिका

काळजांवरूनहि फिरलेली नाहीं! मोकळीं माणसं आहेत बापडीं! मित्रत्वाला चांगलीं आहेत, शेजाराला चांगलीं आहेत, आदरातिथ्याला उत्तम आहेत, व्यवहाराला सरळ आहेत. आंत एक बाहेर एक असं त्यांच्यापाशीं नाहीं! मनानं तीं हळवीं आहेत आणि उमाळ्यानं प्रेम करणं हें माणसलेपणाचं लक्षण, असं अद्यापहि तीं मानत नाहींत. मोजून मापून बोलावं, मोजून मापूनच प्रेम करावं हा त्यांचा स्वभाव नाहीं. तीं अघळपघळ बोलतील, अघळपघळ वागतील, न आंबलेला, न गारठलेला जिव्हाळा हाच मुळीं वऱ्हाड नागपूरचा आत्मा आहे. फॅशनेबल पांखरा! त्या बोलण्या वागण्याचं तुला कदाचित् हंसू येईल. अनोळखी गोष्टी पुष्कळदां अनोळखीपणामुळेंच हास्यास्पद वाटत असतात. आतां हेंच पहाना! ह्या मलकापूरला "अठी" "तठी" आणि "भो"ची भाषा सुरू होते. "अठी" म्हणजे इथें, "तठी" म्हणजे तिथें आणि "भो" म्हणजे भाऊ! पश्चिम वऱ्हाडांत हें "भो" पुष्कळ वाक्यांच्या शेवटीं येतं. "अठी बस ना रे भो!" "भाकर खाली भो?" ह्याचं निश्चित तुला हंसायला येईल! आणि वऱ्हाडी माणसं हंसतात हेल काढणाऱ्या कोंकणच्या अनुनासिक उच्चारांना! "ताक भात आणि आळवांच्या देठी"ची तीं चेष्टा करतात! कारण हीं माणसं आहेत जवारीची भाकरी आणि तुरीचें वरण खाणारीं! वणी चंद्रपूरच्या तिखटाचा नुसता रंग तुझ्या डोळ्यांना पाणी आणील, पांखरा! नागपूरचा आहार मात्र गव्हा तांदळाचा आहे. तिथें कुणी जवारीची भाकर सहसा खात नाहींत. वऱ्हाडीच्या मानानं नागपूरचा माणूस अधिक तिखट आणि लढाऊ आहे. एरवीं जिव्हाळा, अगत्य वऱ्हाडचेंच. मलकापूरचा अशिक्षित बंधू केव्हांला "येय" म्हणेल तर नागपूरचा त्याचं वर्गोतला बांधव केव्हांला "करे" म्हणेल! मृदु आणि तिखट असा हा शब्दोच्चारांतलो आणि स्वभावांतला भेद आहे. शब्दधर्मातीच्या गमती—आणखीहि पुष्कळ सांगतां येतील. ओल्या वाटाण्याच्या दाण्यांना तिकडे म्हणतात "पोपट" आणि त्या दाण्यांची उसळ म्हणजे अर्थात् "पोपटाची उसळ!" आळूच्या पानांना म्हणतात "पोथीचीं पानं" आणि ही पोथी अर्थातच तोंडाशीं आणि पोटाशीं सलगी करते! पश्चिम वऱ्हाडांत जसें संबोधन म्हणून



"भो" वापरतात तसें नागपूरला वापरतात "गा". जसं "काऊन गा!", "ये ना गा", "बैस ना गा!" वगैरे. मुंबईच्या सुसंस्कृत पांखरा! तुला हें वऱ्हाडचें "भो" आणि नागपूरचें "गा" सुद्धां अनोळखीपणामुळें हास्यास्पद वाटेल! पण खुळ्या पांखरा! अरे हें अगदीं विद्वत्मान्य आणि प्राचीन "गा" आहे! मोरोपंतांनीं प्रख्यात केलेला "अगा प्रणतवत्सला" मधला "गा" तो हाच आहे! विसरूं नकोस पाखरा, ही भूमी फार प्राचीन आहे. ही रुक्मिणीची आणि भवभूतीची भूमि आहे! ही वैदर्भी रीतीची भूमि आहे! ज्ञानगंगा, विश्वगंगा, नळगंगा, वरदा ह्यासारखीं नद्यांचीं नांवं आणि भद्रावती (भांदक), चंद्रपूर (चांदा), वत्सगुल्म (वाशिम) ह्यासारखीं नगरांचीं नांवं इथें उगांच सांपडत नाहींत. चांद्याजवळच्या कालिका मंदिराचा संबंध तर थेट, मालती माधवाशीं लावला जातो. चांदा नगराच्या परिसरांतच काळ्या प्रचंड प्राचीन मूर्ति आजहि ऐन उघड्यावर लोळत पडलेल्या आढळतात. पूर्वींहि इथें अशीच धूळ होती कीं हा भाग दाट वनांनीं व्यापलेला होता कुणास ठाऊक! कोमल पांखरा! शिशुपाल रुक्मीच्या काळांत ह्या इथें अशीच धूळ असेल तर बापड्या रुक्मिणीला ह्या धुळीचा शिशुपालरुक्मीइतकाच त्रास झाला असेल! जिथून रुक्मिणीचें कृष्णानें हरण केलें तें अंबा मंदिर आजच्या विदर्भात आहे म्हणे! अमरावती हें मलकापूरपेक्षां जास्त बरें गांव आहे इतकेंच! अमरावतींतला तो "भुसार गेट", तो "नपुना" आणि ती "दर्शनसाथ" पाहिल्यावर रुक्मिणीचा ह्या परिसराशीं संबंध लावणें तुला फार जड वाटेल! म्हणून मीं म्हणतां तूं इथें फारसा थांबूच नकोस! अमरावती हें विदर्भाचें राजधानीचें नगर! इथला "कँप विभाग" चांगला आहे. कँप विभाग सगळीकडे चांगले असतात! रुक्मिणी त्या काळच्या "कँपांत" रहात असेल अशी आपण कल्पना करूं या! पण कँप ही निर्मिती आहे साहेबाची. ती त्याच्या कर्तृत्वाला शोभेल अशीच आहे. आणि आमची

निर्मिती आहे "भुसार गेट", "नपुना" आणि "गुलाम पुरी"! ही अमरावती [illegible] सोडतांना तूं पंख उभारून त्या रसिक आणि [illegible] देशभक्ताच्या स्मृतीला, श्री. दादासाहेब खापर्ड्यांना तेवढी वंदना दे! अकोला आणि खामगांवचें तूं केवळ विहंगमावलोकन कर! वाटल्यास टेक क्षणभर एखाद्या तारेच्या खांबावर! खामगांवच्या भोंवती बघ कशा उघड्या बोडक्या टेकड्या आहेत! खामगांव ही कापसाची काशी! अकोला तसें उभारलेलें गांव आहे. लोहमार्गावर वसलेलीं मध्य विदर्भांतलीं हीं गांवें म्हणजे परस्परांच्या लहान मोठ्या आवृत्त्या आहेत. मैलोगणती पसरलेली तीच सपाट काळी भूमि, तींच पिकें, तींच धूळ, तशींच माणसें! पण एक मात्र सांगून ठेवतां पांखरा! इथला उन्हाळा कडक असेल पण रोगट नाहीं. जे ह्या उन्हांत जन्मले त्यांना ह्या उन्हाचा अर्क उत्तम मानवतो. शेजारीं पाण्याचा खुजा ठेवून उन्हाळ्यांत मोकळ्या आभाळाखालीं निजण्याची मौज तुला काय सांगूं पाखरा! ती मौज पाहण्यासाठीं तरी तूं एकदां उन्हाळ्यांत इकडे ये. आणखी [illegible] पहा, वऱ्हाडांत रात्री थंड असतात [illegible]

तूं विचारशील पांखरा, कीं [illegible] नागपूर हें असंच का? नाहीं—नाहीं—तसें मुळींच नाहीं! तूं मलकापूर पाहिलंस ना? तिथून तूं नुसता घाटावर बुलढाण्याला जा! अगदींच थोडं अंतर आहे. पुणें जास्त थंड का बुलढाणा हें तुला खरोखरच सांगता यायचं नाहीं. लोहमार्गापासून दूर सरकलेलं हें टुमदार गांव मोठ्या आल्हादकारक वायुमानाचें आहे. चिखली मेहेकर सारखीं घाट वरचीं गांवं थंडच आहेत. अगदीं उन्हाळ्यांत थंड! चिखलीला तर संध्याकाळीं दोन तास पाणी नुसतं उघड्यावर ठेवलं कीं तें बर्फ घातल्यासारखं गार होतं. उंचवठ्यावरच्या ह्या गांवाची वनश्रीहि बऱ्यापैकीं आहे. अकोल्यापासून पंचावन साठ मैलावर असलेलं वाशीमही असंच थंड आहे. वाशीमचा बालाजी मोठा प्राचीन आणि प्रसिद्ध आहे.

चिखलीहून देऊळगांवराजा आणि [illegible] जातां येतं. ह्या दोन्ही गांवांचें शिवाजी महाराजांशीं अगदीं जवळचें नातं आहे. देऊळगांव [illegible] आहे. पण आहे मात्र उघडं बोडकं. [illegible] प्रसिद्ध पुन्हां उंचवट्यावरच आहे. हे बापूजी अण्यांचं गांव. इथेंहि मध्य विदर्भाची आणि नागपूरची वळवळ नाहीं. आणि चिखलदरा [illegible] चिखलदरा तर बोलून चालूनच थंड वायुमानाचें

स्थान आहे. इथ यें कित्येक दृश्यं खरोखरच सुंदर आहेत. साहेबांनीं स्वतःसाठीं राखून ठेवलेल्या "अपर प्लेटो"-वर "फर" "सायप्रस"ची राई आहे. आणि जवळच आहे गाविलगडचा प्रसिद्ध किल्ला! मुख्य म्हणजे थंड वायुमानाच्या ठिकाणीं आढळणारी गजबज आणि गर्दी इथें नाहीं. भोंवताली पर्वतांच्या रांगा आहेत. दाट रानें आहेत आणि आहे पूर्ण एकांत. नागरी जीवनाचं चिन्ह म्हणून तुला इथें आढळायचं नाहीं.

गड्या पांखरा! हें तूं मागे [illegible] ना, तें गांव वर्धा. वर्ध्याविषयीं जास्त काय सांगायचं? इथून जवळच सेवाग्रामला गांधीजी रहात असत. आतां जवळच पवनारला विनोबांचा आश्रम आहे. एरवीं गांवासारखा गांव. वर्ध्याहून आपण जाऊं चांद्याला. चांदा हें पुन्हां प्राचीन गांव आहे. गांव आहे लाल मातीचं. भोंवताली शाबूत तट आहे. जवळच भद्रावतीची पुरातन वास्तू आहे. चंद्रपुरी वडा फार प्रसिद्ध आहे. चांद्याचे लोक [illegible] खाण्यांत मोठे पटाईत! "[illegible]झलवार", "सोमलवार" "दुपल्लीवार" [illegible] मुंबईकरांना फार विनोदी वाटणाऱ्या [illegible]चं हें आगर आहे म्हणेनास! इथून [illegible] बल्लारपूरला आहेत कोळशांच्या खाणी. पण तुला पांखराला काय तो कोळसा खायचा आहे? तुला इकडे आणलं तें चांद्याचीं प्रसिद्ध जंगलं पहायला. ताडोबाचा तलाव आणि जंगल खरंच पाहण्यासारखं आहे. तिथल्या जंगल [illegible]तल्या नोंदणी पुस्तकांत हिंदुस्तानांतल्या मोठमोठ्या शिकारी राजे-राजवाड्यांच्या स्वाक्षऱ्या आणि शेरे सांपडतील. साऱ्या हिंदुस्तानांत हें जंगल वाघासारख्या वन्य श्वापदांसाठीं प्रख्यात आहे. ह्या रानांतून रात्रीचा प्रवास करणं हा एक रोमांचकारी अनुभव आहे. वाघ चित्त्यापासून हरीण ससापर्यंत शेंकडों प्राणी इथं तुझी चौकशी करून जातील! पांखरा, शेंकडो हा शब्द अलंकारिक अर्थानं वापरलेला नाहीं. हें जंगल मुळांतच त्यांच्यासाठीं राखून ठेवलेलं आहे. ह्या रानांत आणि ह्या भागांत पहाण्यासारखं [illegible] आहे. अगदीं परवांपर्यंत इथल्या गहन [illegible]ल्या वनचर जाती शीर-शिकारीचा [illegible] (H[illegible]ing) खेळ खेळत असल्याचं [illegible]नीं नमूद करून ठेवलं आहे.

[illegible] राखी रंगाच्या पारव्या! चांद्याहून तूं आतां थेट चल नागपूरलाच! वऱ्हाडच्या तुलनेने नागपूरची शेती हलकी आहे. इथं पैकेंहि थोडीं वेगळीं आहेत. पण धड काळजाच्या मर्दान्या माणसांचं पीक मात्र इथें भरपूर येऊन गेलं. धर्मवीर डॉ. मुंजे इथलेच, डॉ. हेडगेवार इथलेच. कंकय्या नायडू इथलाच. अ. ब. कोल्हटकर आणि ज्ञानकोशकार केतकर ह्यांचंहि कांहीं कर्तृत्व इथेंच घडून गेलं. असामान्य माणसं प्रतिदिवशीं उत्पन्न होत नाहींत हें खरंच. आज इथें आहे



एक नागपूरचा वयोवृद्ध राजा, तो मात्र आपल्या धर्माला आणि रक्ताला विसरलेला नाहीं. बरं मग पांखरा, जा एकदां सक्करदऱ्याला आणि रघोजीराव हें प्रख्यात नांव सांगणाऱ्या त्या शेवटच्या भोंसल्याला विनतकार प्रणाम करून ये! पराक्रमाचा इतिहास सांगणारी ती अखेरची वीरगाथा आहे!

आणि नंतर पांखरा, नागपूरनगरांत काय पाहशील तूं? नगर म्हणून पाहण्यासारखं विशेष येथें कांहींच नाहीं. नागपूरचीं लुगडीं, नागपूरचीं धोतरें, तुला काय उपयोग त्यांचा? तूं इथें एम्प्रेस मिल पाहशील कीं मॉडेल मिल? पण गिरण्यांचे भोंगे मुंबईत काय कमी दिसतात? जुनं नागपूर जुनाट आणि गलिच्छ आहे. तिथें तुझा जीव गुदमरून जाईल. चिखलदरा आणि मलबारहिल पाहिल्यावर पॉईंट आणि सेमिनरी टेकडीचं कौतुक तुला वाटणार नाहीं. समुद्र तटावरून आलेल्या तुला तेलखंडी, गोरे व्याडा आणि अंबाझरीचे तलाव तरी मी कसे दाखवूं! आणि "राणीचा बाग" पाहिल्यावर "महाराज बागेचं" कौतुक तुला कितीसें वाटेल? जवळ जवळ पुण्याइतक्या वस्तीच्या ह्या गांवांत 'मेट्रो', 'इरॉस'सारखें पटगृह नाहींच पण 'हिंद विजय'सारखेंहि नाहीं. एखादें मोटेंसें पुस्तकांचें दुकान इथें नाहीं. अन्नपाणी मात्र मोल्यानारखें आहे आणि माणसें सोन्यासारखीं आहेत.

प्रवासी पाखऱ्या, इथलं संत्रा मार्केट पाहणार काय तूं? पण अजून संत्र्यांच्या मोसमच सुरू झालेला नाहीं. इथलीं संत्रीं मात्र चाखायला पाहिजेस तूं! आणि संत्र्यांच्या फुलांचा गंधहि घ्यायला पाहिजेस! असा गोड सुगंध असतो म्हणून सांगूं! पण हे संत्र्यांचे दिवसच नाहींत.

भाजी मात्र इथें खूप मिळते. तशीं मोसनांत संत्रीं. टमाटे मुंबईला आज एक रुपया शेर आहेत, इथें लवकरच मिळूं लागतील एकटोन आणे पासरी आणि इथें टमाट्याला काय म्हणतात ठाऊक आहे का?—"भेदर!" कधीं ऐकला होतास हा शब्द? "जागोबा", "डोनाजी" ह्यासारखीं नांवं तरी तूं कधीं ऐकलीं होतींस का? पण हीं दोन नांवं अगदीं [illegible] नागपूरचींच आहेत. हिंदी ही नागपूरच्या लोकांची जवळ जवळ दुसरी भाषाच होऊन बसली आहे. ते मराठी बोलत नाहींत तेव्हां हिंदी बोलतात आणि पुष्कळदां ते मराठी बोलतच नाहींत. पण हा आहे मात्र महाराष्ट्रच बरं का, अगदीं शंभर टक्के महाराष्ट्र आहे.

आतां जाऊं या आपण "रामटेक"कडे. पवित्र स्थान आहे. अंबाळा आणि खिंडसी तलावा-जवळचीं निसर्ग-दृश्येंहि चांगलीं आहेत. खिंडसी डोंगरावरचा डाकबंगला तर प्रसिद्धच आहे आणि डाकबंगल्याच्या अगदीं खालीच



२१

आहे खिंडसी तलाव. भोंवतालीं झाडी आहे. चांगलं ठिकाण आहे. येतांना वाटेवर आपल्याला "मनसर" च्या मॅंगनीजच्या खाणी लागल्या पण आपण इथें आलों आहोंत रामाच्या दर्शनाला. ते वरितल्स डोंगरावरच्या देवळांचे कळस? तें रामाचें मंदिर आहे. नागपूरला "सीताबर्डी" आहे आणि ह्या गांवाचं नांव आहे रामटेक! नांवावरूनच गांवाची जन्मकथा तुझ्यासारख्या चतुर पोरांच्या ध्यानांत येईल. ह्या वेळेपुरती संपली आपली यात्रा. प्रवास घाईचा झाला, आणि पाहण्याचं पुष्कळच राहून गेलं. नागपूर, रामटेक म्हणजे मराठी प्रदेशाचा शेवट नव्हे. अजून कांहीं तास प्रवास केलास तरी मराठी प्रदेश संपायचा नाहीं. आणि आतां तुझ्यापाशीं वेळ तरी कुठं आहे?

• • •



# कठिण बाई बडोद्याचि चाकरी

शांताराम सबनीस

बडोद्याला मराठे हजारांनीं आहेत. त्यांच्या भोंवतालचें अडीचशें वर्षांचें संस्थानी राजकीय कुंपण आतां उखडलें गेलें आहे. आतां भोंवतालच्या गुजराती जीवनाशीं त्यांची देवघेव पूर्वीपेक्षां वाढणार तरी वेगळा मराठी ढंग आहेच आणि तो फार काळ रेंगाळणार. बडोदें संस्थानच्या दूरच्या ठाण्यांवर मराठी माणसें होतीं; आतांही आहेत. परंतु तीं मूठभरच. अहमदाबादेंत गिरण्यांनीं मराठी कामगारवर्ग खेंचून घेतला; शिवाय तेथें आणखीही मराठी चाकरमाने आहेत. तेथें हजारोंनीं मराठे आहेत, त्यांच्या खास वस्त्या आणि संस्था आहेत; परंतु त्यांच्यावर कळा आश्रितांचीच आहे. अहमदाबादचे मराठे बळचणीला उभे राहिल्यासारखे अंग चोरून असावेत हें जुन्या अर्थांत त्यांनीं फाजील ताटयांत चालावें ... इतकेंच साहजिक आहे. ... पुष्कळ सांगतां येईल ... ओल्या वाळूच्या दाण्यांना तिखट ... होती. "पोपट" आणि त्या दाण्यांची खास गायक-... अर्थात् "पोपटाची उसळ कदां शिवाजीनें पानांना म्हणतात "पोथीनीं भडोच लुटलें पोथी अर्थातच तोंडाशीं आणि ... लेले हे करते! पश्चिम वऱ्हाडांत जसें संबोधन ... या भागांतल्या मराठी संस्कृतीचा खरा संस्थापक पिलाजीच. लूटमारवाल्या मराठ्यांचा "ज्याच्या खिशांत सुर्ती (रुपया) तो मंगलमूर्ति" हा दंडक होता तर पिलाजीचा आणि नंतरच्या गायकवाडांनीं 'ज्याचें फळ खावें त्याचें फूल न तोडावें' ही सावधगिरी ठेवल्यामुळें गायकवाडांच्या सत्ता भागांत रुजली, वाढली आणि टिकली.

या गायकवाडांचे आणि एकंदर गुजरातेंतील मराठ्यांचे महाराष्ट्राशीं निकटचे संबंध होतेच. पेशवेकालीन परशुराम वगैरे अनेक शाहीर दक्षिणेंतून बडोद्याला येऊन येले. कलावंत येऊन गेले. कलावंत खात्यांत तमासगीर, लावणीकार यांना आश्रय होता. 'वीरक्षेत्री लावण्या' हा तीन भागांचा आणि सुमारें साडेपांचशें पृष्ठांचा संग्रह त्या काळीं बडोद्याहूनच प्रसिद्ध झाला. महाराष्ट्रांतून माणसें नोकरीसाठीं बडोद्यास तेव्हांही येत. १८७५ सालीं मल्हारराव गायकवाडांच्या पदच्युतीच्या वेळीं पुण्याच्या सार्वजनिक सभेनें एक लाख रुपयांचा सहाय्यनिधि गोळा करून बडोद्याला पाठवला होता.

गुजराती-मराठी साहित्यांत बडोद्याचें महत्त्व फार. दोन्हींत देवाणघेवाणही मोठी. प्रेमानंद, दयाराम, गिरिधर असे गुजराती संतकवि बडोद्याचे. 'बडोदरा ग्राम हुं वेष्णवें भयुं गोपीचंदन मोंघुं (महाग) कर्युं" असा ... तक्रारसुद्धां इथलीच. दयाराम या अठराव्या शतकांतल्या गुजराती कवीनें मराठी अभंग लिहिले. उलट बापूसाहेब गायकवाड आणि राधाबाई या तत्कालीन स्थानिक महाराष्ट्रीय संतांना गुजरातींत मान मोठा. मेघदूताचें पहिलें गुजराती भाषांतर (१८६६) बळवंतराव जुन्नरकरांचें. वेलसऱ्यांचा इंग्रजी-गुजराती कोश विख्यात. अर्वाचीन काळांतले काकासाहेब कालेलकर आणखी एक उदाहरण. ते गुजरातींतच फार लिहितात.

साहित्याप्रमाणें इतर कलांतहि असेंच. बडोदें सरकारच्या, देशी नाटक समाज या गुजराती नाटकमंडळीला तसा आपल्या गंधर्व नाटकमंडळीलाही एका वेळीं आश्रय होता. आपल्या भाऊराव कोल्हटकरांचें वास्तव्य इथलें.

'आपणां' कृष्णराव चोणकर मराठी नाटकांत कामें करतात ही गुजरात्यांना नवलकथा वाटते, म्हणतात! बालेबुवा, लक्ष्मीबाई जाधव, मीराबाई वाडकर, सनईकार वसईकर हे ... कलावंत बडोद्याचेच. छकड्या, लावण्या व पोवाडे यांना बडोद्यानें मोठें उत्तेजन ...

बडोद्याला जाति धर्मांचा आणि प्रांताप्रांतातील पक्षपात मान्यच नव्हता. फैय्याजखां, मौलाबक्ष, यांनाही गुजराती, मराठी कलावंतांबरोबर इथें आश्रय लाभला. क्रिकेट अणि टेनिस क्षेत्रांतले भारतभरचे अतिरथी महारथी इथें आश्रयाला असत. (खुद्द राजघराण्यांतही मातब्बर खेळाडू झाले.) हिंदविजय जिमखान्याच्या वार्षिक



स्पर्धांसाठीं देशभरचे खेळाडू येथें जमत. ... रविवर्मा, प्रमोद कुमार चतर्जी, नंदलाल ... बुधवारकर हे सारे बडोद्याचे. आजही ... वेन्द्रे, राव, मार्कंड भट, शिल्पकार कोल्हटकर, राघु चौधरी, चव्हाण हे बडोद्यांत सयाजी विश्वविद्यालयाशीं निगडित आहेत.

आणखी अशीच इतर क्षेत्रांतली यादी

"मी अन्नाविन मरतें आहे
[illegible] सागरीं बुडून मेला!
साहित्यावर तुम्ही त्याच्या
काय बांधितां नवीन इमला? ४

अशीच जातें शोधित पत्ते
पत्रचालकां सर्व भेटतें
आणि टांगते वेशीवरती—"
पुढें हुंदके, शब्द निसुटते. ५

जाहिरातिचें महत्व होतें
प्रकाशकाला जुकतें पटलें
'बनीवनाई पार विघडला'
पराजिताचें मन पुटपुटलें. ६

[illegible]सा दसां तो प्याला पाणी
आणि कोरडे शब्द बोलला
"ठाउक नव्हतें मजसीबाई
अर्धा हिस्सा देतों तुजला." ७

त्या शब्दांनीं विलीन झालें
प्रकाशकाचें राज्यच अवें
"ठीक जाहलें, वला टळाली
तूंच तारि[illegible] माय शारद!" ८

'अनिष्टांतुनी इष्ट उपजलें
[illegible] थोडा बसेल चट्टा
[illegible]जायाकृत चरित्र कविचें
[illegible]रकेन मिळवूं मीच एकटा! ९

होतो आहे होउं देत तो
नफ्यांत माझ्या अर्धा तोटा
ख्यातिकरास्तव सिद्धच आहे
स्वच्छ वह्यांवर हिशेब खोटा." १०

अर्ध क्षणाच्या अर्ध्या समयीं
विचार इतुका करुन मानसीं
'बसा' म्हणाला प्रथम प्रकाशक
अवघडलेल्या कविभार्येसी. ११

बसला ढोबळ, बसे वत्सला
समझोत्याचा झाला कागद
सुखें शृगालिस खाऊं देतो
वनराजाही अपुली पारध! १२

इसार म्हणुनी दिधल्या त्यानें
दहा [illegible]या शंभर नोटा
कागद ठेवायास्तव जपुनी
'चू. का. ढोबळ' छाप लखोटा. १३

[illegible]त पेय मग झालें त्यावर
[illegible]ऐतळली अन् दुपार थोडी
[illegible]चरित्र गुंफा पतिदेवाचें'
[illegible] प्रकाशक ल्हाडीगोडी! १४

ऐकतांच हे शब्द तयाचे
रडूं लागली उगा वत्सला
'उरल्या आतां स्मृतीचे तुक[illegible]या!'
आणि हुंदका नवा दाटला. १५

'मरणाधिन हा मनुष्य-प्राणी
घडलें तें तर गेलें घडुनी
अपणासाठीं ठेवुन अमृत
गेला तुमचा गरुड उडुनी.' १६

कविकान्तेच्या सांत्वनसमयीं
कवित्व सुचलें प्रकाशकाला
तबला पेटी शिरीं वाहतां
गीत सुचावें जसें हमालां! १७

'लिहीन त्यांचें चरित्र आतां—'
स्फुंदत बोले सती वत्सला—
'तवा तापला आहे तोंवर
करा फोडणी लसूण सोला!' १८

या उपमेनें पटली महती
पाकनिपुण त्या कवीकलत्रां
'उद्यांच करिते शुभारंभ मी
लिहावयासी कवीचरित्रां. १९

द्रव्य, लिफाफा, निरोप 'वंदे'
इतुक्यासह ती उठली महिला
आस्थेवाइक चू. का. ढोबळ
पुनश्च खुर्चीमाजीं पडला. २०

घरीं परतली जधीं वत्सला
हज्जाराची घेउन रोकड
बंद कवाडापुढें तियेच्या
घेणारांची होती झुंबड! २१

परीट, गवळी पेपरवाला
नाक्यावरचा बुटका वाणी
झाडुन सारे जमले होते
ज्यांचीं ज्यांचीं होतीं देणीं! २२

पै-पैशासह देउन देणीं
मुक्त जहाली प्रथम [illegible]
स्वच्छ ठेवुनी कवाड उघडें
देह तिचा मग खालीं वसला. १३

भटकत होतें चित्त परन्तु
कवीचरित्रामागें कोठें!
कसें निभावुन न्यावें आतां
कसें लिहावें मुळांत खोटें! १४

नव्हती जाया अजुन कुणाची
कुमारिका ती दीन वत्सला
सौभाग्यच जर नव्हतें आधीं
वैधव्याचा संभव कुठला? १५

५

असेच गेले कांहीं महिने
कविकांतेनें नाहीं गणिले
कवीचरित्रें आणुन कांहीं
प्रसंग त्यांतिल विवडुन विणले![14] १६

असें चाललें चरित्रलेखन
प्रकाशकाचा गिळीत मलिदा
फुका पासरी महाग नव्हता
भांडवलाविन अल्प फायदा!

निवातांतिल वास सोडुनी
नवीन घेडं फ्लॅट वत्सला
कवी चरित्रा गुंफायास्तव
एक 'लेखक' तिनें ठेविला ३

रोज सकाळीं शुभ्र नेसुनी
उदबत्त्यांचीं लावुन झाडें
सांगत होती कविभार्या ती
कविराजाचे जुने पवाडे! ४

टिपून होता घेत लेखक
तिच्या मुखांतिल पडतें अक्षर
कवीचरित्रां येउं लागलें
रूप कांहिंसें गूढ मनोहर!

सहवासानें प्रीत [illegible]
अकल्पितानें डाव [illegible]
मुक्यासारखी वसू लागली
लेखक आणि सती वत्सला! ६

एक थांबलें चरित्र आणि—
घडूं लागलें दुसरें कांहीं
उघड बोलण्याइतुकें साहस
नव्हतें पण त्या दोघांनाही. ७

पार थांबलें लेखन आतां
बोलुं लागल्या दोन्ही नजरा
त्या विधवेच्या वेणीमाजीं
एके दिवशीं आला गजरा! ८

हळूं हळूं मग फुटूं लागल्या
भीत मनांना कातर वाचा
'प्रतारणा मी करते आहे!'
'चाकर देवी मी पण तुमचा!' ९

'भाळावरच्या हिरव्या रोपां
येइल का कधि नवा फुलोरा?'
'स्वीकारूं मी कसा वत्सले
ह्या देवाचा हा देव्हारा?' १०

एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं
चौपाटीच्या वा ळू व र ती
अंधारांतच बसल्या होत्या
प्रीत[illegible] दोन आकृती ११

पार्श्वसंगतां सागर-[illegible]
जु[illegible] नायिका नम्रखा नायक
गोड [illegible]णझिण्या छेडित होते
शब्दाआ[illegible]ीं मन्मथ गायक! १२

जरा खळाळुन गेले आंसू
आंम [illegible]सवा वाजुन सारी
[illegible]. वत्सला, 'प्रिया केशवा,
मी नच विधवा, अजुन कुमारी.' १३

१४ विणकाम ही फक्त स्त्रियांचीच कला आहे.

टुणकन् मारी उडी लेखकू
घामाघुम हो त्याची मुद्रा
'अथांग असतें अबला जीवन
तुझ्याहुनीही खोल समुद्रा!— १४
ऐक सांगतों मीही राणी
गूज राखिलें आजवरीं जें
ज्यास गुंफिसी तूं स्वेच्छेनें
तें तर आहे चरित्र माझें! १५
मीच कवी तो बुडलों होतों
व्योमामधुनी महासागरीं
दुर्दैवानें तगलों आलों
मुंबापुरितें या माघारीं. १६
कसा वाचलों, कैसा जगलों
कथा सुरस ती केवळ अद्‌भुत
खण्डकाव्य तें कधीं लिहावें
ऐसें आहे अजुन मनोगत. १७
[illegible] तां, मला उमगलें
माझी [illegible] खपली पुष्कळ
आणि तियेवर [illegible] जाहला
फुका प्रकाशक चू. का. ढोबळ. १८
धुळाक्षरें अन् अंकलिप्याहुन
त्यास जाहला फार फायदा
दिडकी नव्हती माझ्यापाशीं
धुंडायास्तव परी कायदा! १९
त्याच्या दारीं गेलों अवचित
नव्हती कांहीं ओळख पाळख
काव्यग्रंथ पण पाहुन झालें
शतजन्मांचें माझ्या सार्थक! २०
'मीच कवी तो' म्हणुन सांगतां
खुर्चीवरती पडला ढोबळ
चमत्कार हा ऐकुन त्याला
क्षणांत आली होती भोंवळ! २१
शुद्धीवरती येतां त्यानें
कथिलें मजसी अमोल कांहीं
'महत्तता या वाङ्मयप्रांतीं
मेल्यावांचुन मिळणें नाहीं'! २२
'मेलो म्हणुनी मोठे झालां
जिवंत होतां फुटेल भांडें
ही कीर्ताची सोनकोंबडी
मेल्यावरती घाली अंडें! २३
जगायचें तर 'मृत'च राहुं द्या
कवी सदाशिव मेला तैसा
पत्नीपाशीं रहा तुम्ही जा
तिला दिलासे अर्धा हिस्सा.' २४
'मी तर होतों भणंग कवडा
कुठली पत्नी असेल मजला?
प्रकाशकानें दिधला पत्ता
'फुले इमारत, तिसरा मजला'.
'याच्या पुढचें तूहि जाणशी
तुझा 'लेखकू' तोच सदाशिव
आत्मा माझा तुझ्या संगती
मेला गेला—सरला पार्थिव! २६
खरेंच आतां चरित्र माझें
मीच सांगतों तुला वत्सले
प्रकाशकाला देउन राणी
वसूल कर तूं द्रव्य आपुलें. २७
या प्रीतीच्या जगण्यासाठीं
मृतच राहुं दे मजसी लोकीं
तूं विधवा मी कुमार लेखक
नको धरूं तूं जमेस बाकी. २८
तुझ्या नि माझ्या सहवासाच्या
उठतिल कंड्या खूप साजणी
आणिक माझ्या 'चरित्रग्रंथा'
येइल राणी खूप मागणी! २९
तूं मी आणि चू. का. ढोबळ
अस्सा त्रिवेणी जमला संगम
सरस्वतीसह गुप्त त्यांते मी
कमवूं दौलत स्थावर जंगम!

## या अंकांतील कथांसोबत लेखकांचीं नांवें कां नाहींत?

यामागें एक योजना आहे.

'दीपावली'च्या वाचकवर्गाची आवडनिवड अजमावून त्या प्रकाशांत पुढील वाटचाल आंखणें हा या योजनेमागील एक उद्देश आहे. एकूण कथावाङ्मयाच्या दृष्टीनें, सामान्य वाचकाच्या बदलत्या आवडीनिवडींचें मोजमापही यांत मिळालें तर फायदा होणार आहे.

वाचक उत्साहानें सहकार्य देतील अशी आशा आहे.

● याच पानावर विनामूल्य कूपन दिलें आहे, तें [illegible] पर्यंत भरून पाठविणाऱ्या वाचकांच्यांच निवडीची नोंद घेण्यांत येईल.

● अंकाच्या आरंभींच कथा–लेखकांचीं समग्र नांवें दिलीं आहेत. आंत त्या त्या गोष्टीबरोबर त्या त्या लेखकाचें नांव नाहीं. वाचकांनीं आपली निवड केवळ गोष्टीच्या गुणांवरच करावयाची आहे. लेखकांचीं नांवें कथांच्या जंत्रीसह नंतर प्रकाशित करण्यांत येतील.

● वाचकांनीं क्रमांक १, क्रमांक २, आणि क्रमांक ३ या अनुक्रमानें प्रत्येकीं तीन कथा निवडून त्यांची नोंद कूपनांत करून पाठवावी.

● येणाऱ्या एकंदर कूपनांतील क्रमांकांच्या बहुसंख्येनें जे पहिले तीन क्रमांक कथांत लागतील त्यांच्या कर्त्यांना मोबदल्याव्यतिरिक्त अधिक मानधन देण्याची वेगळी योजना आंखली आहे.

● परंतु या अंतिम निवडीची अचूक नोंद असलेल्या कूपनाच्या प्रेषकास ७५ रु. चें पहिलें पारितोषिक देण्यांत येईल. त्याखालोखाल ५० रु. आणि २५ रु. अशीं आणखी दोन पारितोषिकें ठेवलीं आहेत. अचूक नोंदींचीं कूपनें एकाहून अधिक निघाल्यास रक्कम विभागली जाईल.

● कोठल्याही कारणानें एखादें कूपन रद्द ठरवण्याचा अधिकार संपादक मंडळाला राहील. रद्द कूपनाबद्दल पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.

● या बाबतींत संपादक मंडळाचा निर्णय अखेरचा.

● अंक प्रसिद्ध झाल्यापासून १ महिन्याचे आंत निर्णय जाहीर होईल.

### कूपन

१ ______________________

२ ______________________

३ ______________________

नांव ______________________

(संपूर्ण पत्त्यासह) ______________________

योजनेच्या सर्व अटी मला मान्य आहेत.

सही ______________________

घावयाची तर गुजरातच्या अस्मितेचें स्वप्न पहाणारे मुनशी आणि संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचे आधारस्तंभ हिरे आणि काका गाडगीळ हे बडोद्याचे माजी विद्यार्थी. विनोबा भावे इथलेच. चन्द्रशेखर आणि यशवंत हे बडोद्याचे राजकवि. 'अभिरुचि' हें उच्च अभिरुचीचें मराठी मासिक नऊदहा वर्षे इथूनच नियत होतें.

एकंदरीनें सांस्कृतिक बाबतींत बडोद्याला फार कांहीं सांगतां येण्यासारखें नसलें तरी राजकीय चळवळी [illegible] कृपाछत्राखालीं निपजल्या, वाढल्या. त्या छत्राची मर्यादा त्यांना पडली. त्यामुळें एकही चळवळ खरोखरी लोकाभिमुख होऊं शकली नाहीं. सर्वच प्रगतीला एक प्रकारचा अपुरेपणा राहिला. उद्यानांत टेनिस कोर्टें आलीं परंतु त्यांवरून सायकली फिरत राहिल्या. सक्तीचें शिक्षण आलें परंतु निरक्षरताही राहिली. वाचनालयें आलीं परंतु वाचक वाढले नाहींत. मध्ययुगीन सत्ता आणि आधुनिक सुधारणा यांच्या या विजोड सहकार्यांतून अनेक मासले उद्भवले. महाराज परदेशांत गेल्यावर दिवाणांनीं त्यांचें स्थान... इतिहासमध्यें 'रनर-अप्' आले म्हणजे "आपले महाराजसाहेब पळण्यांतही पटाईत आहेत तर!" असा साश्चर्य शेरा मारणारे 'साहेब' हा एक मासला. सभा-खेळ प्रसंगीं कृपाप्रसादाच्या आशेनें हजर रहाणारे आणि कोऱ्या चेहऱ्यांनीं बसणारे असलेच पगडबंद 'हपीसर' लोक आणि मनगटावर सुबक घड्याळ बांधून, 'किती वाजले हो?' म्हणून इतरांना विचारणाऱ्या, जांभया देत बसणाऱ्या त्यांच्या 'अ-टु-डेट' बायका हे असले आणखी मासले.

तथापि सामाजिक व राजकीय जीवनांत उल्लेखनीय कार्य केलेले मराठेही दाखविता येईल. येथल्या प्रजा मंडळाच्या संस्थापकांत के. देशपांडे, के. साने हीं नांवें दिसतात. लढाऊ कामगार संघटनांतही मराठ्यांचा पुढाकार आहे. म्हणजे कांहीं मराठे तरी आपला पिंड विसरलेले नाहींत.

'गुजराती मराठे' हीही एक वेगळी जात तयार होते आहे. गुजरात्यांत त्यांना आपलें



महाराष्ट्रीयत्व आठवतें तर महाराष्ट्रांत आल्यावर 'गुजराती' असल्याची जाणीव होत रहाते. गुजराती आणि मराठीची मिसळ होऊन त्यांची भाषा बनलेली असते. "फलाण्या बारींतून बरघोडा दिसेल तिथें माझी 'पथारी टाक व जवळ पाण्याचा डोल मुक" असलीं वाक्यें तोंडीं विपुल. येथल्या गुजरातींतही थाळी-पाटल्या ऐवजीं ताटपाट, मकानच्या ऐवजीं वाडा, एकंदर ऐवजीं एकूण असे कांहीं मराठी 'ठसे' आढळतात. कांहीं मराठे गुजराती बोलतात आणि खानेसुमारीच्या वेळीं भाषा 'दक्षणी' म्हणून सांगायला विसरत नाहींत! नवसारीला जन्मलेल्या गडकऱ्यांच्या एका कवितेंत 'पथारी' आहे त्याची आठवण इथें होणें स्वाभाविक आहे.

तथापि कांहीं ठिकाणीं अस्सल मराठी मन, मराठी भाषा जिवंत आहेत. अहमदाबादच्या मणीनगर किंवा खोडा भागांत एखाद्या ठिकाणीं चक्क गोरेगांवकरवाडीचा किंवा सदाशिव पेठेचा भास होतो! स्थानिक मराठी संस्थांत जाति-पोटजातींचीं विटुटें आहेतच. हळदी-कुंकवाच्या वेळीं 'अब्राह्मण' बायकांना कुंकू न लावतां त्यांच्यापुढें कुंकवाचा करंडा आपटणाऱ्या 'सनातनी' भगिनी इथेंहि आहेत! भाडेकऱ्याची पोटजात इथेंही तपासण्यांत येते.

इतिहासांत जुन्यांत जुन्या काळीं मराठे इथें होते ते स्थानिक सुलतानाच्या चाकरींत १५३४ च्या आसपास. विलिनीकरणापर्यंत अनेक मराठे उत्साहानें इकडे वळत असत—पण संस्थानी नोकऱ्यांसाठीं किंवा कार्डीनोर्[illegible] [illegible]साठीं. आतां तीही सोय नाहीं. [illegible] मराठ्यांना गम्य नाहीं.

प्रांतीय वादाचा अतिरेक इथल्या गुजरात्यांत तसा नाहीं. तो असूं शकत नाहीं कारण त्यांचे हितसंबंध देशभर गुंतलेले असतात. भौगोलिक परिस्थितीही 'वाटेवरचा झरा, सर्वांचा सोयरा' अशी. तथापि राजकीय सत्तेमुळें त्यांच्यांतला स्वाभिमान आतां जागृत झाला आहे. येथल्या मराठ्यांनीं हें ओळखून धोरण ठेवलें तर त्यांनाही भविष्य आहे.

• • •



: ग. दि. माडगूळकर

१

नको रचाया अभंग, गाथा
संसाराचा त्यागहि नलगे
थोडी अक्कल, थोडा वाशिला
नरास गगनीं चढवीं वेगें. १

विमान ऐसें तें, घेउन जातें
वैकुंठाहुन सुन्दर देशीं
इकडे कीर्ति, तिकडे स्वागत
स्वातंत्र्याची किमया ऐशी. २

असाच होता भुक्कड कोणी
शब्दजुळारी कवी भुकेला
एक निघालें संस्कृतिमंडळ
त्यांत तयाचा क्रमांक आला. ३

विदेशवेडी शासनसंस्था
विमानमार्गें धाडित होती
सभ्य, संस्कृती जोडायास्तव
परदेशाप्रत कांहीं व्यक्ती. ४

खरेच ज्ञाते होते कोणी
कुणी जाणते ललितकलांचे
खोगिरभरतीसाठीं वरती
सगेसोयरे मंत्रिजनांचे. ५



६

मोबदल्यास्तव लिहिलीं होतीं
तुटकीं फुटकीं त्यानें कवनें
अचूक त्यानें तुकिलीं होतीं
गृहलचिवांचीं तत्वें वचनें. ७

लोकशाहिंतिल हुकुमशहानीं
केला होता मान तयाचा
प्रचारयंत्रीं जडला होता
[1]मळसूत्राचा खिळा तयाचा. ८

मानधनाच्या दिडक्यांमधुनी
सारभात तो होता जेवित
शुभ्र पांढरें पेहरत होता
उर्वरितांचे स्नावण लावित. ९

नियतकालिकां दादहि नव्हती
प्रांतांतिल या महाकवीची
स्वराज्यांतही सरली नव्हती
मिरासदारी साहित्याची १०

जिकडे धाडिल तिकडे कविता!
परत आली, कुणि न छापिली
अचुक परत ती लादुनं तिकिटें
कृतीस त्याच्या धूळ-टोपली. ११

असा उपेक्षित कवी आज तो
उडत निघाला होता आतां
टोपल्यांतुनी कां नच यावी
वरती त्याची कवित्वगाथा! १२

अखबारांनीं आज तयाचें
नांवहि होतें ठळक छापलें
जितणाऱ्यांच्या जंत्रीमध्यें
जसें असावें 'हेंहि पळालें'![2] १३

खुषींत होता कवी बिचारा
मान ताठवुन टोपीखालीं
तळावरी त्या निरोप द्याया
नव्हती आली जरी नवेली १४

अन्य सदस्यांभंवती होत्या
गुलाबकलिका, लिली डेलिया
सळसळ साड्यांमधुनी होता
उरास त्यांच्या डसत जंबिया[3] १५

असो, लाभ तो नव्हता त्याला
दिठी दिठीच्या डंख सुखाचा
भाग्य थोडकें हेही नव्हतें
प्रवास सुखकर आणि फुकाचा! १६

शिडी चढुनिया गेले वरती
भारतभूषण सर्व प्रवासी
रुमाल हलवीत होते खालीं
उरोज कंपित, हात गुल्बशी. १७



यानाआधीं नभीं उडाला
कवी बापडा स्वप्नासंगें
'असले कुठलें तुझिया दैवीं!'
कोलाहल त्या गर्जुन सांगे. १८

त्या यानाच्या तोंडावरचा
फिरूं लागला अजस्र पंखा
पोटीं घेऊन पाय उडे तें
आकाशीं हो सुस्थिर नौका. १९

हवेंत गेला कवी सदाशिव
भूमीवर ज्या नव्हता थारा
विमानांतल्या गगनपरीचा[4]
दुरुन लाभला त्यास आसरा. २०

कधीं नव्हे तो कवी मराठी
वाऱ्यावरती स्वार होउनी
विमानांतुनी खराच गेला
ठाउक जें त्या फक्त पुराणीं. २१

कधिं न छापल्या ज्याच्या कविता
त्या सर्वांच्या माथ्यावरती
कवी सदाशिव पोहत होता
उचभ्रूंचा घेउन होडी. २२

१ मळसूत्राचा खिळा म्हणजे 'स्क्रू'. परभाषा टाळण्यासाठीं हा खटाटोप.

२ Also Ran हें Expression मराटींतहि चालून जावें.

३ येथें थोडें नवकाव्यासारखें झालें आहे पण चालू समाजाचा परिणामच नाही अशी कृति व माणूस विरळाच.

४ गगनपरी म्हणजे Air Hostess.

तळीं राहिली मुंबानगरी
गिरगांवांतिल काळी खोली
मद्रदेशिं तो अन्नविधाता
धमक्यांसंगें उरला खालीं. २३

यक्षनगरिच्या घनदूतांची
काव्यामधली मिरास तोडुन
कवी सदाशिव पुढें चालला
अन्यायांची जमीन सोडुन. २४

कल्पनेंतही त्यास न सुचला
प्रवास असला नवल परी
दिमाख नाहीं उरला त्याला
युग कर्त्याच्या 'म्हातारी 'चा ![5] २५

## २

आणि अचानक एके दिवशीं
[6]हिरव्या पिंगट तिसऱ्या प्रहरीं
नभोवाणिवर आली वार्ता
विमान बुडलें महासागरीं. १

अपघाताची वात सांगण्या
खास निघाले अंक लगोलग
'महासागरीं' बुडलीं रत्नें
भरतभूमिची झाली तगमग २

दिल्लीश्वर अन् गल्लीश्वरही
दावुं लागले दुःख प्रयत्नें
[7]महोदधीनें परत घेतलीं
अशीं अचानक चौदा रत्नें ! ३

त्या 'चौदांच्या यादीमाजीं
नांव आमुच्या सदाशिवाचें
नांवासंगें चित्रहि यावें
इतुकें नव्हतें भाग्य तयाचें ! ४

छायाचित्रें होतीं तेरा
चौदावी पण चौकट कोरी
म्हणून गेले केशवसुत ना
[8]कोण कवीचें रूप विचारी ? ५

कुठेंच नव्हता आला फोटो
शब्दजुळारी सदाशिवाचा
चितारलाहिं नव्हता कोणी
पडेल मुखडा त्या लुकड्याचा ६

तेंच नेमकें कारण झालें
अधिक वाढण्या त्याची कीर्ति
सुचेल तैशी वर्णु लागले
बोलघेवडे त्याची मूर्ति ! ७

मूर्तीसंगें स्फूर्तीचेही
पवाड झाले सदाशिवाच्या
पडला जेथुन, त्याच्यावरती
त्यास लागल्या नेऊं वाचा ! ८

महासागरीं बुडता कवडा
महाकवीची पावे पदवी
मरता झाली दिगंत कीर्ति
'हाय हरपला हिरा हिंदवी !' ९

अशा हरपल्या हिऱ्यास पडले
बघतां बघतां शंभर पैलू
नांव तयाचें घेउं लागल्या
कोकिळकंठी मीना मालू ![9]

हें देखाया हें ऐकाया
उरला नव्हता कवी सदाशिव
शंख शिंपल्या धुंडित होता
देह तयाचा अनित्य पार्थिव ! ११

आणिक इकडे वाढत होतें
प्रचंड त्याचें कीर्तीवैभव
कुणी छापल्या स्मृती तयाच्या
कुणी शोधिलें उनाड शैशव ! १२

मिळेल त्याची ओळ तेवढी
त्रिवार झाली पुनर्प्रकाशित
बियावांचुनी वेल वाढली
गगनचुंबिका अशी अकल्पित ! १३

वात वातिला लागुन व्हावी
नेत्राल्हादक जशी दिवाळी
बात लागुनी बाते लागीं
तशी भडकली एक आरोळी १४

आरोळीच्या आवाजानें
जागा झाला एक प्रकाशक
म्हणे 'काढुं या अशांत आतां
सदाशिवाचें कविता पुस्तक !' १५

प्रकाशकाचें भाग्य थोर त्या
जागी झाली स्मृती तयाची
वर्षांमागें आली होती
एक चोपडी सदाशिवाची. १६



चूडामणिनें[10] धुंड धुंडली
अलमाऱ्यांचीं साऱ्या पोटें
कांहीं केल्या त्यास स्मरेना
कवी सदाशिव लपला कोठें ! १७

आठवला त्या कवी सदाशिव
आठवले ते शब्द तोतरे
आठवले ते पिवळे कागद
काक पदांसम दिव्य अक्षरें ! १८

आठवलें नें, पण गावेना
गडबड चाई, तगमग गोंधळ
चालुं लागला रद्दी चिंध्या
बावरलेला चू० का० ढोंबळ. १९

एकेकाळीं चू० का० ढोंबळ
ग्रंथ प्रकाशक होता मोठा
मोठ्या ग्रंथप्रकाशनें पण
बसली टोपी, आला तोटा. २०

ज्या ग्रंथाच्या प्रकाशनानें
सरली होती त्याची सद्दी
तोलुन होता विकीत आतां
त्या ग्रंथांची नवीन रद्दी ! २१

सदाशिवाच्या, कीर्तीघोषें
ज्वालामुखिसा आज अचानक
समग्र जागृत झाला होता
चूडामणिंतिल सुप्त प्रकाशक २२

काय म्हणावें दैव शिकंदर !
कोळशांतुनी हिरा सांपडे
शोधित असतां रद्दी चिंध्या
सदाशिवाचें मिळे चोपडें ! २३

वेळ कशाला लाविल कोणी
सुवर्ण भाकित हातीं येतां
ग्रंथगता हो बघतां बघतां
सदाशिवाची समग्र कविता !

कुणी अप्सरा
...

ते..
''चू०२
३
प्रकाशन
मर्

---

५ युगकर्त्या केशवसुतांची 'म्हातारी' नामक कविता आहे हें सांगणें न लगे पण—
६ तिसरा प्रहर नुसताच पिंगट होता पण ऋतुज्ञानहि व्हावें यास्तव 'हिरव्या'ची योजना.
७ समुद्रमंथनांतील समुद्र हा नसावा पण 'निरंकुशाः कवयः'
८ कवि तो होता कसा आननीं ?

९ 'तरुण स्त्रिया' इतकाच अभिप्राय.
१० चूडामणि काशिनाथ ढोंबळ.

जिकडे तिकडे एक बोलवा
'समग्र कविता सदाशिवाच्या!' १
[1] 'गरम चपात्यापरी संपल्या
पांच आवृत्ति बघतां बघतां
जुळाऱ्यासही पाठ जाहली
सदाशिवाची समग्र कविता ! २

नभोवाणिवर गाउं लागले
बृहन्नडेचे नवीन चेले
पाठ्य पुस्तकांमधुनी सहजीं
त्या काव्यांचे तुकडे गेले ! ३

'व्हीलर' वरती उठूं लागल्या
[2] खिशांत-बसल्या प्रती सानशा
अखबारांतुन चालू होता
जाहिरातिचा अखंड ताशा. ४

गवता ऐशी वाढे कीर्ति
ग्रंथासंगें प्रकाशकाची
...ती मिळून आल्या
दृष्ट क...ण्य. मराठियेची ! ५

प्रकाशकाच्या आधिन होते
प्रकाशनेतर हक्क सर्वही
प्रांतोप्रांतीं वाढुं लागलें
सदाशिवाचें नांव प्रत्यहीं ६

वंग, गुर्जरी, तेलगु, तामिळ
तशी असामी कन्नड उडिया
बघतां बघतां हो भाषांतर
सदाशिवाचें भाषांतुन या ! ७



...ाठीं घेउन रक्कम
जमती ढोबळ' [3] बराच गल्ला
मेलेल्याच्या मालावरती
शहाजोग तो मारी डल्ला ८
भरून आले ... जतणा
जसें अस
खु...
...त्या बेचव

......

...ोत्म
त्या... ...चा
... ...ें
योजनेच्या ६

...पराठी.
भाषा ...हे पण प्रका-
२ Al... ...करणार ?
चालून जावें.

अटकेकटकेवरी पोंचले
सदाशिवाचे झुलते झेंडे ९
बडा शेठिया झाला ढोबळ
शान वाढली उमाप त्याची
मेजावरती 'फोन' किणकिणे
बुडाखालतीं फिरती खुर्ची. १०



उसंत नाहीं त्यास घडीभर
बोलायास्तव जरा कुणाशीं
जिवानिशी तो कवी संपला
प्रकाशकाची चंगळ ऐशी ! ११

परदेशांतुन रोज मागण्या
सदाशिवाच्या धाडा कविता
किती दाम ते उत्तरें सांगा
हक्क 'फलाण्या' भाषेकरितां ! १२

प्रती, पुस्तकें, ढिगांत त्यांच्या
ढिगासारखा फुगला ढोबळ
पाय अडकुनी पडली होती
त्याच्या दारीं कमला चंचळ. १३

पतपेढ्यांतिल फुगतां टेवी
आंस वाढली प्रकाशकाची
पुनः पुनः तीं छापूं लागे
नवीं पुस्तकें त्याच कवीचीं १४

दर पानाला बारा आणे
भाव पाडला प्रकाशकानें
पोटार्थी अन् कवी जुंपले
सदाशिवाचीं रचण्या कवनें १५

सागरांत का कळतें कोणा
कुणा नदीचें कुठलें पाणी
सदाशिवाच्या संगें झाली
कैक कवींची पावन वाणी ! १६

शेषशायिच्या उदरावरती
फुलांत जैसें ब्रह्म चतुर्मुख
सदाशिवाच्या प्रेतावरती
तसाच बसला सुखी प्रकाशक १७

सदाशिवाच्या नांवावरती
एक छापुनी चरित्र द्यावें—
प्रकाशकाच्या मनांत होतें
मिळेल तितुकें द्रव्य लुटावें.

प्रकाशितांचें जरा 'खाजगी'
जनाभिरुचिला अतीव रुचतें
अमुक गांवतां आज आवडी
तींत कालचें शिळेंहि पचतें !

कुणांकडुनिया लिहवुन घ्यावें
सदाशिवाच्या आत्मचरित्रा
तृप्त तनूंतिल जागृत मेंदू
हेरि... होता नवा पवित्रा

बसून, फिरत्या खुर्चीवरती
चोळित होता डोकें ढोबळ
भर बाराचा सुमार होता
गिऱ्हाइकांची नव्हती वर्दळ.

तोंच अचानक आलें कोणी
ढोबळ यांचें नांव विचारित
शुभ्र नेसली, मलूल तरुणी
शिक्षिकाच ती असेल निश्चित

एक सैलसर घेउन चक्कर
बसल्या बसल्या खुर्चीवरती
प्रश्नांकित निज पाही ढोबळ
खालीं चष्मा, डोळे वरती

पडका तरिही थोडा चिडका
त्या तरुणीचा साद उमटला
"कुणी अनुमति दिधली आणि
कैसा तुम्ही ग्रंथ छापला—?"

बसल्या ठायीं प्रकाशकाला
जिताजागता पडला चकवा !
समोर होती उभी तयाच्या
सदाशिवाची पत्नी विधवा !

४

काय करावें तेंच सुचेना
बसल्या जागीं खिळला ढोबळ
बर्फ खंडसा थंड होउनी
पडला खालीं, आली भोंवळ.

मदासारखी भोंवळही पण
उतरायास्तव चढते माथीं
शुद्धी येतां कळलें त्याला
कवीजनांना ...तीं नाहीं.

उठतां कळला पुनश्च ढोबळ
कविजाया ती त्यास सांवरी
गिळुन आवंढा पाय आपटी
कटीं खोंचला पदर आंवरी.

अनुक्रमणिका